सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्त मंडळाचें मासिक

# नवभारत

वर्ष पहिलें, अंक पांचवा फेब्रुवारी १९४८

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादकमंडळ

आचार्य श्री. द. जावडेकर | आचार्य स. ज. भागवत
श्री. हरि कृष्ण मोहनी | प्रो. वि. म. वेडेकर (कार्य. संपादक)

व्यवस्थापक : श्री. चिं. य. मराठे

---

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल, अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनीं स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठीं जें आपलें सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेलें असेल, उच्च वातावरणांतील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेनें संगृहीत केलेला असेल, त्याचें दिग्दर्शन हेंच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊं शकतें, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.

संचालक व संपादक-मंडळांतील सर्व व्यक्ती यांचेंही सर्व विषयांत मतैक्य आहे, असें नाहीं मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोनानेंच त्यांना एकत्र आणलें आहे. तथापि प्रत्येकाचें व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेंच त्यांचें सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ति आपल्या नांवानें प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

---

वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

मुद्रक व प्रकाशक चिं. य. मराठे यांनीं हें मासिक विश्वास छापखाना, २९१ शनिवार पुणें २, येथें छापिलें आणि नवभारत कचेरी, २१९ शिवाजीनगर, पुणें ५ येथें सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्त मंडळाकरितां प्रसिद्ध केलें.







अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

# नवभारत, फेब्रुवारी १९४८

## या अंकांतील लेखक.

श्री. ग. गं. जांभेकर (पुणें)—'लोकशिक्षण' या सुप्रसिद्ध, उच्च दर्जाच्या मासिकाचे व लोकशिक्षण–लघुग्रंथमालेचे संपादक. गेलीं तीन वर्षें ते कै. आचार्य बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर यांचें चरित्र व संकीर्ण लेख यांविषयीं अत्यंत संशोधन–परिश्रमपूर्वक साद्यंत माहिती गोळा करीत असून तद्विषयक पहिला मौलिक प्रमाणग्रंथ त्यांनीं तयार केलेला लवकरच बाहेर पडेल. या अंकांत छापलेला त्यांचा लेख त्यांच्या ह्या आगामी ग्रंथाच्या प्रस्तावनेंतून उद्धृत केला असून, त्यावरून श्री. जांभेकर यांच्या गाढ व्यासंगाची, सखोल संशोधनाची व सूक्ष्म चिकित्सापद्धतीची साक्ष पटेल.

श्री. ह. कृ. मोहनी (नागपूर)—"तेजस्वी शिक्षण" "आमचा सनातन धर्म" इत्यादि ग्रंथांचे लेखक व प्रस्तुत मासिकाचे एक संपादक.

प्रा. गं. बा. सरदार. (पुणें)—पुणें येथील श्री. ना. दा. ठाकरसी कॉलेजमध्यें मराठीचे प्राध्यापक 'अर्वाचीन गद्याची पूर्वपीठिका' 'महाराष्ट्राचे उपेक्षित मानकरी' या ग्रंथांचे लेखक.

श्री. पां. ग. देशपांडे (अहमदाबाद)—ग्रंथपाल, गुजरात विद्यापीठ ग्रंथालय, अहमदाबाद. गुजराती लेखक. यांनीं श्री. काकासाहेब कालेलकर यांचा 'जीवनांतील आनंद' आणि गांधीजींचें 'हिंद स्वराज्य' या व इतर ग्रंथांचा मराठी अनुवाद केला आहे.

प्रा. वि. व. आठवले (पुणें)—M. Sc. F. R. G. S. हे नाशिक येथील हं. प्रा. ठा. महाविद्यालयांत भूगोल व गणित या विषयांचे प्राध्यापक होते. तेथून नुकतेच सेवानिवृत्त झाले. रामकृष्ण परमहंसांविषयीं त्यांचा 'हृत्पद्म' हा ग्रंथ मराठींत प्रसिद्ध असून शिवाय त्यांचे महाभारतावरील लेख संशोधनविषयक नियतकालिकांतून प्रसिद्ध झाले आहेत.

प्रा. गंगाधर गाडगीळ (मुंबई)—मुंबईच्या पोद्दार कामर्स कॉलेजमध्यें अर्थशास्त्राचे प्राध्यापक. 'मानसचित्रें' या लघुकथासंग्रहाचे लेखक.

आचार्य शं. द. जावडेकर (इस्लामपूर)—सुप्रसिद्ध राज्यनीतिशास्त्रज्ञ, 'आधुनिक भारत' 'हिंदु मुसलमान ऐक्य' इत्यादि ग्रंथांचे लेखक व प्रस्तुत मासिकाचे एक संपादक.

प्रा. श्री. त्र्यं. पुणतांबेकर (नागपूर)—राज्यशास्त्रज्ञ व समाजशास्त्रज्ञ. नागपूर विश्वविद्यालयामध्यें राज्यशास्त्राचे प्राध्यापक. 'नागरिक नीति' इत्यादि मराठी ग्रंथांचे व 'Indian Citizenship and Civilisation,' 'Constitutional History of England,' इत्यादि इंग्रजी ग्रंथांचे लेखक.

प्रा. त्र्यंबक शंकर शेजवलकर (पुणें)—डेक्कन कॉलेज पोस्टग्रॅज्युएट ॲन्ड रिसर्च इन्स्टिट्यूट या संस्थेंत मराठा इतिहासाचे प्राध्यापक. "Panipat : 1761" या मौलिक संशोधनात्मक ग्रंथाचे कर्ते. 'प्रगति' साप्ताहिकाचे संपादक म्हणून त्यांनीं केलेल्या लिखाणापैकीं 'शेजवलकरांचे लेख (भाग १ ला)' पुस्तकरूपानें प्रसिद्ध आहे.

प्रेमा कंटक (सासवड) सुप्रसिद्ध समाजसेविका. 'सत्याग्रही महाराष्ट्र' इत्यादि ग्रंथांच्या लेखिका.

श्री. बा. ना. देवकृत

# 'कै. वा. बाळ गंगाधर शास्त्री जांभेकर यांचें चरित्र' (समीक्षण)

श्री. गणेश गंगाधर जांभेकर

## लेखनकार्यांतील अडचणी

कै. बाळ गंगाधर शास्त्री जांभेकर यांचें त्यांतल्या त्यांत विस्तृत असें पहिलें चरित्रहि मुंबईकर विद्वज्जनांच्या साहाय्यानेंच लिहिलें जाऊन तेथील लोकांपुढें १८९२ सालच्या हेमंतव्याख्यानमालेंत निबंधरूपानें प्रथमतः वाचिलें गेल्यानन्तर छापिलें गेलें, त्यावरूनहि त्या संस्मरणीय पुरुषाचें कर्तृत्व व योग्यता हीं मुंबईकरांसच अधिक विदित होतीं हें स्पष्ट आहे. तथापि पन्नास वर्षांपूर्वी सुद्धां अशा प्रकारचें चरित्र लिहिण्याचें कार्य किती बिकट झालेलें होतें हें निबंधकार रा. बाळकृष्ण नारायण देव यांनीं 'विषयोपक्रम' करतांना जे निराशेचे उद्गार काढिले आहेत, त्यावरून प्रत्ययास आल्यावांचून राहत नाहीं. ते लिहितातः—

"वरील हकीकतीवरून चरित्रनायकाबद्दल पूज्यबुद्धि कोणाच्याहि मनांत उपजेल आणि त्यासंबंधीं विशेष माहिती करून घेण्याची इच्छाहि पुष्कळांस होईल; **परंतु या संबंधांत त्यांची वरीच निराशा होण्याचा संभव आहे. बाळशास्त्र्यांचें आयुर्वृत्त फारसें उपलब्ध नाहीं ही फार शोचनीय गोष्ट आहे.**

"या तैलबुद्धि, विद्वान्, परोपकारी, सर्वमान्य व असाधारण पुरुषाचें चरित्र त्याचे अनेक विद्वान् स्नेही व सन्माननीय छात्रवर्ग यांपैकीं कोणीच लिहिलेलें नाहीं, ही गोष्ट फार चमत्कारिक दिसते. त्याच्या अद्वितीय मानासिक व वाचिक सद्गुणांचे पोवाडे पुष्कळांनीं गाइले आहेत. लोककल्याणार्थ अव्याहत परिश्रम करतांना पाहून अनेकांनीं त्याचा धन्यवाद केला आहे. परंतु **अशा अनुकरणीय पुरुषाचें वृत्त आपल्या देशबंधूंस सादर करण्याचें कोणींच मनावर घेतल्याचें दिसत नाहीं** असो. झालें तें झालें. आतां याबद्दल विषाद मानून उपयोग नाहीं. प्रस्तुतकाळीं त्यांच्या चरित्रलेखनास जीं साधनें उपलब्ध असून मिळालीं आहेत, त्यांचा यथाशक्ति उपयोग करून शास्त्रीबोवांच्या कृतींशीं व गुणांशीं वाचकांची थोडीशी ओळख करून देण्याचा विचार आहे." (पृ. १ स्थू. आ.)

आणि सुमारें ५६ वर्षांपूर्वी न्या. रा. ब. जनार्दन वासुदेवजी यांसारखे वयोवृद्ध सहाध्यायी व रा. ब. नाना मोरोजी, डॉ. आत्माराम पांडुरंग, प्रो. दादाभाई नौरोजी, रा. ब. वासुदेव पांडुरंग प्रभृतींसारखे विद्वान् सच्छिष्य अद्यापि विद्यमान असतां जर ही निराशेची परिस्थिति, तर आज कै. बाळशास्त्र्यांसंबंधीं आपल्याला कोठून कितीशी अधिक माहिती मिळणार ?

## प्रस्तुत चरित्राचें महत्त्व व गुणवैशिष्ट्य

तथापि अशाहि स्थितींत रा. बा. ना. देव

---

कै. आचार्य बाळ गंगाधर शास्त्री जांभेकर यांचें संकीर्ण लेख-खण्ड १ ह्या आगामी शतसांवत्सरिक स्मारक-ग्रंथाच्या संपादकीय 'उपोद्घाता'तून उद्धृत.








यांनीं शास्त्रीबोवांचे मुंबापुरस्थ शिष्य· रा. ब. नाना मोरोजी व नाशिक येथील त्यांचे· भागिनेय रा. परशुराम विष्णु उर्फ भाऊसाहेब योगी " या उभय-तांस बरीच तसदी दिलेलें हें चरित्र " त्या काळीं यथाशक्ति लिहून महाराष्ट्रीय वाचकवर्गास खरोखर उपकृत केलें आहे ह्यांत शंका नाहीं. कारण, एवढेंहि चरित्र जर तेव्हां लिहिलें न जातें, तर कै. बाळ गंगाधर शास्त्री जांभेकर यांची असाधारण थोरवी त्यांच्या देशबांधवांच्या लक्ष्यांत आज-पर्यंत अंशतः तरी आणून देणारें हें एकमेव साधनहि उपलब्ध झालें नसतें, आणि मग त्यांचें शतसांवत्स-रिक पुण्यस्मरण करण्याची बुद्धि तरी कोणाला सांप्रत झाली असती किंवा नाहीं ह्याचा बलवत्तर वानवाच आहे! इतकेंच नव्हे, तर रा. बा. ना. देवकृत '**कै. बा. बाळ गंगाधर शास्त्री जांभेकर यांचें चरित्र**' ही अल्पशी लोकोपकारक कृति मराठी चरित्रवाङ्मयविकासाच्या दृष्टीनेंहि बरीच महत्त्वाची व प्रशंसनीय गणिली पाहिजे. आधुनिक मराठी गद्य-रचनेस प्रारंभ होऊन १८९२ सालीं साठपाऊणशें वर्षें होऊन गेलीं होतीं, तरी त्या काळांत कोणाहि आधुनिक एतद्देशीय थोर पुरुषाचें बऱ्यापैकीं एकहि स्वतंत्र चरित्र प्रायः प्रसिद्ध झालेलें नव्हतें! 'निबंध-माले'च्या ३३व्या अंकांत–सन १८७६मध्यें म्हणजे बाळशास्त्र्यांच्या मृत्यूनंतर तीस वर्षांनीं सुद्धां–डॉ. जॉन्सनवर निबंध लिहीत असतां विष्णुशास्त्री सांगतात (पृ. ३०७, तळटीप):—"गेल्या वीसपंचवीस वर्षांत सॉक्रेटीस, कोलंबस, खुसरू, नाना फडनवीस, क्याप्टन् कुक व क्याथरैन इतक्यांचीं चरित्रें प्रसिद्ध झालीं. शिवाय दोनतीन वर्षांपूर्वीं दक्षिणा प्रैज कमिटीकडून पसंत झालेलीं वॉशिंग्टन, फ्रांकलिन, लॉर्ड क्लैव्ह हींहि चरित्रें इंदुप्रकाशांत छापलीं गेलीं. यांखेरीज अलीकडे रा. विनायक कोंडदेव ओक यांनीं केलेलीं 'शिकंदर बादशाहा,' 'पीटर धि ग्रेट,' व 'ड्यूक ऑफ वेलिंग्टन' हींहि सरकारानें विकत घेऊन प्रसिद्ध केलीं आहेत. परंतु इतक्या सर्व चरि-त्रांत सॉक्रेटीसाचें मात्र चोहोंकडे प्रसिद्ध झालें असून तिसऱ्या आवृत्तीपर्यंत त्याची मजल पोंचली आहे." ह्यानंतर पुनः '**माले**'च्या ५५ व्या अंकांतील पत्रव्यवहारांत जॉन्सनवरील समग्र निबंधाची प्रशंसा करून '**शालेचा भक्त**'(मु. महतपूर, ता. १३-१-७९) पुढील स्मरणीय उद्गार काढतो:—"जुन्या व नव्या विद्वन्मंडळांत कित्येक कैलासवासी झाले, परंतु त्यांपैकीं कोणाचेंहि वृत्त चरित्ररूपानें दृष्टीस पडलें नाहीं. त्यांत कोणीहि अशा मानास योग्य नाहीं काय? मराठी गद्यग्रंथांचे जनक माजी सदाशिव काशिनाथ छत्रे, **बाळ गंगा-धरशास्त्री जांभेकर** इत्यादि आद्य विद्वज्जन–ज्यांनीं या भाषेस रुळीस लावलें–अशांचीं चरित्रें मराठी वाचकांस मनोरंजक व हितावह होणार नाहींत काय?.........तसेंच थोड्या वर्षांपूर्वीं परलोक-वासी झालेले डॉक्टर भाऊ दाजी, रा. ब. भास्कर दामोदर पाळंदे, विष्णु परशुराम रानडे, परशुरामपंत तात्या गोडबोले व नुकतेच निवर्तलेले पुण्यांतील लोकप्रिय अध्यक्ष [कै. कृष्णशास्त्री चिपळूणकर?] यांजविषयींहि या संबंधांत शोचनीय अनास्था नज-रेस पडते इ." अर्थात् ह्या वेळेपर्यंत केवळ बक्षिसाच्या आशेनें व आपल्या शक्तीप्रमाणें एखाद-दुसऱ्या प्रसिद्ध इंग्रजी चरित्रग्रंथाचें भाषांतर-रूपांतर करण्यापलीकडे कोणाची फारशी मजल गेलेली नव्हती हें स्पष्ट आहे! ऐतिहासिक पुरुषांपैकीं रा. शाळिग्रामकृत बापू गोखले यांचें चरित्र (१८७७), हेंच एक पुस्तक प्रायः स्वतंत्रपणें लिहिलेलें आपल्या दृष्टीस पडतें; आणि आधुनिकांपैकीं रा. आजरेकर-कृत विष्णुबावा ब्रह्मचारी (१८७२), व रा. निमकरकृत रा. ब. भास्कर दामोदर पाळंदे(१८७८), हींच दोन अगदीं किरकोळ लघुचरित्रें आढळतात. मात्र ह्यानंतर मराठी चरित्रवाङ्मयांत लहानमोठ्या पुस्तकांची हलुहळू चांगलीच भर पडत चालली. १८८२ पासून रा. वि. कों. ओक यांनीं '**बालबोध**' मासिकाच्या द्वारें प्रत्येक अंकांत एक दोनचारपानी लघुचरित्र देण्याचा अभिनंदनीय उपक्रम केल्यामुळें एतद्देशियांपैकीं बऱ्याच नामांकित आधुनिकांची थोडीशी ओळख महाराष्ट्र वाचकवर्गास होऊं लागली. १८९१ मध्यें मुंबई येथें 'चरित्रप्रकाशक मंडळी'नें आधुनिक थोर पुरुषांचीं–'बालबोध'–सांच्यांपेक्षां किंचित् मोठीं अशीं लघु चरित्रें लिहून प्रसिद्ध करण्याचा दुसरा एक स्तुत्य उपक्रम केला. त्यांतून डॉ. आनंदीबाई जोशी, डॉ. भाऊ








दाजी, रा. सा. वि. ना. मंडलिक, सर, टी. माधव-राव अशांसारखीं पांचसहा तरी चरित्रें लागोपाठ निघालीं. शिवाय 'लोकहितवादीकृत' दयानंद-स्वामींचें चरित्र (१८८३), रा. गो. कृ. टिळककृत बापूसाहेब मेहेंदळे यांचें चरित्र (१८८८), रा. खं. भि. वेलसरेकृत विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचें चरित्र (१८९१), ह्या आधुनिक चरित्रांचाहि उल्लेख करणें योग्य होय. तथापि 'महाराष्ट्र-ग्रंथो-त्तेजन'नामक 'विविधज्ञानविस्तारां'त आलेल्या प्रचोदक लेखांत (मार्च १८७८) मराठी भाषेंत " सन्मार्गवर्तींचीं चरित्रें " प्रसिद्ध करण्यासंबंधीं जी महत्त्वाची सूचना केलेली आढळते, तींत उल्लेखि-लेल्या कै. बाळशास्त्री जांभेकर व डॉ. भाऊ दाजी ह्या आधुनिक विद्वद्द्वयापैकीं पहिल्याचें जें चरित्र स्वतःस ' मालेचा भक्त ' म्हणविणाऱ्या रा. बा. ना. देवांनीं आस्थेनें लिहून १८९२ मध्यें प्रसिद्ध केलें, तेंच आधुनिक महाराष्ट्रांतील आद्य थोर पुरुषाचें स्वतंत्र रीतीनें व बऱ्याच सारासार बुद्धीनें लिहिलेलें मराठींतील पहिलें वाचनीय लघुचरित्र होय, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

रा. देवांनीं लिहिलेलें हें जांभेकर-चरित्र खरोखर चांगलें वठलें आहे. १८९०-९१ सालीं विद्यमान असलेल्या कै. बाळशास्त्र्यांच्या समकालीन प्रसिद्ध मंडळींकडून त्यांनीं कांहीं माहिती परिश्रमपूर्वक मिळविलेली दिसते. त्यामुळें ती जरी विशेष तपशील-वार नसली तरी चांगली विश्वसनीय असून चरित्र-नायकांच्या असाधारण व्यक्तित्वाची व थोरवीची त्यांना पुष्कळशी यथार्थ कल्पना देतां आली आहे. 'बोर्ड ऑफ् एज्युकेशन'चीं वार्षिक इंग्रजी इतिवृत्तें, 'मुंबई रॉयल एशियाटिक-सोसायटीचें नियतकालिक', ' कविचरित्र, ' ' मुंबईचें वर्णन ' ' सद्वर्तन ' ' निबंधमाला ' ' सरस्वतीमंडळ ' ' राजप्रकरणीं ऋषी'चा चरित्रपर लेख, इत्यादि इंग्रजी व मराठी साहित्यांतील ठळक उल्लेख त्यांनीं एकत्र केले आहेत, आणि कै. बाळशास्त्री यांचे ग्रंथहि थोडबहुत पाहिले आहेत. अर्थात् एक चरित्रा-त्मक उद्बोधक निबंध लिहिण्याइतकी सामग्री त्यांजपाशीं निश्चित जमली होती; आणि रा. बा. ना. देव हे स्वतः मराठी भाषेंतील एक नाणावलेले चरित्रलेखक व मार्मिक टीकाकार असल्यानें त्यांचा हा चरित्रात्मक निबंध बराच वाचनीय झाला आहे. त्यांतून त्यांचे विद्वान् स्नेही प्रो. राजारामशास्त्री भागवत यांचेंहि त्यांस बरेंच साहाय्य झालें असलें पाहिजे. ह्या त्यांच्या परस्पर ऋणानुबंधामुळेंच इंदूर-सारख्या दूरच्या ठिकाणीं राहत असतांहि त्यांना चरित्रनायकाविषयीं इतकी माहिती मिळवून आपला लेख तयार करतां आला, आणि मुंबापुरस्थ "हिंदु यूनियन क्लब" नामक मंडळीच्या आश्रयाखालीं चालणाऱ्या " हेमंतोत्सव-व्याख्यानमाले"त त्यांना स्वतः उपस्थित होतां न आलें, तरी त्यांच्या वतीनें तो प्रो. राजारामशास्त्री यांनींच सभे-पुढें समग्र वाचून दाखविला. शिवाय पुढें तो छापून काढतेवेळीं त्यावरून त्यांचा सफाईचा हातहि फिरलेला असणें अगदीं शक्य आहे. मात्र हा चरित्रात्मक प्रबंध हेमंतव्याख्यान-मालेंतलि इतर अनेक व्याख्यानांप्रमाणें पुण्याच्या आर्यभूषण छापखान्यानें रॉयल अष्टपत्री आकारांत व सूक्ष्माक्षरांत छापून प्रसिद्ध केल्यामुळें त्याचीं अवघीं २७ पृष्ठेंच भरलीं! आणि प्रायः ह्याच कार-णास्तव एक स्वतंत्र, सुवह चरित्र म्हणून तो प्रबंध लोकांपुढें न आल्यानें त्याची व्हावी तशी प्रसिद्धि कधींच झालेली दिसत नाहीं! ह्याऐवजीं थोडेसें स्थूलाक्षर योजून निराळ्या क्राऊन षोडशपत्री आका-रांत पुस्तकरूपानें आकर्षक स्वरूपांत छापून तो प्रसिद्ध झाला असता, तर सुमारें पाऊणशेंऐंशीं पृष्ठांचें चारआठ आणे किंमतीचें एक संग्राह्य व वाचनीय लघुचरित्र म्हणून मराठी वाङ्मयांत त्याची अधिक प्रशंसा होऊन लोकशिक्षणाचें कार्यहि त्यानें अधिक साधलें असतें. परंतु कां कोण जाणें, ह्या-नंतर रा. देव हे चांगले तीन तपें विद्यमान अस-तांनाहि तशा स्वरूपांत ह्या सच्चरित्राची पुनरावृत्ति निघण्याचें भाग्य त्यास लाभलें नाहीं, आणि अडीच आणे किंमतीचें एक बोजड आकाराचें इतिवृत्तप्राय व्याख्यान म्हणून तें मराठी ग्रंथालयाच्या एका कोंपऱ्यांत अखंड पडून राहिलें-तें इतकें कीं, प्रस्तुत चरित्राचे कर्ते रा. बाळकृष्ण नारायण देव कीं रा. राजारामशास्त्री भागवत ह्याचा इतिहाससंशोधक प्रो. द. वा. पोतदार यांच्यासारख्या चांगले ज्ञाते







म्हणविणाऱ्या विद्वानांनासुद्धां भ्रम उत्पन्न झाला !*

## चरित्रप्रबंधांतील न्यूनता

शास्त्रीबोवांचें आद्य लघुचरित्र ह्या दृष्टीनें रा. देवांच्या कृतीचें गुणवैशिष्ट्य वर सांगितलें. परंतु त्यांतसुद्धां अनेक न्यूनता व चुका आढळतात. वस्तुस्थिति अशी कीं, त्या काळींच कै. बाळशास्त्री यांच्या चरित्राचीं मूळ साधनें आजच्यापेक्षां किती तरी अधिक प्रमाणांत मिळविणें शक्य होतें. पोंभुर्लें, राजापूर, सावंतवाडी, पुणें, पंढरपूर, इत्यादि ठिकाणीं त्यांचे अनेक वृद्ध आप्तस्वकीय व ऋणानुबंधी लोक जिवंत होते. त्यांजकडून त्यांच्यासंबंधींची बरीच कौटुंबिक व अन्य माहिती आणि खाजगी पत्रव्यवहारादि कागदपत्र हीं प्रयत्नान्तीं संपादितां आलीं असतीं. तेंसच अधिक शोधान्तीं 'दर्पण,' 'दिग्दर्शन,' 'प्रभाकर,' 'धूमकेतु' इत्यादि जुन्या व महत्त्वाच्या नियतकालिकांचे वर्षसंग्रह–निदान कांहीं अंक ठिकठिकाणीं लोकांकडे उपलब्ध झाले असते. मुंबई सरकारच्या दप्तरखान्यांतील माहिती मिळवून आज तेथून व मुंबई नेटिव्ह जनरल लायब्ररींतून नामशेष झालेलीं किती तरी नियतकालिकें व पुस्तकें पाहातां आलीं असतीं. बाळशास्त्री यांचे समकालीन स्नेही व शिष्य यांच्या प्रत्यक्ष गांठीभेटी घेऊन अनेक गोष्टींवर अधिक प्रकाश पाडतां आला असता. त्याचप्रमाणें विशेषतः १८९० पर्यंत कै. बाळशास्त्र्यांचे विद्वान् स्नेही व सहकारी रा. भाऊ महाजन हे नागपुरास विद्यमान असल्यानें त्यांजकडून व त्यांचे चिरंजीव रा. बळवंतराव यांच्याकडूनहि बरीच महत्त्वाची माहिती व साधनसामग्री हस्तगत करतां आली असती. सारांश, ह्याप्रमाणें शक्य तीं सर्व साधनें एकत्र जुळवून रा. देव हे जर तेव्हां चरित्रलेखनास एकदोन वर्षें स्वतःस वाहून घेते, तर त्यांजकडून कै. बाळशास्त्री यांचें बरेंच विस्तृत, विश्वसनीय व वाचनीय चरित्र खात्रीनें निपजलें असतें. तसेंच असेंहि मनांत आल्याशिवाय राहत नाहीं कीं, हें कार्य करण्यास त्यांच्यापेक्षांहि त्यांचे स्नेही प्रो. राजारामशास्त्री भागवत हे सर्वतोपरि अधिक योग्य असून कोंकणपट्टी व मुंबई यांच्याशीं निगडित असल्याकारणानें त्यांनीं ही कामगिरी स्वतःकडे घेऊन पार पाडावयास हवी होती. कारण, इंदूरसारख्या दूर ठिकाणीं सतत वास्तव्य करून किंवा पुणें–मुंबईकडे एकदोन महिने तात्पुरतें राहून रा. देवांना हा महदुद्योग झेपणें केवळ अशक्य होतें. शिवाय शंभरांवर वर्षांपूर्वीं होऊन गेलेल्या थोर पुरुषासंबंधीं शोधपूर्वक सर्व साधनसामग्री संपादून त्याचें सांगोपांग, साधार व सुरेख चरित्र लिहिणें हें कार्य किती प्रयासाचें, कालावधीचें व आंतवट्ट्याचें आहे, हें तें प्रत्यक्ष करून पाहणाऱ्यासच कळणें शक्य आहे ! आरामशीरपणें किंवा पोटापाण्याचे वगैरे सर्व उद्योग सांभाळून तें समाधानकारक रीतीनें क्वचितच पार पाडतां येईल; आणि म्हणूनच मुख्यतः कै. बाळशास्त्री जांभेकर यांचें विस्तृत चरित्र आजपर्यंत लिहिलें गेलें नाहीं, आणि रा. बा. ना. देवकृत पूर्वोक्त लघुचरित्रावर सर्वांना कशीबशी तहान भागवावी लागली आहे !

असो. आतां प्रस्तुत चरित्रांतील कांहीं न्यूनता व दोष ह्यांचें दिग्दर्शन करूं. ह्यांतील ठळक न्यूनता म्हणजे ह्यांत निश्चित स्वरूपाची खाजगी व इतर माहिती फार थोडी आहे. पहिल्या भागांत 'विषयोपक्रम' केल्यानंतर **भाग २ मध्यें 'कुलवृत्तांत, बाल्यावस्था, विद्योपार्जन व अध्यापकत्व'** इतक्या गोष्टींचा लेखकानें समावेश केला आहे. कुलवृत्तांत कथन करतांना कै. बाळशास्त्री यांची वंशावळ व जन्मतिथि सुद्धां त्याकाळीं चरित्रकर्त्यास देतां आलेली नाहीं ! त्यांचे वडील वे. शा. सं. गंगाधरशास्त्री हे मूळचे पोंभुर्लेकर असले, तरी त्यांच्या निपणज्यापासून त्यांच्या घराण्याकडे श्रीमंत सावंतवाडीकरांकडून आजतागायत राजपुराणिकाची वृत्ति चालत आली आहे, आणि तिकडेहि त्यांचे भाऊबंद नित्य

* " बाळशास्त्री यांचें चरित्र इंग्रजींत कोणा Political कृपीनें लिहिलें आहे. मराठींत कै. राजारामशास्त्री भागवत व कै. ओक बालबोधकर्ते व रा. बा. ना. देव ( इंदूर ) यांनीं लिहिलें आहे."

—मराठी गद्याचा इंग्रजी अवतार, पृ. ३८







वास्तव्य करून आहेत, ही महत्त्वाची गोष्ट येथें सांगितलेली नाहीं. शिवाय त्यांच्या मातुःश्रीचें नांव सौ. सगुणाबाई होतें, आणि ती साध्वी आपल्या द्वितीय पुत्राचा अद्वितीय नांवलौकिक ऐकण्यास राहिली नाहीं; वडील गंगाधरशास्त्री बरेच वृद्ध होऊन सन १८४० चे सुमारास वारले, आणि त्यांच्या देखतच त्यांचे ज्येष्ठ पुत्र रा. नारायणशास्त्री तसेंच सौ. चिमाबाई योगी व सौ. लाडकीबाई जानवेकर ह्या दोन कन्याहि निवर्तल्यामुळें त्या सज्जन गृहस्थांना वृद्धापकाळीं फार दुःख झालें; इत्यादि वृत्तान्त रा. देवांच्या चरित्रांत आढळत नाहीं. किंबहुना बाळशास्त्र्यांचें पहिलें कुटुंब त्यांच्या विशींतच वारल्यामुळें १८३३ चे सुमारास त्यांचा द्वितीय संबंध पंढरपुराकडील कविवर्य मोरोपंत यांच्या आप्तवर्गांतील रा. देवस्थळी यांच्या कन्येशीं झालेला असून तिचें सासरचें नांव सौ. सुंदराबाई होतें, ही माहिती आज आम्हांला कष्टानें मिळत असतां ती रा. देवांना देतां आलेली नाहीं!

कै. बाळशास्त्र्यांची जन्मकुंडली राहिली, पण निदान शक–जन्मतिथि तरी चरित्रकारानें निश्चित द्यावी, तर तेंहि नाहीं! त्यांचा जन्म सन १८१० मध्यें झाला, असें 'बॉंबे टाइम्स' मधील त्यांच्यावरील मृत्युलेखांत जें एकदां मोघम विधान कोणींतरी केलें –कोणत्या आधारें तें न कळे!– त्याचीच पुढें सर्वांनीं 'री' ओढलेली असल्यानें हेंच साल रा. देवांनीं नमूद केलें आहे. परंतु स्वतः बाळशास्त्री यांनीं २० फेब्रुवारी १८३० तारखेला मुंबई नेटिव्ह एज्युकेशन् सोसायटीचे युरोपियन् सेक्रेटरी कॅप्टन् जॉर्ज जर्व्हिस यांस त्या संस्थेच्या नेटिव्ह सेक्रेटरीच्या जागेवर आपल्याला नेमून घेण्यासंबंधीं जो स्वदस्तूरचा इंग्रजी अर्ज केला आहे त्यांत "**माझें वय सांप्रत सतरा वर्षांचें आहे**" ("My age is now seventeen years") असें स्पष्ट लिहिलें आहे. म्हणजे त्यांचा जन्म सन १८१३ च्या आरंभीं कदाचित् नसला तर सुमारें १८१२ च्या उत्तरार्धांत असला पाहिजे– तो १८१० असणें मुळींच शक्य नाहीं! अर्थात् हा मूळ पायाच चुकीचा ठरला म्हणजे १८४६ सालीं मरण पावल्यावेळीं ते पसतीस वर्षांचे होते, हा अंदाजहि चुकलाच! त्यवेळीं त्यांची तेहतिशी उलटलेली असावी, असें वास्तविक म्हटलें पाहिजे.

वडिल गंगाधरशास्त्री यांना शंकरशेट घराण्याचा आश्रय होता आणि त्यांचा 'बाळ' मुंबईस प्रथम आला तेव्हां तो फार गरीबींत होता, ह्या गोष्टीहि खऱ्या दिसत नाहींत. मुंबईंतील तत्कालीन सुशिक्षित ऐपतदार गृहस्थ व मुंबई नेटिव्ह एज्युकेशन् सोसायटीचे नेटिव्ह सेक्रेटरी रा. सदाशिव काशिनाथ उर्फ बापू छत्रे, हे गंगाधरशास्त्री यांस फार मानीत होते, आणि त्यांच्याच सांगण्यावरून शास्त्रीबोवांनीं आपला मुलगा त्यांजकडे इंग्लिश शिकण्याकरितां ठेविला, असें रा. ब. दादोबा पांडुरंग '**आत्मचरित्रां**'त स्पष्ट सांगतात. अर्थात् बाळशास्त्र्यांच्या अलौकिक स्मरणशक्तीची म्हणून मुंबईंतील गोऱ्या शिपायांच्या मारामारीसंबंधींची जी आख्यायिका बहुमुखीं झाली आहे, तिला खरा आधार काय हें नीटसें समजत नाही.

प्रो. बाळशास्त्री यांनीं कोलभाट गल्लींत स्वतःचें घर बांधिलें होतें, आणि हे त्या काळच्या मूठभर प्रख्यात जे. पी. पैकीं एक असून सुप्रीम कोर्टांतलि ग्रँड जूरर होते, ही माहितिसुद्धां रा. देवांना देतां आलेली नाहीं. तसेंच '**दर्पण**' वृत्तपत्र व '**दिग्दर्शन**' मासिक ह्यांच्या केवळ नामनिर्देशापलीकडे त्यांनीं प्रायः कांहींच माहिती दिलेली नाहीं! अशाच प्रकारचे दुसरेहि कांहीं तपशील आज आपणांस महत्प्रयासानें कां होईना पण जर उपलब्ध होतात, तर पन्नास वर्षांपूर्वी चरित्रकर्त्यास ते कमी कष्टानें मिळाले नसते काय?

## कांहीं चुका व दोषस्थळें

आतां प्रस्तुत निबंधांतील कांहीं महत्त्वाच्या चुका व दोषस्थळें सादर करूं. रा. देवांनीं बॉंबे नेटिव्ह एज्युकेशन् सोसायटीचे वार्षिक वृत्तान्त फारसे वाचलेले दिसत नाहींत. एरवीं "ज्योतिषशास्त्रासारख्या प्रयोगपर व मानसशास्त्रासारख्या विचारपर शास्त्रांत इतर विद्यार्थ्यांबरोबर त्यांचा प्रवेश वर्गांत झाला होता" (पृ. ४), अशी बाळशास्त्र्यांच्या पाठशालीन प्रगतीसंबंधीं केवळ काल्पनिक माहिती त्यांनीं दिली नसती! शाळेंत भूगोलाच्या पाठांतून जें अल्पस्वल्प








ज्योतिषविषयाचें ज्ञान त्यांना झालें असेल तेवढेंच, आणि शाळेच्या अभ्यासक्रमांत मानसशास्त्र येणारच कोठून? वस्तुस्थिति अशी कीं, बाळशास्त्री हे अगदीं असामान्य कोटींतील विद्यार्थी असल्यामुळें एकदा त्यांचा इंग्रजी भाषेंत सत्वर चांगला प्रवेश होतांच त्यांनीं स्वप्रयत्नानें एकामागून एक नाना शास्त्रें भराभर हस्तगत केलीं.

" एल्फिन्स्टन विद्यालयांत सन १८२९ सांत त्यांस गणित शास्त्राचे अध्यापक ( प्रोफेसर ) ऑर्लिबार यांचे हाताखालीं उपाध्यापका ( असिस्टंट प्रोफेसर )–ची जागा देण्यांत आली; व पुढें थोड्याच वेळांत त्यांस त्याच ठिकाणीं अध्यापक–( प्रोफेसर )–ही नेमण्यांत आलें " (पृ. ४), हें रा. देवांचें विधान वस्तुस्थितीस सर्वथा सोडून आहे. सन १८२९ मध्यें रा. बाळशास्त्री हे एल्फिन्स्टन् सेंट्रल इंग्लिश स्कूलमध्यें दरमहा १५ रु. वर केवळ गणितशिक्षक ( Tutor ) नेमिले गेले; आणि तेव्हां एल्फिन्स्टन् कॉलेज किंवा प्रो. ऑर्लेबार यांचें अद्यापि नांवहि नव्हतें ! १८३४ च्या अंतीं कॉलेजाची मुहूर्तमेढ रोवण्यांत आली, आणि १८३५ च्या आरंभीं प्रो. ऑर्लेबार यांचे पाय मुंबईस लागण्यापूर्वीच बाळशास्त्री यांची १५० रु. मासिक वेतनावर असिस्टंट प्रोफेसर म्हणून नेमणूक झाल्यामुळें ते अक्कलकोटच्या राजगुरुत्वाचें त्यागपत्र देऊन स्वस्थानीं विराजमान झाले होते ! तसेंच पुढें सात-आठ वर्षांनीं प्रो. ऑर्लेबार हे दोन वर्षांच्या रजेवर विलायतेस गेल्यावेळीं ( सन १८४२–४४ ) त्यांच्या जागीं बाळशास्त्र्यांना 'ॲक्टिंग प्रोफेसर ऑफ मॅथेमॅटिक्स अँड नॅचरल सायन्स' होण्याचा अपूर्व बहुमान मिळाला, असा हा खरा इतिहास आहे. त्याचप्रमाणें "सन १८२९ त मिळालेलें अध्यापकाचें काम शास्त्रीबोवांनीं सन १८४२ पर्यंत निर्वेधपणें चालविलें." (पृ. ५), हें म्हणणें प्रथमतः सर्वस्वीं खरें नाहीं; कारण, वर सांगितल्याप्रमाणें १८३२ ते १८३४ पर्यंत मध्यन्तरींचीं सुमारें दोन वर्षें ते अक्कलकोटकर युवराज श्रीमंत शाहाजीराजे यांस शिक्षक नेमिले गेले होते. आणि लगेच पुढें, "याच सुमारास मुंबई इलाख्यांतील शाळा तपासण्याचें हल्लींच्या विद्याखात्यांतील तपासनीसाचें ( Educational Inspector ) काम त्यांजकडे आलें. हें काम शास्त्रीबोवांनीं दोन अडीच वर्षें केलं; " असें म्हणतांना हें 'इन्स्पेक्टर'चें काम बाळशास्त्री यांनीं दोनअडीच वर्षें स्वतंत्रपणें बारमहा केलें, अशी लेखकाची जी समजूत झालेली दिसते तीहि चुकीची आहे. कॉलेजांतील अध्यापनाचें काम वर्षांतून सुमारें आठनऊ महिने करून शेवटचे तीनचार महिने हें शाळातपासनिसाचें काम त्यांस करावें लागे. शिवाय त्यांना "मुंबई इलाख्यांतील शाळा" तपासावयाच्या नसून केवळ दक्षिण महाराष्ट्र व कोंकण ह्या विभागांतील शाळा तपासावयाच्या असत; आणि ह्या अवधींत त्यांना ४५० रु. मासिक वेतनाव्यतिरिक्त १५० रु. मासिक भत्ताहि मिळत असे. अशा प्रकारचीं प्रमादस्थलें पाहतां रा. देवांनीं तत्कालीन बोर्ड ऑफ् एज्युकेशनचे वार्षिक वृत्तान्तहि नीटसे वाचलेले दिसत नाहींत, असें कष्टानें म्हणावें लागतें.

निबंधाच्या **तिसऱ्या भागांत** लेखकानें **'सहाध्यायी व छात्रवर्ग'** यांची माहिती दिली आहे. येथें 'सहाध्यायी' ह्या शब्दाचा अर्थ 'वर्गबंधु' असा केल्यास–आणि तोच यथार्थ होय–ह्यांतील कांहीं वृत्तान्त चुकीचा दिसतो.

"कै. रा. ब. दादोबा पांडुरंग तर्खडकर (महाराष्ट्रव्याकरणाचे कर्ते) हे शास्त्रीबोवांचे पहिले सहाध्यायी होत," (पृ. ६) ही वस्तुस्थिति नव्हे. **स्वतः** दादोबाच 'आत्मचरित्रां'त सांगतात कीं, पहिल्या वर्गांत हरिश्चंद्र हरिशंकर, बाळ गंगाधर शास्त्री, मोरोबा कान्होबा, जनार्दन अप्पाजी गाडगीळ, जनार्दन वासुदेवजी प्रभृति विद्यार्थी असून "पुढें लौकरच ( मी ) वरच्या वर्गांत चढून पहिल्या वर्गांत चढलों" (पृ. २६), म्हणजे त्यांचें 'सहाध्यायित्व' त्यांस अगदीं शेवटीं थोडा वेळ लाभलें. शिवाय ह्याच वेळीं "Goldsmith's Geography हा भूगोलाचा ग्रंथ... (व) तिसऱ्या प्रहरीं Keith on the Globe यावरून Latitude व Longitude वगैरे··· विषय मुख्यत्वें बाळशास्त्री हेच शिकवीत असत." ह्या सर्व वृत्तान्तांत, देवांच्या समजुतीप्रमाणें "परलोकवासी नौरोजी फर्दुनजी हे










अनुक्रमणिका

शास्त्रीबोवांचे **दुसरे** सहाध्यायी व जोडीदार" (पृ. ६) व "कै. भाऊ महाजन हे शास्त्रीबोवांचे **तिसरे** गुरुबंधु" अशी स्थिति असतां, त्यांचा उल्लेख दादोबा मुळींच करीत नाहींत! आणि हे दोघेहि त्यांचे "सहाध्यायी" नव्हेत, हीच वस्तुस्थिति दिसते. शेट नौरोजी यांचा जन्मच मुळीं १८१७ सालीं. म्हणजे, कांहीं नाहीं तरी ते बाळशास्त्र्यांपेक्षां पांच वर्षांनीं लहान, आणि १८३० मध्यें —रा. बाळशास्त्री एज्युकेशन् सोसायटीचे डेप्युटी नेटिव्ह सेक्रेटरी झाल्यावेळीं— ते कोठें त्यांच्या इंग्रजी शाळेंत जाऊं लागले! पुढें १८३८ चे सुमारास "दुसरे असिस्टंट प्रोफेसर" म्हणून कॉलेजांत त्यांची कांहीं काळ नेमणूक झाल्यामुळें ते बाळशास्त्री यांचे तेथें "जोडीदार" झाले, ही गोष्ट मात्र खरी आहे. भाऊ महाजन यांचा जन्म लोकांनीं १८१५ चा दिलेला आहे; पण त्यांचीहि अभ्यासांतील प्रगति दादोबांच्या मानानें कमीच होती. म्हणजे तेहि तिसरे "सहाध्यायी" नव्हेतच. त्यांच्यासंबंधीं रा. देवांनीं केलेलीं दुसरीं विधानेंहि चिंत्यच आहेत. **'शब्दसिद्धिनिबंध'** हाच एक मराठी ग्रंथ "विनायकशास्त्री दिवेकर आणि गोविंद विठ्ठल माहाजन यांणीं बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर यांच्या साहाय्यानें केला." ही वस्तुस्थिति असतां भाऊ महाजन यांनीं "पुस्तकें रचण्यांत शास्त्रीबोवांस बरीच मदत केली" (पृ. ६) हें म्हणणें बरोबर नाहीं. शिवाय शास्त्रीबोवांच्या साहाय्यानें "इ. स. १८४० च्या प्रारंभीं त्यांनीं **'प्रभाकर'** नांवाचें वर्तमानपत्र काढलें," ही तर स्पष्टच चूक आहे. **'प्रभाकरा'** चा पहिला अंक २४ ऑक्टोबर १८४१ रोजीं निघाला!

भाग ४ ह्यांत **'सामाजिक सुधारणा'** हा विषय रा. देव यांनीं विवरिला असून त्यांत शेवटीं श्रीपाद शेषाद्रीच्या पतितपरावर्तनाचा वृत्तान्त कथन केला आहे. तो एकंदरींनें विशेष आक्षेपार्ह नसला तरी त्यांत असावा तसा बारकावा आढळत नाहीं. हें प्रकरण प्रथम कसें उपस्थित झालें, आणि मुंबईच्या सुप्रीम (म्ह. हाय—) कोर्टांत मिशन त्यांवर दावा लावून श्रीपादाला त्याच्या बापानें सोडवून कसें घेतलें, ही सर्व हकीकत व त्या प्रकरणाचें निवाडापत्र 'ओरियंटल क्रिश्चन् स्पेक्टेटर' नामक डॉ. वुइल्सन् यांच्या सुप्रसिद्ध क्रिस्ती मासिकांत इत्थंभूत पाहावयास मिळतें (डिसेंबर १८४३). परंतु ती हकीकत प्रस्तुत चरित्रकर्त्याच्या गांवींहि नाहीं! शिवाय 'ज्ञानोदय', 'प्रभाकर', 'उपदेशचंद्रिका' इत्यादि तत्कालीन मराठी नियतकालिकांत प्रस्तुत प्रकरणीं कित्येक महिने चांगलीच खडाजंगी चालू होती. रा. बाळशास्त्र्यांच्या विरुद्ध उभारलेल्या ग्रामण्यांत तत्कालीन श्रीशंकराचार्य आणि पुणें, मुंबई, त्र्यंबकेश्वर, काशी इत्यादि ठिकाणचे मोठमोठे वैदिक व शास्त्री यांचीं अनेक परस्परविरुद्ध पत्रकें व शास्त्रनिर्णय निघून अखिल हिंदु समाजांत मोठीच खळबळ उडाली होती! परंतु ह्या संबंधींची मूळ पुराव्यानिशीं चर्चा करण्याच्या भानगडींत रा. देव पडले नाहींत. इतकेंच नव्हे, तर रे. नारायण शेषाद्रि हा या वेळीं एक विशींतला ब्राह्मण तरुण असून त्याचा धाकटा भाऊ श्रीपत हा तर सुमारें बारा वर्षांचा केवळ अज्ञान मुलगा होता, हेंहि त्यांना स्पष्टपणें उमगलेलें नसावें असें वाटतें! त्यांनीं ही माहिती बरीचशी कर्णोपकर्णीं स्वीकारिलेली असावी. एरवीं "हें ग्रामण्यप्रकरण पांच वर्षें चाललें असें म्हणतात." (पृ. १२), असें चुकीचें विधान त्यांनीं केलें नसतें. वस्तुतः हा कालावधि दोनअडीच वर्षांपेक्षां अधिक नव्हता. तथापि एकंदरींनें पाहूं जातां **'सामाजिक सुधारणा'** (**भाग ४**) व **'धर्म'-मतें व धर्मसुधारणा'** (**भाग ५**) ह्यांतील रा. देवांच्या विवेचनावरून तत्कालीन परिस्थितीची व शास्त्रीबोवांच्या विचारसरणीची बरीच चांगली कल्पना करतां येते ह्यांत शंका नाहीं.

प्रस्तुत चरित्रांतील प्रत्येक भागाचें बारकाईनें परीक्षण करण्याचें येथें योजिलें नसल्यामुळें त्याचे जे भाग सामान्यतः संमत होण्यासारखे आहेत त्यांविषयीं अधिक लिहिण्याचें कारण नाहीं, आणि तसें करण्यास येथें अवकाशहि नाहीं. तथापि **'ग्रंथकर्तृत्व व निबंधरचना'** (**भाग ७**) ह्या-








विषयीं दोन शब्द लिहिणें अवश्य आहे. ह्यांतीलहि कांहीं माहिती चुकीची आढळते, आणि त्यावरून रा. देवांनीं बाळशास्त्री यांच्या व इतर अनेक ग्रंथांचा साक्षात् परिचय मुळांत जाऊन करून घेतला होता, असें दिसत नाहीं. अगदीं आरंभींच ते लिहितात, " आमच्या चरित्रनायकानें ज्यावेळीं विद्यालय सोडलें त्यावेळीं गद्यग्रंथसंबंधानें मराठी भाषा अगदीं बाल्यावस्थेंत होती.... गंगाधरशास्त्री फडके यांनीं ' मराठी व्याकरण ' म्हणून एक पुस्तक केलें होतें; परंतु त्याचा प्रसार फार कमी होता " (पृ. १६). तथापि प्रस्तुत विधानांतील पूर्वार्ध वस्तुस्थितिनिदर्शक असला तरी उत्तरार्ध निरपवाद नाहीं. प्रथमतः गंगाधरशास्त्र्यांच्या पुस्तकाचें नांव ' **मराठी व्याकरण** ' असें नसून ' **महाराष्ट्रभाषेचें व्याकरण** ' हें आहे. दुसरी गोष्ट म्हणजे, लेखकाची अशी समजूत दिसते कीं, रा. बाळशास्त्र्यांनीं "ज्यावेळीं विद्यालय सोडलें त्यावेळीं" हें पुस्तक छापलें होतें. परंतु त्याची पहिली आवृत्ति " सन १८३६ जानेवारी तारीख १"रोजीं, म्हणजे बाळशास्त्री यांनीं विद्यालयीन अभ्यासक्रम संपविल्यानंतर सहासात वर्षांनीं निघाली. ह्या व्याकरणाचा " प्रसार फार कमी होता, " हेंहि चूकच. ह्याच वर्षी डिसेंबर महिन्यांत दादोबा पांडुरंग यांचें ' **मराठी भाषेचें व्याकरण** ' जरी प्रसिद्ध झालें, तरी १८५० पर्यंत फडक्यांच्या पुस्तकाच्याच अधिक आवृत्ति निघाल्या होत्या. तथापि ह्या विधानांतील ह्यापेक्षांहि विशेष सूचक गोष्ट म्हणजे स्वतः बाळशास्त्र्यांचें ' **बालव्याकरण** ' हेंहि निदान फडक्यांच्या व्याकरणाइतकेंच जुनें आहे, ह्याविषयीं रा. देवांचें अज्ञान येथें दिसून येतें! ह्यानंतर "एल्फिन्स्टनकृत हिंदुस्थानाच्या इतिहासाच्या आधारें आपल्या देशाचा इतिहास त्यांनीं रचिला होता; परंतु हा ग्रंथ त्यांच्या हातून चांगल्या रीतीनें शेवटास गेला नाहीं. त्यांच्या मरणानंतर तो मेजर क्यांडी यांनीं सन १८५१ त छापून प्रसिद्ध केला." (पृ. १७), आणि पुनः त्याच पृष्ठावर ' **हिंदुस्थानाचा प्राचीन इतिहास** ' (मुसलमानी अंमल) शास्त्रीबोवांनीं लिहिला होता व तो शाळांच्या अभ्यासांत दाखल झाला होता, " अशी माहिती ते देतात. परंतु ती सर्वथा चुकीची आहे. वरीलपैकीं दुसऱ्या ग्रंथाचें खरें नांव ' **हिंदुस्थानाचा इतिहास** ' एवढेंच असून त्याच्या आरंभीं ' **प्राचीन** ' हिंदु राज्यांचा अल्प वृत्तान्त देऊन मगच ' मुसलमानी अंमल ' त्यांत अधिक विस्तारानें वर्णिला आहे. हेंच तेवढें पुस्तक बाळशास्त्री यांनीं " नामदार एल्फिन्स्तन साहेब यांच्या ग्रंथाचा संक्षेप करून केलें " होतें, इतकेंच नव्हे, तर त्यांच्या मृत्यूपूर्वीं तें छापून तयार झालें होतें, असें त्याच्या पहिल्या आवृत्तीच्या मुखपृष्ठावरून अनुमान होतें. कारण, ह्यांत त्यांच्या पश्चात् मेजर क्यांडी यांनीं छापून प्रसिद्ध केलेल्या ' **हिंदुस्थानांतील इंग्लिशांच्या राज्याचा इतिहास** ' ह्या पुस्तकाच्या मुखपृष्ठावर, " **माजी** बाळ गंगाधर शास्त्री जांभेकर " असें जें ग्रंथकाराचें नांव दिलेलें आढळतें तें तसें दिलेलें नाहीं. शिवाय हा दुसरा ग्रंथ रा. देव म्हणतात तसा " एल्फिन्स्टनकृत हिंदुस्थानाच्या इतिहासाच्या आधारें " लिहिलेला नसून " इंग्रजी भाषेंतलि मूळ ग्रंथांवरून संक्षेपरूपानें " केलेला आहे. वरील विधानांतील आणखी एक चूक म्हणजे हा ग्रंथ " मेजर क्यांडी यांनीं सन १८५१ त छापून प्रसिद्ध केला " नसून १८४९ मध्यें प्रसिद्ध केला होता !

" याशिवाय शास्त्रीबोवांनीं इंग्लंडचा इतिहास लिहिला, मरेनें केलेलें व्याकरण शोधलें, भूगोलशास्त्र, ज्योतिषशास्त्र आणि गणितशास्त्र इतक्या विषयांवर ग्रंथ रचिले. " (पृ. १७) असें रा. देव मोघम रीतीनें सांगतात, ह्यावरून व लागलीच पुढील वाक्यांत ' हे ग्रंथ हल्लीं फारसे उपलब्ध दिसत नाहींत, " असें म्हणतात ह्यावरूनहि त्यांची ही सर्व नोंद केवळ सांगोवांगी केलेली दिसते ! शास्त्रीबोवांनीं " इंग्लंडचा इतिहास लिहिला " नाहीं, तर गोल्डस्मिथच्या 'History of England' ह्या ग्रंथाचें ' **इंग्लंड देशाची बखर** ' म्हणून भाषांतर केलें. " मरेनें केलेलें व्याकरण " हा मूळ इंग्रजी ग्रंथ प्रचंड असून त्याच्या केवळ **इंग्रजी संक्षेपाचें** जें **मराठी भाषांतर** रा. राघोबा जनार्दन वसईकर नामक गृहस्थानें केलें तें बाळशास्त्री यांनीं " शोधलें " म्हणजे " शुद्ध केलें. " ' भूगोल-

शास्त्र ’ असें पूर्वोक्तग्रंथाचें व्यापक स्वरूप नसून **‘भूगोलशास्त्र–गणित भाग’** असा तो आहे. बाळशास्त्री यांनीं ज्योतिष विषयावर कांहीं महत्त्वाचे लेख **‘ दिग्दर्शन ’** मासिकांत लिहिलेले आढळतात; परंतु ‘ ज्योतिषशास्त्र ’ म्हणून त्यांनीं स्वतंत्र लिहिलेला ग्रंथ पाहण्यांत किंवा ऐकिवांत नाहीं. तसेंच ‘ गणितशास्त्र ’ ह्या विषयावर त्यांनीं ग्रंथ रचिला असें मोघम विधान काय कामाचें ? त्या ग्रंथाचें नांवच कां दिलें नाहीं ? गणितशास्त्रांतील कोणत्या भागावरील ग्रंथ तो समजावयाचा ? त्यांनीं **‘ शून्यलब्धिगणित ’** मात्र रचिलें होतें, हें दादोबांच्या **‘ आत्मचरित्रा ’** वरून निश्चित समजतें. परंतु १८९२ सालीं सुद्धां त्या अपूर्व ग्रंथाचा विद्वानांना मागमूस नव्हता, असें रा. देवांच्या लिहिण्यावरून दिसतें ! “ बाळशास्त्री आणि भाऊ महाजन या उभयतांनीं मिळून **‘ शब्दसिद्धिनिबंध ’** नांवाचें पुस्तक रचिलें ” ( पृ. १७ ), हें म्हणणेंहि तंतोतंत खरें नाहीं. प्रस्तुत पुस्तकाच्या कर्त्यांमध्यें वरील दोन नांवांच्या अगोदर प्रथमस्थानीं विनायकशास्त्री दिवेकर यांचेंहि नांव आहे. अर्थात् त्याचें कर्तृत्व केवळ दोघांकडे नसून त्रिवर्गांकडे आहे.

हें झालें कै. बाळशास्त्र्यांच्या ग्रंथरचनेसंबंधीं. त्यांच्या नियतकालिकांच्या संबंधांतहि रा. देवांनीं दिलेली त्रोटक माहिती बरोबर नाहीं. “ मुंबई इलाख्यांत प्रथम वर्तमान पत्र काढण्याचें श्रेय आमच्या निबंधनायकास देणें योग्य आहे ” ( पृ. १७ ), हें विधान बिनचूक होण्यास “ प्रथम वर्तमानपत्र ” ह्याच्याऐवजीं “प्रथम मराठी वर्तमानपत्र” असें म्हटलें पाहिजे. कारण, त्यापूर्वीं मुंबईंत कांहीं इंग्रजी व गुजराती पत्रें निघालेलीं होतीं. “ ‘ दर्पण ’ नांवाचें दर आठवड्यास निघणारें पत्र त्यांच्या मदतीनें **भाऊ महाजन यांनीं सुरू केलें.** या दोघांनीं मिळून हें पत्र कित्येक वर्षें चालविलें. ” ( पृ. १७ ) हें म्हणणें सर्वस्वीं काल्पनिक व विपर्यस्त होय ! तें रा. बाळशास्त्री यांनींच सुरू केलें, आणि ह्या उद्योगांत रा. रघुनाथ हरिश्चंद्रजी व रा. जनार्दन वासुदेवजी यांचें त्यांस साहाय्य होतें, ही गोष्ट ह्या त्रिवर्गांच्या सह्यानिशीं त्यांनीं ता. २ जानेवारी १८३२ रोजीं सरकाराकडे त्यांच्या आश्रयार्थ केलेल्या अर्जावरून सिद्ध आहे. त्यांत भाऊ महाजनांचा कांहीएक संबंध नाहीं. त्याचप्रमाणें, “ या पत्रांतील इंग्रजींतील मजकूर खुद्द शास्त्रीबोवा लिहीत ” हें खरें आहे, पण “ मराठींतील मजकूर त्यांचे गुरुबंधु व मित्र भाऊ महाजन लिहीत ” ( पृ. १८ ), हें म्हणणें निराधार व भ्रामक होय. शिवाय “ दर्पण ...... महाजन यांनीं सुरू केलें ” हें जर खरें असेल, तर मग “मुंबई इलाख्यांत प्रथम वर्तमानपत्र काढण्याचें श्रेय आमच्या निबंधनायकास देणें योग्य आहे, ” हें रा. देवांचें म्हणणें केवळ विसंगतच नव्हे काय ? हीं अनेक विधानें **‘दर्पण’** पत्राचा एकहि अंक न पाहतांच केलेलीं उघड दिसतात ! बरें, **‘दर्पण’** हें वर्तमानपत्र असल्यानें तें बंद पडून तेव्हां पन्नास वर्षें होऊन गेलीं होतीं म्हणून त्याचे अंक अत्यंत दुर्मिळ होते, असें कदाचित् म्हणतां येईल. परंतु सांप्रत सुद्धां **‘दिग्दर्शना’** चे अंक पराकाष्ठेचे दुर्मिळ असले तरी प्रयत्नान्तीं जर बरेच पाहावयास मिळूं शकतात, तर त्यांपैकीं निदान कांहीं मिळवून व वाचून पाहून त्यासंबंधीं चरित्रकारानें लिहावयास नको होतें काय ? पण “ **‘दिग्दर्शन’** नांवाचें **मासिक किंवा त्रैमासिक** पुस्तक शास्त्रीबोवांनीं सुरू केलें व बरींच वर्षें चालविलें, ” ह्या वाक्यावरून रा. देवांनीं प्रस्तुत नियतकालिकाचाहि एकसुद्धां अंक पाहिलेला नाहीं, हें अत्यंत स्पष्ट आहे ! कारण, हें नियतकालिक मासिक स्वरूपाचें निश्चित असतां, “ **मासिक किंवा त्रैमासिक** ” अशी पळवाट त्यांनीं ठेविली नसती !

“ बॉंबे ब्रँच आफ् दी रायल एशियाटिक सोसायटी ’, व ‘ जिओग्राफिकल सोसायटी ’...या दोन्ही सभांचे बाळशास्त्री सभासद होते ” (पृ १८), हें विधान अंशतःच खरें आहे. पहिल्या संस्थेच्या तत्कालीन नियमांप्रमाणें एतद्देशीय सद्गृहस्थांस तिचें रीतसर सभासदत्व त्या काळीं लाभणेंच शक्य नव्हतें ! दुसरीचे मात्र ते सभासद होते इतकेंच नव्हे, तर कार्यकारी मंडळांतहि ते अनेकदा निवडून आले होते. तसेंच ह्या संस्थांच्या “ मासिक पुस्तकांत त्यांनीं ......१०।१५ निबंध लिहिले आहेत ” (पृ.२० ) हें जर खरें तर प्रस्तुत निबंधाच्या शेवटीं **‘पुरवणी’** त लेखकानें अवघे सातच कां दिले आहेत ?










अनुक्रमणिका

सारांश, रा. देवांनीं दिलेली कांहीं माहिती चुकीची असून त्यांची कित्येक विधानें कांटेतोलपणानें केलेलीं नाहींत, हें दाखविण्यास एवढीं उदाहरणें पुष्कळ झालीं. दुसरी एक त्यांच्या लेखनांतील महत्त्वाची उणीव म्हणजे, उद्धृत केलेल्या उताऱ्यांचे स्पष्ट स्थलनिर्देश अथवा व्यक्तिनिर्देश ते करीत नाहींत. " ' **राजप्रकरणीं ऋषी** ' आपल्या निबंधांत म्हणतात " ( पृ. ५ ), "**एक नामांकित व सर्वमान्य विद्यार्थी** आपल्या एका पत्रांत लिहितो" ( पृ. ६ ), " प्रस्तुत निबंधाच्या नायकाच्या सहवासांत वरींच वर्षे राहिलेला **एक विद्वान् व नामांकित गृहस्थ** त्यांचें खालीं लिहिल्याप्रमाणें वर्णन करतो " ( पृ. १८ ), " त्यांच्या विद्याव्यासंगाच्या संबंधानें **एक सन्माननीय विद्वान् गृहस्थ** पुढील मजकूर लिहितो" (पृ. २०) "**एक गृहस्थ** लिहितो" ( पृ. २१ ), असे जागोजाग प्रच्छन्न उल्लेख त्यांनीं केले आहेत ! असें करण्याऐवजीं त्या त्या व्यक्तींचा स्पष्ट नामनिर्देश करण्यास अडचण कोणती ? ही गुप्तता त्या त्या गृहस्थांना खरोखर आवश्यक वाटत होती असें म्हणवत नाहीं. रा. देवांची ही विशिष्ट लेखनशैली असण्याचा बराच संभव आहे. एरवीं इतक्या दीर्घ कालावधीनंतर ती ती माहिती अगत्यपूर्वक देणाऱ्या व्यक्तींना ह्या अवगुंठनांत राहण्याचें किंवा ठेवण्याचें कारण काय ? तथापि ह्या अनिष्ट गुप्त नामपद्धतीमुळें त्या विशिष्ट नामांकित व्यक्ती कोण होत्या हें सांप्रत आपणांस मुळींच उमगेनासें झालें आहे ! आपणांस हीं नांवें जर स्पष्ट समजतीं तर त्या सद्गृहस्थांचा विशिष्ट अधिकार लक्षांत घेऊन त्यांच्या म्हणण्याचें यथार्थत्व अधिक चांगलें अजमावतां आलें असतें; इतकेंच नव्हे, तर कदाचित् त्यांच्या कित्येक वंशजांकडे कमीअधिक चौकशी करतां आली असती. शिवाय " ' **राजप्रकरणीं ऋषी** ' आपल्या निबंधांत म्हणतात " असा स्थूल उल्लेखहि काय कामाचा ? त्या निबंधाचें सबंध नांव काय आणि तो कोठें व कधीं प्रसिद्ध झाला होता, हें सांगणें आवश्यक नाहीं काय ? बरें, ह्या लेखास येथें ' **निबंध** ' म्हटलें आहे, तर ( पृ. २२ ) वर ' **राजप्रकरणीं ऋषि** ' हें नांव धारण करणाऱ्या एका विद्वान् गृहस्थानें शास्त्रीबोवांचें **संक्षिप्त चरित्र इंग्रजींत** लिहिलें आहे, त्यांतलि उतारे या पुस्तकांत कित्येक स्थळीं आले आहेत, " असा पुनः स्थूल निर्देश केला आहे ! ह्या संक्षिप्त चरित्राचें मूळ इंग्रजी नांव कोणतें ? तें चरित्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालें होतें कीं एखाद्या नियतकालिकांतून लिहिलें गेलें होतें ? तसें असल्यास कधीं व कोणत्या नियतकालिकांतून? आणि दिलेले उतारे कोणत्या पृष्ठावरचे आहेत? हा सर्व तपशील लेखकानें द्यावयास नको काय ? परंतु ह्यांपैकीं कशाचाच मागमूस येथें लागत नसल्यामुळें हे मूळचे फार महत्त्वाचे संदर्भ सांप्रत शोधून काढणें अत्यंत कठीण व प्रयासाचें झाल्यास नवल काय ? वस्तुतः पाहतां रा. देवांनीं आपला हा चरित्रपर निबंध सन १८९२ मध्यें प्रसिद्ध केला, आणि त्यांनीं अनेकदा उल्लेखिलेलें ' राजप्रकरणीं ऋषी ' कृत चरित्र किंवा निबंध म्हणजे सन १८८५ च्या '**इंदुप्रकाशां**' त आलेला तीनचार रकान्यांचा एक केवळ वर्तमानपत्री इंग्रजी लेख आहे असें दिसतें ! पण एका जुन्या व दुर्मिळ वर्तमानपत्राच्या वर्षसंग्रहांत दडून राहिलेला हा लेख आज कोणीं कसा शोधून काढावयाचा ? आम्हीं ठिकठिकाणीं जुनीं वर्तमानपत्रें बरींच चाळलीं आणि ह्या लेखाचा पुष्कळच पिच्छा पुरविला; तेव्हां कोठें हें 'राजप्रकरणीं ऋषीं'चें सर्व गौडबंगाल आम्हांस उमगलें ! प्रस्तुत इंग्रजी लेख शेवटीं परिशिष्टांत दिला आहे त्यावरून ह्याविषयीं वाचकांचीहि खात्री पटेल.

रा. देवांनीं आपल्या ह्या निबंधांत इतरत्रहि अनेक ठिकाणीं असेच स्थूलतः आधार दिले असून दुसऱ्या पुस्तकांतून उतारे उद्धृत करतांना तर कित्येक ठिकाणीं बरेंच शैथिल्य दाखविलें आहे. उदा. पृ. २२ वर ' **सरस्वतीमंडळ** ' -कर्त्यांचें म्हणून त्यांनीं जें एक अवतरण दिलें आहे तें मुळाशीं बारकाईनें ताडून पाहिल्यास त्यांत कित्येक शब्द कमीअधिक पडले आहेत, असें आढळून येईल. ह्या तपशिलाच्या गोष्टी खरोखर क्षुल्लक नव्हेत. अशा प्रकारचे अनेक दोष थोड्याशा साक्षेपानें सहज टाळणें शक्य असतें, आणि तसें केल्यानें स्वकीय लेखनाचें प्रामाण्य वाढून वाचकांसहि तें अधिक उपयुक्त व मार्गदर्शक झाल्यावांचून राहत नाहीं.








## 'कै. वा. बाळ गंगाधर शास्त्री जांभेकर यांचें चरित्र'

तथापि पूर्वोक्त नाना न्यूनता व लेखनप्रमाद जमेस धरूनहि रा. देवांनीं लिहिलेलें हें **'कै. वा. बाळ गंगाधर शास्त्री जांभेकर यांचें चरित्र'** आधुनिक पद्धतींचें विषयविवेचन, मनोवेधक भाषासरणि व समतोल वृत्ति ह्या दृष्टींनीं बरेंच वाचनीय व उद्बोधक झालें असून १८९२ नंतर प्रसिद्ध झालेल्या बाळशास्त्रिविषयक लेखांना व उल्लेखांना मुख्यत्वें आधारभूत झालेलें आहे ह्यांत तिळमात्र शंका नाहीं; आणि केवळ ह्याच दृष्टीनें तदंतर्गत न्यूनता व दोष हीं येथें कांहींशा विस्तारानें दाखविलीं आहेत. कारण, रा. देवांच्या ह्या प्रयत्नानंतर कै. बाळशास्त्र्यांच्या कालासंबंधीं वा चरित्रासंबंधीं अधिक संशोधन करण्याच्या भानगडींत प्रायः न पडतां पुढील लेखकांनीं त्यांचींच उच्छिष्टें घेऊन केवळ स्वकपोलकल्पित रचना अनेक ठिकाणीं केली आहे असें आढळून येईल!

प्रस्तुत ग्रंथाच्या परीशिष्टांत रा. देवांच्या कै. जांभेकर–चरित्रांतून अवघे दोनच उतारे नमुन्यासाठीं दिले आहेत. दुसरेहि कांहीं वाचनीय परिच्छेद देण्याचें मनांत होतें; परंतु स्थलसंकोचास्तव तसें करणें शक्य झालें नाहीं. तथापि १८९२ मधील हेमंतव्याख्यानमालेंत हा निबंध स्वतः वाचून दाखविण्यास लेखकाला येतां न आल्यामुळें तो प्रो. राजारामशास्त्री भागवत ह्यांनीं सभेपुढें वाचून दाखविल्यानंतर स्वतःस कै. बाळशास्त्री यांचे सहाध्यायी म्हणविणारे एक वयोवृद्ध सुशिक्षित गृहस्थ रा. रा. आत्माराम बापू दळवी ( यांचें वय यावेळीं पाऊणशें वर्षांच्यापुढें असावेसें वाटतें ! ) यांनीं जातीनें सभेस उपस्थित राहून स्वयंस्फूर्तीनें जें लहानसें, पण अतिशय जिव्हाळ्याचें व मार्मिक भाषण केलें तें, आणि त्या सभेचे विद्वान् व विख्यात अध्यक्ष प्रो. श्रीधर गणेश जिन्सीवाले, एम्. ए. यांनीं केलेलें समारोपाचें भाषण, हीं बुध्द्या 'इंदुप्रकाशांतून' परिशिष्टांत उद्धृत केलीं आहेत. त्यांवरून शास्त्रीबोवांची योग्यता सन १८९२ पर्यंत महाराष्ट्रांतील ज्ञाते व प्रतिष्ठित लोक काय समजत असत हें जसें निदर्शनास येतें, तसेंच पन्नास वर्षांपूर्वीं रा. दळवी यांनीं मुंबईकर सुशिक्षितांच्या प्रकट सभेंत " **असा विद्वान् असा सौजन्ययुक्त, असा लोकहिताविषयीं अंतःकरणपूर्वक झटणारा गृहस्थ हे शास्त्रीबोवा एकटेच झाले, परंतु अशा सद्गृहस्थांचें यत्किंचितहि स्मारक झालें नाहीं... हें आपणांला मोठें लांछनास्पद आहे !** " अशा खणखणीत शब्दांत जाणीव करून दिली होती. हें पाहून जितकें कौतुक वाटतें, तितकेंच त्या उत्कृष्ट लोकोपयोगी सूचनेनुसारहि–आज त्यांच्या मृत्यूस शंभर वर्षें होऊन गेलीं तरी–आपल्यांतील प्रसिद्ध व्यक्तींनीं व लोकाग्रणींनीं त्याविषयीं कांहींएक हालचाल केली नाहीं ह्याचें अगदीं सखेदाश्चर्य वाटतें !

---

# सरकारचे टीकाकार

श्री. ह. कृ. मोहनी

१५ ऑगष्टपासून आपणांस वसाहतीच्या स्वराज्याचे हक्क मिळाले आहेत व वसाहतीचें स्वराज्य ह्याचा अर्थ, ब्रिटिश कॉमनवेल्थमध्यें घटनात्मक दृष्टया जवळ जवळ राजकीय स्वातंत्र्य असाच करण्यांत येत आहे. हें स्वातंत्र्य आपणांस लढाई किंवा बंड न करितां, शांततेच्या मार्गानें मिळालेलें आहे, ह्यांत कांहीं शंका नाहीं. जगाच्या इतिहासांत हिंदुस्थानसारख्या अवाढव्य, चाळीस कोटी लोकसंख्येच्या देशास शांततेच्या मार्गानें स्वराज्याची प्राप्ति होणें ही अभूतपूर्व गोष्ट आहे. अशा स्वराज्यप्राप्तीमध्यें यशाचा वांटा कोणांस द्यावयाचा, कोणत्या घटनेस हें श्रेय मुख्यतः देतां येण्यासारखें आहे हा जरी वादग्रस्त मुद्दा होऊं शकत असला, तरी स्वराज्यप्राप्ति ही आतां वादग्रस्त राहिलेली नाहीं. वसाहतीचें स्वराज्य किंवा स्वातंत्र्य आपण प्रत्यक्ष उपभोगीत आहों.

## स्वातंत्र्य मिळूनही औदासीन्य !

ही अभूतपूर्व घटना प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांदेखत घडून आली आहे व ती शांततेनें घडून आली आहे, म्हणूनच कीं काय, तिची अपूर्वता देशांतील विचारी म्हणविणाऱ्या लोकांच्या, स्वतःस सुजाण समजणाऱ्या नागरिकांच्याही दृष्टीमधून निसटल्यासारखी दिसत आहे. स्वातंत्र्य आपणांस मिळालें आहे, ह्याचा आनंद फार थोडे जाणते, शिक्षित किंवा सज्ञान लोक अनुभवीत आहेत. मोठ्या प्रयासानें मिळणारी लोभनीय वस्तु आपल्या हातांत प्रत्यक्ष आणून ठेविली गेली आहे, ह्याबद्दल विजयोर्मि आणि हर्ष समज असलेल्या जनतेच्या हृदयांत उचंबळून येत आहेत असें दृश्य दिसत नाहीं. आणि म्हणून १५ ऑगष्ट नंतर एका नवीन वैभवशाली काळांत किंवा युगांत आपण येऊन पडलों आहों, नवीन अननुभूत आनंदानें भरलेली सृष्टिच आपल्या भोंवतीं पसरलेली आहे असा प्रत्यय पुष्कळांस आला आहे, असें अनुभवास येत नाहीं.

जणूं कांहीं हिंदुस्थानांत कांहीं विशेष झालेंच नाहीं, पूर्वीचाच रुळलेला, मामुली प्रगतीचा, राज्यकारभाराचा गाडा हिंदुस्थानांत हळूहळू रखडत चाललेला आहे अशीच भावना शिक्षित जनतेमधील बहुतांश लोकांची दिसून येते. नवीन वैभवशाली परिस्थितींत आपण आहों हें पुष्कळांस भासत नाहीं. एवढेंच नाहीं तर, सद्यःपरिस्थितींतील आशादायी, अंतःकरणें प्रफुल्लित करणारी स्वातंत्र्याची राजकीय बाजू निराशाजनक कशी भासवितां येईल, ह्यांतच शिक्षित लोक आपली बुद्धि खर्च करितांना दिसून येतात.

## औदासीन्याचीं कारणें

ही उलटी मनोवृत्ति कशामुळें घडून आली आहे, हें पाहणें जरूर आहे. कारण आपली उन्नति झपाट्यानें करण्यासारखी परिस्थिति आतां प्राप्त झालेली असतांना देखील आपण विषण्णता पदरीं बांधून घेत आहों. वारा अनुकूल लागला असतांना शिडें उभारण्याचें काम आम्हीं दिरंगाईवर टाकीत आहों. उलटा वारा खाण्याची संवय मनास जडल्यामुळें वाऱ्याची गति फिरली आहे हेंहि आमच्या लक्षांत येत नाहीं. वल्ह्यांवर हात ठेवून समुद्राच्या लाटांस








नांवें ठेवीत आम्ही काल व्यतीत करीत आहों.

रक्तपातानें घडून येणारी राज्यक्रांति हिंदुस्थानांत झाली असती तर राष्ट्रांतील सगळी जनता गदागदा हालविली गेली असती. सगळ्या समाजाचें मंथन तीव्रतेनें, वेगानें, अनेक प्रकारच्या भयंकर हालअपेष्टा अनुभवून घडून आलें असतें. सगळा समाज आमूलाग्र घुसळून निघाला असता. मुसळधार पाऊस पडून गेला म्हणजे नद्या-नाले दुथडी भरून येतात, पृथ्वीवरील खळमळ धुवून निघते, सगळीकडे शुद्धतेचा प्रसन्नतेचा अनुभव येतो. राज्यक्रांतीच्या प्रयत्नांत रक्ताचे पाट वाहले, हजारों लोक कापून निघाले, घरेंदारें जमीनदोस्त झालीं म्हणजे जमीनीवर अवाढव्य रोलर फिरविल्याप्रमाणें समाज दिसून येतो. राज्यक्रांति सफळ करणाऱ्या लोकांस कृतकृत्यता अनुभवास येऊन समाजाची मशागत नवीन विचारानें करण्याचा हुरूप येतो. आणि विरोधी मतें, प्रतिकूल बाजू किंवा पक्ष जमीनदोस्त झाल्यामुळें मनाजोगी समाजाची रचना करण्यास अनुकूलता प्राप्त होते.

हिंदुस्थानांतील राज्यक्रांति रक्तपातानें घडून आलेली नाहीं. ती हळूहळू शांततेच्या मार्गानें घडून आली आहे. आणि शांततेच्या मार्गानें घडून आल्यामुळेंच कीं काय ही क्रांति घडून आली आहे कीं नाहीं, असाहि संदेह कित्येकांच्या अंतःकरणांत उत्पन्न झालेला दिसून येतो. रक्तपाताच्या क्रांतीमुळें जी राज्यव्यवस्था बदलते, ती आकाशांत धुमकेतु उत्पन्न झाल्याप्रमाणें किंवा गिरसप्पाच्या धबधब्याप्रमाणें अखिल जनतेचें लक्ष–शिक्षित, अशिक्षित दोन्ही प्रकारच्या लोकसमूहाचें मन— आकर्षून घेऊं शकते. शांततेनें राज्यकारभार बदलला म्हणजे जनतेवर इतक्या तीव्र वेगानें नवीन राज्यकारभाराचे आघात पोहोंचत नाहींत. जादू आणि चमत्कार ह्यामुळें सामान्य मनुष्याच्या मनांत जितकी तात्कालिक आकर्षकता किंवा खळबळ उत्पन्न होते, तितकी सामान्य उपकारक घटनांमुळें किंवा व्यवहारामुळें त्याच्या अंतःकरणांत तशा प्रकारचा आघात करणारी, मनें बदलविणारी भावना निर्माण होत नाहीं. रक्तरंजित क्रांति व शांततेनें झालेली क्रांति ह्यांमध्यें सामान्य मनुष्याच्या भावनेच्या दृष्टीनें इतका मोठा फरक आहे. मानवी समाज वास्तविक रक्तपाताच्या क्रांतीनें खरा बदलतो कीं शांततायुक्त क्रांतीनें बदलतो हा विवाद्य मुद्दा येथें चर्चेस घ्यावयाचा नाहीं. एवढेंच दाखवावयाचें आहे कीं, सध्यांची राजवट आमूलाग्र बदललेली असली व तो बदल क्रांतिकारक असला तरी रक्तरंजित क्रांतीप्रमाणें आपल्या समाजांतील लोकांच्या मनाची उलटापालट झालेली दिसून येत नाहीं. शिक्षित व सुजाण म्हणविणाऱ्या लोकांस जर ह्या राज्यक्रांतीची जाणीव योग्य प्रमाणांत होऊं शकत नाहीं, तर अशिक्षित जनतेच्या लक्षांत हा राज्यकारभारांतील झालेला जमीनअस्मानचा फरक आला नाहीं, तर त्यांत कांहीं नवल नाहीं.

१५ ऑगस्टपासून हिंदुस्थानच्या राज्यकारभारांत क्रांतिकारक बदल झाला आहे. राज्ययंत्र आमूलाग्र बदललें आहे. राज्यकारभाराचा गाडा, ब्रिटिश पार्लमेंट, इंग्रजी अधिकारी व त्यांच्या धोरणाप्रमाणें चालणारे एतद्देशीय अधिकारी १५ ऑगस्टच्या पूर्वी चालवीत होते. हें सर्व दृश्य अजिबात बदलून आतां राज्यकारभार हिंदुस्थानचे अग्रगण्य पुढारी आपल्या स्वतःच्या धोरणानें चालवीत आहेत. ह्या पुढाऱ्यांस अग्रगण्य अशासाठीं म्हणावयाचें कीं त्यांना जास्तींत जास्त लोकसंख्येचा पाठिंबा आहे. निवडणुकीनें ही गोष्ट सिद्ध झालेली आहे. हिंदुस्थानानें लोकसत्तात्मक राज्यपद्धति स्वीकारलेली आहे आणि ह्या पद्धतींत सत्तेचें, अधिकाराचें स्थान निवडणूक हेंच आहे. निवडणुकीनें ही सत्ता नेहरूमंत्रिमंडळाकडे सोंपविली गेली आहे ही सिद्ध घटना असली, तरी ह्या नेहरू–मंत्रिमंडळास शिक्षित जनतेचा, विचार निर्माण करणाऱ्या लोकांचा पूर्ण पाठिंबा आहे, ह्या मंत्रिमंडळाबद्दल अढळ विश्वास, आदर व पूज्यभाव शिक्षित जनतेमध्यें खोल गेलेला आहे, असें चिकित्सकपणानें आपल्या समाजाचें सूक्ष्म निरीक्षण केल्यास म्हणतां येण्यासारखें नाहीं. आणि आपल्या राष्ट्राची प्रगति लवकर व्हावी, असा भावनात्मकतेनें जे विचार करतात त्यांना हें सद्यःकालीन राजकीय दृश्य किंवा घटना खेदजनक वाटल्यावांचून राहत नाहीं.



अनुक्रमणिका






हिंदुस्थानांत क्रांति झालेली आहे हें विधान बहुतेक लोकांस मान्य होण्यासारखें आहे. परंतु राज्यकारभार जे लोक करीत आहेत, ते सर्वस्वीं जनतेच्या आदरास पात्र आहेत ही भावना सार्वत्रिक आहे, असें म्हणतां येत नाहीं. रक्तरंजित क्रांति असती, लढाईंत जय मिळविणाऱ्या पक्षानें राज्यकारभार ताब्यांत घेतला असता व आपलें मंत्रिमंडळ बनविलें असतें, तर त्या मंत्रिमंडळाविरुद्ध इतक्या लवकर ब्र काढण्याची छाती कोणास झाली असती, असें म्हणतां येत नाहीं. रक्तरंजित क्रांतीनें निर्माण झालेल्या मंत्रिमंडळास वाटेल तें करण्याची मुभा, जनतेच्या हिताचा त्यांना योग्य वाटेल तो कार्यक्रम अंमलांत आणण्याची पूर्ण अनुकूलता कांहीं काळ तरी खास मिळाली असती, ह्यांत शंका नाहीं. परंतु आजच्या मंत्रिमंडळास निवडणुकीनें मिळालेला विजय प्राप्त झालेला असला तरी, प्रत्यक्ष भावनेचा खंबीर पाठिंबा त्याला मिळालेला आहे असें दिसत नाहीं. सद्यःस्थितीचा विचार करणारे व स्वतःस शिक्षित समजणारे लोक आपल्याच राज्यकारभारावर भरमसाट टीका करतांना मुळींच कचरत नाहींत. आपली जबाबदारी ओळखून निवडणुकींमध्यें आपणच दिलेल्या मतास जागृत राहून ते अशी टीका करितात असें बहुतांशीं आढळून येत नाहीं. ह्यामुळें नवीन राज्यकर्त्यांस राज्यकारभारांत सुधारणा घडवून आणण्यासाठीं जें इष्ट उपकारक वातावरण निर्माण व्हावयास पाहिजे, तें निर्माण होऊं शकत नाहीं. प्रांतिक राज्यकारभारांत असो, कीं मध्यवर्ती राज्यकारभारांत असो, निवडणुकींत ( overwhelming ) प्रचंड बहुसंख्येनें मतें मिळालेल्या मंत्रिमंडळाबद्दल आज बौध्दिक वातावरण निर्माण करणाऱ्या शिक्षित जनतेच्या मनांत हमखास पाठिंबा, आदर आणि पूज्यभाव ह्या भावना जागृत आहेत, असें बिलकुल म्हणतां येत नाहीं.

ह्या अनिष्ट घटनेचें **मुख्य कारण प्रातिनिधिक तत्त्वास जनता सरावलेली नाहीं, प्रातिनिधिक तत्त्वाचें बाळकडू जनतेस मिळालेलें नाहीं,** हेंच मुख्यतः आहे असें वाटतें. निवडणुकीची जबाबदारी ओळखणारी आपली जनता नाहीं. प्रातिनिधिक घटना आणि प्रातिनिधिक तत्त्वें जनतेवर बाहेरून लादण्यांत आल्यासारखीं झालेलीं आहेत. प्रातिनिधिक तत्त्वें जनतेमधून उत्स्फूर्त झालेलीं नाहींत. जनतेचा पिंड प्रातिनिधिक तत्वास अद्यापि पोषक बनलेला नाहीं. प्रातिनिधिक तत्त्वांचें केवळ नांव मात्र हिंदुस्थानांत रूढ आहे. त्या तत्त्वांचा खरा अर्थ, त्यांचें रहस्य, त्याबरोबर येणारी जबाबदारी व संयम अद्याप जनता जाणत नाहीं. आणि म्हणूनच आपणच निवडून दिलेल्या आपल्याच लोकांवर टीकेचें शस्त्र बेजबाबदारपणानें सरसहा चालविण्यास कोणास कांहींच वाटत नाहीं. टीका करण्यास लागणारी योग्य जबाबदारीची जाणीव टीका करणाऱ्यांमध्यें नाहीं, व टीका केल्यास कांहीं भीति वाटेल अशीहि, ही क्रांति शांततेनें घडून आल्यामुळें, परिस्थिति नाहीं. म्हणून टीकाकारांस आपल्या राष्ट्रांत रान अगदीं मोकळें मिळालेलें आहे.

### टीकाकार हे शिक्षित मध्यम वर्गामधले

ज्या मंत्रिमंडळास मध्यवर्ती सरकारांत व प्रांतिक सरकारांत अधिकार प्राप्त झालेला आहे, तो अधिकार कॉंग्रेस ह्या देशव्यापी संघटनेच्या तर्फे, तिच्या ह्यातीमुळें, लौकिकामुळें व अनेक वर्षांच्या राजकीय कार्यामुळें प्राप्त झालेला आहे. मध्यमवर्गीय शिक्षित लोकांचा भरणा कॉंग्रेस या संस्थेंत मुख्यतः झालेला नाहीं. कॉंग्रेसमध्यें पुढारी व कार्यकर्ते म्हणून मध्यम वर्गांतले लोक आहेत खरें; पण कॉंग्रेसचे लक्षावधि प्राथमिक सभासद अशिक्षित जनतेंमधूनच आलेले आहेत. ह्याच पद्धतींत अशिक्षित जनतेच्या (Masses च्या) बळावर आजचे प्रांतिक व मध्यवर्ती अधिकारी मंडळहि निवडून आलेलें आहे. ह्या कॉंग्रेसच्या अधिकारी मंडळावर टीका करण्याचें बौद्धिक कार्य अशिक्षित जनता करूं शकत नाहीं. त्याला ती पात्र नाहीं. सुशिक्षित म्हणविणारी जनताच हें टीकेचें शस्त्र पाजळीत असते. अशिक्षित जनतेस सध्याचें आपलें स्वराज्य कसा प्रकारचें आहे, त्याला कोणत्या मर्यादा आहेत, तें डोमिनियन स्टेटसच्या स्वरूपाचें आहे कीं निर्भेळ असें स्वातंत्र्य तें आहे, १५ ऑगस्टपूर्वी ब्रिटिश सरकारशीं हिंदुस्थानचें नातें कसें होतें, व त्यानंतर तें प्रस्तुत परिस्थितींत कितपत बदललें आहे, पाकिस्तानचे








व आपले सद्यःस्थितींत घटनात्मक संबंध कोणते आहेत ह्यासंबंधीं सूक्ष्म विचार करून आपलीं मतें बनवितां येत नाहींत. अशिक्षित जनता हिंदुस्थानच्या ब्रिटिश राष्ट्राशीं घटनात्मक संबंध समजून घेण्यास बुद्धीनें अपात्र आहे. परंतु आपल्या आजच्या स्वराज्याचें स्वरूप लक्षांत आणावयाचें असल्यास जिला बुद्धीनें तें लक्षांत आणतां येतें अशी शिक्षित जनता प्रस्तुतचें स्वराज्य, त्यांतील अडचणी, घटनात्मक संबंध समजून घेण्याचा कोणताहि प्रयत्न न करितां राज्यकारभार करणाऱ्या आपल्याच लोकांवर, आपणच निवडून दिलेल्या मंत्रिमंडळावर विध्वंसक टीकांचा भडिमार करण्यास मात्र सदैव उत्सुक असते, असें दिसून येत आहे.

## कॉंग्रेसवादी टीकाकार

आपल्या राज्यकारभारावर बेमुर्वतखोरपणानें टीका करणारांची ही मनोवृत्ति प्रस्तुत परिस्थितींत लक्षांत घेणें अत्यंत जरूर आहे. कारण हे टिकाकार स्वराज्यप्राप्तीनंतर आपल्या प्रगतीच्या मार्गांत अडथळा निर्माण करू शकतात. हिंदुस्थानांत आपल्या राजकीय परिस्थितीचें ज्ञान बुद्धिपूर्वक करून घेणारांची संख्या अत्यंत थोडी आहे. शिक्षित समाजाचें प्रमाण अल्प आहे. हें आंकडे देऊन सिद्ध करण्याची जरूरी नाहीं. ह्या शिक्षित जनतेमध्यें मध्यमवर्गीय लोक बहुसंख्य आहेत. ह्या मध्यम–वर्गीय लोकांमध्यें कॉंग्रेसवादी म्हणविणारा लहानसा वर्ग आहे. परंतु कॉंग्रेसच्या बाहेर राहणारा मध्यमवर्ग अधिक मोठा आहे, असें पृथक्करण केल्यास आढळून येणार आहे. कॉंग्रेसमध्यें जो मध्यमवर्ग सामील झालेला दिसत आहे, त्याच्याहि विचारसरणीमध्यें टीकाकारांच्या दृष्टीनें विचार केल्यास निरनिराळ्या छटा आहेत असें आढळून येईल. कॉंग्रेसमधील मध्यमवर्गीय लोकांत कांहीं थोडे गांधीविचारसरणीचे, कांहीं कॉंग्रेस सोशॅलिस्ट ( समाजवादी ) आणि इतर बहुतेक सर्व स्वतःच्या महत्वाकांक्षेची पूर्ति करून घेण्यासाठीं कॉंग्रेस संस्थेचा उपयोग करून घेणारे आहेत—अशी या मध्यमवर्गीय कॉंग्रेसवादी लोकांची वर्गवारी लावतां येण्यासारखी आहे. हा कॉंग्रेसवादी मध्यमवर्गीय गट देखील आपल्याच मंत्रिमंडळावर पूर्णपणें खूष आहे, आपल्या पक्षांतील अधिकाऱ्यांबद्दल पूज्यभाव धारण करीत आहे, असेंहि आढळून येत नाहीं. बरें, ह्या मध्यमवर्गीय कॉंग्रेसवादी लोकांच्या मनापुढें कॉंग्रेस हें एक देशव्यापी संघटन कॉंग्रेस ही एक अमूर्त देशभक्तिमूलक अशी जनपदाची भावनात्मक शक्ति, आणि त्या संघटनेच्या पाठिंब्यामुळें निर्माण झालेले पदाधिकारी किंवा ह्या अमूर्त देशभक्तीच्या भावनात्मक शक्तीचे प्रतीकात्मक अधिकारी ह्यांमध्यें भेद करून निरनिराळ्या पृथक्करणात्मक दृष्टीनें ह्या दोन्ही प्रकारच्या कॉंग्रेसच्या बाजूंकडे ( Phases ) पाहण्यासाठीं लागणारी बुद्धीची ताकद आहे, असेंहि म्हणतां येत नाहीं. आणि म्हणून आपण ज्या संस्थेंत सामील आहों, तिच्यावर टीका करतांना हे मध्यमवर्गीय कॉंग्रेसवादी लोक जाणिवेमुळें उत्पन्न होणारें तारतम्य दाखवितात, असेंहि बहुधा दिसत नाहीं. कॉंग्रेसमधील मध्यमवर्गीय पुष्कळ जाणते लोक आजच्या कॉंग्रेस मंत्रिमंडळावर नाराज आहेत व कॉंग्रेसवरील असंख्य टीकाखोरांमध्यें ह्या लोकांचाहि समावेश होऊं शकत नाहीं, असें म्हणतां येत नाहीं. कॉंग्रेसमधील बहुतेक सर्व मध्यमवर्गीय महत्त्वाकांक्षी लोक आपण स्वतः किंवा आपले म्हणविणारे इतर आप्तस्वकीय आजच्या मंत्रिमंडळाच्या कक्षेंत, त्या मंत्रिमंडळानें केलेल्या अधिकारांच्या वांटणींत येऊं शकत नाहींत म्हणून रुष्ट आहेत. कॉंग्रेस सोशॅलिस्ट सध्याच्या कॉंग्रेसच्या ध्येयधोरणामुळें, कार्यक्रमामुळें नाराज आहेत. कॉंग्रेसच्या सध्याच्या प्रगतीच्या वेगावर, मंत्रिमंडळाच्या शैथिल्यावर हा वर्ग सडकून टीका करीत आहे. ह्या वर्गाची आपल्या सरकारावरील टीका ध्येयात्मक व गुणात्मक आहे, असें एकंदरीत फार तर त्या टीकेबद्दल म्हणतां येण्यासारखें आहे. कॉंग्रेसमधील गांधीवादी आजच्या कॉंग्रेसशीं—मंत्रिमंडळाशीं—एकजीव झालेले आहेत, असें बिलकूल म्हणतां येत नाहींत. एकतर ते अध्यात्मपर ( Metaphysicians ) आहेत किंवा उदासीन आहेत. पण ह्या गटाची संख्या थोडी असल्यामुळें हा वर्ग कॉंग्रेसच्या टिकाकारांच्या दृष्टीनें उपेक्षणीय आहे असें म्हणतां येईल. कॉंग्रेसमधील इतर टीकाकारांची मनोवृत्ति व्यक्तिगत महत्त्वाकांक्षेच्या भावनेनें भारलेली आहे. कॉंग्रेसमधील गांधीवादी, समाज-








वादी व व्यक्तिनिष्ठ लोकांकडे समुच्चयानें पाहिल्यास ह्या तीनहि लोकांची टीका कॉंग्रेसच्या आजच्या कार्यक्रमास आणि कारभारास पोषक होत आहे असें म्हणतां येणार नाहीं. ह्याचें कारण असें आहे कीं, जे विचारी लोक कॉंग्रेसमध्यें आज समाविष्ट झालेले दिसत आहेत, ते राजकीय सूत्रबद्ध किंवा शिस्तीच्या पक्षविशिष्ट संस्थेत किंवा तालमेंत वाढलेले नाहींत. म्हणून आपली प्रस्तुत परिस्थितींतील जबाबदारी कॉंग्रेसवादी म्हणविणारी शिक्षित जनताहि योग्य तऱ्हेनें ओळखते असें म्हणतां येणार नाहीं. कॉंग्रेसची वाढ पक्ष ( party ) किंवा संस्था ( institution ) म्हणून झालेली नाहीं. इंग्रजांविरुद्ध उठविलेलें राजकीय आंदोलन (movement) अशा दृष्टीनें कॉंग्रेसची वाढ झालेली आहे.

आजची कॉंग्रेस हा एक संघ किंवा समाजासारखें संघटन आहे. ती सूत्रबद्ध अशी संस्था नाहीं. कॉंग्रेस हा संघटित राजकीय पक्ष आहे असें देखील इतर सुसंबद्ध, सूत्रबद्ध व शिस्तबाज पक्षांच्या तुलनेनें म्हणतां येण्यासारखें नाहीं आणि म्हणूनच कॉंग्रेसमधील स्वतःस जाणते म्हणविणारे लोक आपल्या जबाबदाऱ्या व टीकेच्या मर्यादा ओळखूं शकत नाहींत.

## कॉंग्रेसबाहेरील टीकाकार

कॉंग्रेसच्या बाहेर राहणाऱ्या मध्यमवर्गीय बहुसंख्य जनतेस कॉंग्रेसबद्दल किंवा सध्यां राज्यकारभारामध्यें अधिष्ठित असलेल्या कॉंग्रेसच्या प्रांतिक आणि मध्यवर्ती मंडळाबद्दल कांहींच धरबंध नाहीं. ह्यांपैकीं हिंदुमहासभावादी लोकांस कॉंग्रेसचें ध्येय, धोरण व कार्यक्रम गेलीं पंचवीस वर्षें पटलेलें नव्हतें आणि सांप्रत कॉंग्रेसला जरी राजकीय स्वातंत्र्याच्या वातावरणांत अधिकारपदें प्राप्त झालेलीं असलीं आणि म्हणून देशकल्याण साधण्यास अनुकूलता मिळालेली असली तरी आपल्यामधीलच एका मोठ्या राजकीय संघटनेस देशकल्याण करण्याची संधि आपण अपेक्षा केली नसतानांहि मिळालेली आहे आणि म्हणून, देशहितासाठीं ह्या कॉंग्रेसच्या अधिकारी वर्गास पक्षाभिनिवेश न बाळगतां आपण मदतच केली पाहिजे, इतका उदारपणा ह्या हिंदुसभावाद्यांच्या अंतःकरणांत आहे, असें दिसत नाहीं. स्वतःच्या पक्षास राज्याधिकार तर मिळूं शकत नाहीं. पुढेंहि आगामी काळांतलि निवडणुकीनें अधिकारपदप्राप्ति आपणांस होऊं शकेल अशी अनुकूल परिस्थिति नाहीं. हें जाणून आपल्या आजच्या राज्यकर्त्यांकडून अधिकांत अधिक फायदा जनहितासाठीं करून घ्यावा अशा विधायक दृष्टीनें आजच्या राज्यकारभाराकडे हा हिंदुसभावादी पक्ष पाहत आहे असें कोणी म्हणूं शकणार नाहीं. कॉंग्रेसला विरोध करणारा असा हा पक्ष अनेक वर्षें होता आणि सांप्रतकाळांतहि ह्या पक्षाची दृष्टि निवळलेली आहे असें म्हणतां येत नाहीं.

स्वतःस कम्युनिस्ट म्हणविणारे अल्पसंख्य मध्यमवर्गीय लोक आजच्या मंत्रिमंडळाच्या टीकाकारांच्या मेळाव्यांत सामील झालेले आहेत. हे स्वार्थत्यागी, आपल्या ध्येयाबद्दल जागरूक व आस्थेवाईक आहेत असें ह्या थोड्या लोकांबद्दल त्यांच्या स्तुत्यर्थ म्हणतां येण्यासारखें आहे एवढेंच. पण ह्याहि वर्गाची सरकारवरील टीका विध्वंसक ह्याच सदरांत पडण्यासारखी आहे.

शिक्षित मध्यमवर्गीय लोकांत ज्या वर्गाचा समावेश केला पाहिजे असा एक मोठा प्रत्यक्ष पक्षविशिष्ट राजकारणाबाहेर असलेला सरकारी नोकरांचा वर्ग आहे. ह्या वर्गासहि आजच्या राज्यकारभारावर टीका करणाऱ्या वर्गांतच समाविष्ट करणें जरूर आहे. हा वर्ग स्वतः सरकारचें अन्न खाऊन गेलीं अनेक वर्षें सरकारवर टीका करण्याचें कार्य खाजगी तऱ्हेनें करित आहे. परकीय सरकार १५ ऑगस्टच्या पूर्वीपर्यंत अस्तित्वांत असल्यामुळें व देशभक्तिपर भावना व उद्गार कोणाकडूनहि आलेले देशभक्तीचें प्रत्यक्ष कार्य करणाऱ्या लोकांस स्वागतार्ह वाटत असल्यामुळें, हा सरकारी नोकरांचा मोठा शिक्षित वर्ग देशभक्तीच्या बौद्धिक वातावरणास सरकारविरुद्ध आपल्या टीकेनें एका तऱ्हेनें मदतच करीत होता, असें समजतां येत होतें. पण ह्या वर्गास गेलीं २५ वर्षें सरकारवर खाजगी रीतीनें टीका करण्याची जी संवय लागलेली आहे, ती आजच्या सरकारच्या विरुद्धहि सरसहा उपयोगांत येत आहे,







हा वर्ग स्वतंत्र वातावरणांत आजच्या काँग्रेस सरकाराविरुद्ध टीका न करितां आपल्या सरकारास मनापासून साथ देत आहे असें म्हणतां येत नाहीं. वास्तविक पाहूं जातां कार्यक्रमदृष्ट्या आजचें सरकार जो देशहितसाधक उपक्रम करील तो जनतेच्या उद्धारार्थ असल्यामुळें तो चांगलाच असणार अशी श्रद्धा बाळगून तो तत्परतेनें व प्रामाणिकपणानें अमलांत आणण्यासाठीं ह्या वर्गानें झटलें पाहिजे. पण सरकावर टीका करण्याचें जे पूर्वापार चक्र किंवा जी अनेक वर्षांची संवय ह्या वर्गास लागलेली आहे, तिच्यापासून हा वर्ग स्वतंत्र वातावरणांतही मुळींच मुक्त झालेला नाहीं. काँग्रेसपदाधिकाऱ्यांमधील व्यक्तीव्यक्तींमध्यें जी चुरस आहे, तिचा फायदा घेऊन काँग्रेसनें आंखलेल्या कार्यक्रमाची उपयुक्तता आपल्या खाजगी टीकेनें कशी कमी करितां येईल व आपल्यावरील जबाबदारी कशी डावलतां येईल, ह्यांतच ह्या सरकारी नोकरवर्गाची करामत खर्ची पडत आहे.

विद्यार्थिवर्ग हाहि प्रस्तुत सरकारवरील अनेक टीकाकारांचा विचार करितांना उपेक्षा करण्यासारखा नाहीं. राजकीय परिस्थितीचा उत्क्षोभकपणा वाढविण्यासाठीं आतांपर्यंतच्या राजकीय पुढाऱ्यांनी ह्या अपरिपक्व विचारांच्या तरुणांच्या भावनेचा फायदा घेतलेला आहे. कदाचित् असा उपयोग करणें त्यावेळच्या परिस्थितीनें जरूरीचें झालें असेल. पण उत्क्षोभक वातावरण निर्माण करणें ह्यांतच आपली थोरवी, राजकारणविषयक ध्येयवाक्यांचा घोष करून अशांतता निर्माण करणें ह्यांतच आपलें तारुण्याचें शौर्य सांठविलेलें आहे, असा समज ह्या वर्गानें आजतागायत बरींच वर्षें करून घेतलेला आहे. सांप्रतच्या राजकारणाची परिस्थिति अत्यंत भिन्न आहे. आणि उत्क्षोभकपणास, अशांततेस, ध्येयवाक्यांच्या वायफळ जयघोषास आज अनुकूल काल नाहीं आणि उत्क्षोभक उद्योगांत काल व्यतीत करण्यापासून देशकार्यास तर विद्यार्थिवर्गास हातभार लावतांच येत नाहीं, पण आपल्या वैयक्तिक उन्नतीच्याहि निष्कारण आपण आड येत आहों, ह्याचें भान ह्या वर्गास पुरेसें झालेलें नाहीं. अद्याप जुन्या जमान्यांतच ह्या अपरिपक्व तरुणांचें राजकीय मन रमलेलें दिसत आहे.

## टीकाकार आपापल्या परीनें असमर्थ

आतांपर्यंत, स्वतंत्र वातावरणामध्यें राष्ट्राच्या किंवा प्रांताच्या प्रगतीसाठीं निदान प्रतिकूल विध्वंसक टीकेच्या अभावाचें वातावरण पाहिजे, एवढेंच नाहीं तर राज्यकर्त्यांस पाठिंबा देणाऱ्या, त्यांच्याबद्दल आदर बाळगणाऱ्या बौद्धिक वातावरणाची आवश्यकता आहे व तें वातावरण प्रस्तुतकाळीं कसें आढळून येत नाहीं, ह्याबद्दल उहापोह केला आहे. राष्ट्राच्या प्रगतीसाठीं कोणत्या तरी देशोद्धाराच्या देशव्यापी विधायक कार्यक्रमावर विचारी लोकांचें मन केंद्रित करणें जरूरीचें असतें. त्यांच्या उत्साहशक्तीचा ओघ एका विवक्षित मार्गानें वळविल्याखेरीज राष्ट्राची उत्साहशक्ति त्वरेनें कार्यान्वित होऊं शकत नाहीं, हीं विधानें सर्वांस मान्य होण्यासारखीं आहेत. तरी देखील, आपल्या राष्ट्रांतील अनेक विचारी लोकांच्या गटांच्या मनोवृत्तीचें पृथःकरण केल्यास कोठें तरी कोणत्यातरी विशिष्ट देशोद्धारक कार्यक्रमावर सद्यःस्थितींत हे शिक्षित लोक एकत्रित होऊं शकतील कीं काय ह्याबद्दल आजच्या परिस्थितींत मन शंकाकुल झाल्याशिवाय राहत नाहीं. काँग्रेसचा राज्यकारभार सांप्रत चालू असतांना काँग्रेसमधील विचारी लोकहि एकाग्रतेनें व उत्साहानें आपली शक्ति एका विशिष्ट कार्यक्रमावर केंद्रित करीत आहेत, किंवा तसें ते लवकरच करणार आहेत, असें आढळून येत नाहीं. हिंदुमहासभा, साम्यवादी पक्ष, विद्यार्थिसंघटना ह्यामध्यें विचार करणारा मध्यमवर्गीय समाज एकत्रित झालेला असला तरी, राष्ट्राचें तारूं जलदी हाकारलें गेलें पाहिजे व त्यासाठीं एकसमयावच्छेदानें योग्य वातावरण आपणच निर्माण केलें पाहिजे, ह्याबद्दल एक विचार मुळींच दिसून येत नाहीं.

( १ ) काँग्रेसमधील खरे गांधीवादी लोक अहिंसक समाज निर्माण करण्यास उत्सुक असले, तरी ह्या विचारी लोकांचा भर आजचा राज्यकारभार बदलविण्यास असमर्थ आहे. ह्या गटांची शक्ति सद्यःस्थितींत अत्यंत मर्यादित आहे.








(२) काँग्रेस सोशॅलिस्टांस क्रांतिकारक विचार रोचक वाटत असले, आणि हिंदुस्थानाची राजकीय प्रगति समाजवादी पद्धतीनें तावडतोब झाली पाहिजे ह्याबद्दल हा पक्ष उतावीळ झालेला असला, आणि बहुजनसमाजातर्फे क्रांति करून राज्यकारभार ताब्यांत घेणारा जरी ह्या पक्षाचा दृष्टिकोन असला, तरी आपली पक्षसंघटना वाढविण्याचा उद्योग करण्यापलीकडे अधिक टप्पा हा गट सद्यःस्थितींत गाठूं शकत नाहीं. राज्यकारभार ह्या पक्षाच्या हातांत येऊं शकत नाहीं.

(३) पुढारलेल्या समाजांपासून किंवा उच्चवर्णीय म्हणविणाऱ्यांकडून राज्यतंत्र काढून तें आपल्या हातांत म्हणजे पददलित वर्गांच्या किंवा खालच्या जातीच्या हातांत बहुजनसमाजवादाच्या नांवाखालीं ठेवण्याची खटपट करणारा महाराष्ट्रीय समाजांत काँग्रेसमध्यें जातिविशिष्ट बहुसंख्य वर्ग आहे. ह्या वर्गाच्या हातांत राज्यकारभार वैयक्तिक महत्त्वाकांक्षेच्या जोरावर पुढील निवडणुकीमध्यें आला असें मानलें, तरी देखील बौद्धिक उन्नतीच्या आणि ध्येयवादाच्या अभावीं ह्या वर्गाकडून राष्ट्रकल्याण साधणें कठीण आहे.

(४) साम्यवादी राज्यकारभारास प्रस्तुत परिस्थितींत अनुकूलता आहे, असें कोणी म्हणूं शकणार नाहीं. ह्या पक्षाच्या दृष्टीनें 'दिल्ली फार दूर आहे' असें म्हणतां येण्यासारखें आहे.

(५) हिंदुमहासभावाद्यांमध्यें बहुजनसमाज सामील नसल्यामुळें तो निवडणुकींत प्रभुत्व मिळवूं शकत नाहीं; व त्यांचें मत प्रभावी बनण्यास मुळींच अनुकूलता नाहीं.

(६) विद्यार्थिवर्ग दुसऱ्या कोणत्यातरी वर्गाची साथ करूं शकतो. तो स्वयंसिद्ध असा राजकारणी गट बनूं शकत नाहीं.

(७) राज्यकारभारांतर्गत शिक्षित असा सरकारी नोकरांचा गट, स्वतंत्र राष्ट्रांत खाल्ल्या घरचे वासे मोजणारा असल्यास राज्यकारभारांत तो एक मोठाच अडथळा निर्माण करूं शकतो. प्रगतीची गति त्या गटाच्या विध्वंसक टीकायुक्त कारवाईमुळें लांबणीवर तरी खास पडते हें स्पष्ट आहे.

## विधायक टीकेची जरूरी

वरील निरनिराळ्या प्रकारच्या व भिन्न मतमतांतराच्या शिक्षित लोकांकडे एकसमयावच्छेदानें पाहिल्यास त्यांची विचारसरणी, त्यांची प्रस्तुत राज्यकारभाराबद्दलची भावना विचारांत घेतल्यास, त्यांची खाजगी व सार्वजनिक टीका ऐकल्यास असें दिसून येतें कीं, आपल्यास राजकीय प्रगतीचा मार्ग स्वातंत्र्य मिळाल्यामुळें मोकळा झालेला असला तरी, मध्यमवर्गीय लोकांच्या मनांमध्यें गेल्या पंचवीस वर्षांत ज्या घटनात्मक संवयी रुजलेल्या आहेत, त्या त्यांनींच प्रयत्नपूर्वक घालविल्याशिवाय आपल्या देशाच्या प्रगतीच्या वाटा सापडल्यानें आक्रमण करणें शक्यतर नाहीं. शिक्षित लोकांच्या टीकेचें काहीं प्रयोजन असलें पाहिजे हें स्पष्ट आहे. परकीय राज्यांत टीकेनें, विध्वंसक टीकेनें कां होईना—देशभक्तियुक्त कार्य करणाऱ्या देशभक्तांभोंवतीं बौद्धिक वलय व वातावरण निर्माण होण्यास मदत मिळत असे. आजची सरकारवरील टीका कोणत्याच अर्थी टीकाकारांचा विशिष्ट राजकीय पक्ष सबल करण्याच्या हेतूनें देखील कार्यक्षम होऊं शकते, असें दिसत नाहीं.

नवीन निवडणुकी एकाद्या वर्षानें होणार आहेत. ह्यापुढील निवडणुकीमध्यें आपला केंद्रिय व प्रांतिक राज्यकारभार अधिक यशस्वी रीतीनें करणारा पक्ष प्रबल झाला पाहिजे, अशी कोणाहि देशभक्ताची इच्छा असणारच. कोणत्या तरी विशिष्ट राजकीय पक्षास पुढील राज्यकारभार करावा लागणार आहे. क्रांतिवादी म्हणविणाऱ्या लोकांसहि राज्य हातांत घेऊन राष्ट्राची प्रगति जलदीनें घडवून आणण्याची जबाबदारी पत्करणें भाग आहे. वैयक्तिक व पक्षान्वित राजकीय महत्त्वाकांक्षा बाळगण्यांत कांहीं कोणाची चुकी होत नाहीं. पण आपली व आपल्या पक्षाची कुवत लक्षांत घेऊन ही महत्त्वाकांक्षा पोसावली पाहिजे, शिक्षित समजणाऱ्या व प्रातिनिधिक राज्यकारभारांत आपल्या मताचें ( Vote चें ) महत्त्व जाणणाऱ्या लोकांनीं आपल्या मर्यादा व शक्ति ओळखणें अत्यंत जरूर आहे. त्या त्यांनीं ओळखल्यास जें विध्वंसक बौद्धिक वातावरण आज सगळीकडे दृग्गोचर होत आहे त्यास आळा बसेल, प्राति-








## सरकारचे टीकाकार

निश्चिक सत्तेमधील तत्त्वांची उत्तरोत्तर अधिकाधिक जाणीव देशांत पसरेल आणि कोणत्या तरी सर्वांस मान्य होणाऱ्या देशाच्या प्रगतीच्या कार्यक्रमावर देशांतील विचार करणाऱ्या लोकांची शक्ति व उत्साह केंद्रित करितां येईल.

अर्धा कोटि निर्वासितांचा बिकट प्रश्न आज राज्यकारभार करणाऱ्या मंत्र्यांपुढें उभा आहे. दुसरा मोठा प्रश्न अन्नधान्याचा आहे. अनेक राष्ट्र-भक्तीचीं नवीन कामें आपल्या राज्यकर्त्यांस आतां व पुढें उभारावयाचीं आहेत. पण विश्वासाचें, आपले-पणाचें, आदराचें वातावरण निर्माण झाल्याशिवाय राष्ट्रव्यापी अजस्र कार्यक्रम राज्यकर्त्यांनीं अंगावर घेतले तरी त्यांस योग्य यश मिळूं शकणार नाहीं. आपला देश दारिद्री आहे व प्रयोगापायीं कोट्यवधि रुपयांचा चुराडा करावयास देशास सवड नाहीं. शिक्षित जनतेनें, आपलाच राज्यकारभार आपलेच लोक चालवीत आहेत, हें लक्षांत बाळगून स्वतःच्या पक्षास, भावनांस व वैयक्तिक विचारांस गौणस्थान देण्यास शिकलें पाहिजे. ही जाणीव त्यांनीं ठेवल्यास विध्वंसक जालीम व जहरी टीकांस आज मुळीच सवड नाहीं हें त्यांस आढळून आल्याशिवाय राहणार नाहीं.

तर मग सरकारावर टीकेचें शस्त्र उगारणें हें सद्यः-स्थितींत अयोग्य आहे, असा वरील लिखाणाचा अर्थ आहे, अशी कोणी समजूत करून घेतल्यास ती चुकीची आहे. प्रातिनिधिक राज्यपद्धतींत विधा-यक टीकेस नेहमींच अढळ स्थान आहे. व ती प्रगतिपर सरकारनें स्वागतार्ह मानली पाहिजे. कोण-तीहि राज्यपद्धति सदोष नसते असें नाहीं. पण ज्या टीकेचें रान सद्यःस्थितींत प्रस्तुत सरकारावर उठवि-लेलें प्रत्यहीं आपल्या प्रत्ययास येतें, तें उठवितांना हें सरकार आम्हीं निवडून दिलेलें आहे, तें अल्पकाळ म्हणजे गेले चार महिनेच अस्तित्वांत आलें आहे, ही परिस्थिति आम्ही शिक्षित म्हणविणारांनीं लक्षांत घेणें अत्यंत जरूर आहे. प्रस्तुत सरकाराच्या जागीं जें नवें सरकार पुढील निवडणुकीमध्यें आम्ही आणून बसवूं, तें ह्या सरकारापेक्षां अधिक कार्यक्षम करण्याची जबाबदारी सुजाण लोकांनीं पत्करली पाहिजे; आणि राजकीय पक्षाविशिष्ट अशी त्यांची मनोवृत्ति असल्यास, त्या पक्षाची कुवत, मर्यादा यशाची उमेद ह्याच गोष्टी लक्षांत ठेऊनच आम्ही पक्षविशिष्ट टीकेचा मोर्चा प्रस्तुत सरकारावर वळ-विला पाहिजे. टीकेमध्यें आम्ही संयम न बाळ-गल्यास जें सिंहासन आम्हीं निर्माण केलें आहे, तें कोस-ळून पाडण्यास आमची शक्ति कारणीभूत होईल; एवढेंच नाहीं तर अधिक कार्यक्षम, बलवान् व टिकाऊ सिंहासन निर्माण करण्याच्या कार्यांत आमच्या प्रखर टीकेनें विघ्न उत्पन्न होईल, हें सुजाण नागरिकांनीं लक्षांत घेणें जरूर आहे. बुद्धिपूर्वक केलेली विधायक टीका हा राज्यकारभारास एक उपकारक असा व्यवसाय होऊं शकतो; टीका ही निरुद्योगी लोकांचा रिकाम्या न्हाव्याप्रमाणें उपद्-व्याप बनतां कामा नये, हें विचारी लोकांस सहज मान्य होण्यासारखें आहे. शेवटीं एवढेंच म्हणाव-याचें आहे कीं, 'बोद्धारो मत्सरग्रस्ताः प्रभवः स्मय-दूषिताः।'अबोधोपहताश्चान्ये जीर्णमंगे सुभाषितम्' असें म्हणण्याची परिस्थिति राज्यकारभार करणाऱ्या लोकांसाठीं उत्पन्न होऊं नये, ह्याबद्दल जागरूकता आम्ही सर्वांनीं दाखविली पाहिजे.









# पाश्चात्य विद्येच्या प्रकाशांत

प्रा. गंगाधर बाळकृष्ण सरदार

कोणत्याहि देशांतील समाजजीवन घेतलें, तरी तें स्वभावतःच परिवर्तनशील असल्यामुळें त्यांत कांहीं ना कांहीं घडामोडी नेहमींच होत असतात. महाराष्ट्राच्या इतिहासांतहि गेल्या सहासातशें वर्षांत अनेक लहानमोठीं स्थित्यंतरें होऊन गेलीं. तेराव्या शतकाच्या अखेरीस देवगिरीकर यादवांचें राज्य नामशेष होऊन दक्षिणेंत मुसलमानी अंमल सुरू झाला. परधर्मीयांच्या या अनपेक्षित आक्रमणामुळें महाराष्ट्रिय समाज कांहीं काळ दिङ्मूढ व अगतिक बनला; आणि पुढील दीडदोनशें वर्षांत तरी त्यानें अजिबात डोकें वर काढलें नाहीं. मात्र आदिलशाहींत आणि निजामशाहींत मराठ्यांच्या महत्त्वाकांक्षेला व कर्तृत्वाला थोडाफार वाव मिळतांच पुन्हां महाराष्ट्राच्या भाग्योदयाचीं प्रसादचिन्हें दिसूं लागलीं. शूर सैनिकांची व चतुर मुत्सद्यांची परंपरा निर्माण होऊन शिवशाहीच्या रूपानें स्वराज्याची स्थापना झाली; आणि पेशव्यांच्या अमदानींत तर त्या स्वराज्याचें साम्राज्यांत रूपांतर झालें. ह्या सर्व राजकीय घडामोडींचा महाराष्ट्राच्या सामाजिक जीवनावर कांहींच परिणाम झाला नाहीं असें नाहीं. धर्मवेड्या सुलतानांच्या झुलमामुळें हजारो लोकांना सक्तीनें धर्मांतर करावें लागलें. लढाया, जाळपोळ, लुटालूट, कत्तली यामुळें समाजजीवन अस्थिर बनलें, सांस्कृतिक विकासाचा मार्ग खुंटला; आणि साहजिकच क्षुद्र नि संकुचित कल्पनांचें जिकडे तिकडे पेव फुटलें; प्रतिष्ठित संधिसाधु लोकांत राज्यकर्त्यांचें अनुकरण करण्याची प्रवृत्ति बळावत गेल्यामुळें आमचा[१] पोशाख बदलला, आमच्या चालीरीतींत फरक पडला; बिचाऱ्या मराठी भाषेवर आरबी व फारशी भाषांचा बेसुमार पगडा बसत चालला. घरींदारीं, बाजारांत, दरबारांत, जिथेंतिथें यावनी शब्दांचा सर्रास वापर होऊं लागला. भोळेभाबडे लोक हिंदु दैवताप्रमाणेंच मुसलमानी पीरांनाहि भजूं लागले. अशा रीतीनें सामाजिक जीवनाच्या हरएक क्षेत्रांत मुसलमानी राजवटीचा कांहींतरी परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं.

## मराठ्यांच्या संस्कृतीचें एकात्म स्वरूप

दोन भिन्न संस्कृतींचे लोक एकत्र आल्यानंतर परस्परांच्या संस्कृतीचा परस्परांवर परिणाम होणें अपरिहार्यच आहे. परंतु दक्षिणेंत मुसलमान अगदींच अल्पसंख्य होते; आणि त्यांतूनहि मराठ्यांना शिकण्यासारख्या त्यांच्यापाशीं फार थोड्या गोष्टी होत्या. म्हणून त्यांच्या साहचर्याचा महाराष्ट्राच्या लौकिक जीवनावर सकृद्दर्शनीं कितीहि परिणाम झालेला दिसला, तरी तो केवळ वरवरचा होता. त्यामुळें महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनांत आमूलाग्र बदल होऊं शकला नाहीं. ज्ञानेश्वरापासून प्रभाकरापर्यंत, रामदेवरावापासून बापू गोखल्यापर्यंत, पांचशें वर्षांत होऊन गेलेले महाराष्ट्रीय मुत्सद्दी, सेनानी, साधुसंत, ग्रंथकार—हे सर्व एकाच परंपरागत संस्कृतीचे वारस आहेत असें स्पष्ट दिसतें. त्यांचें जीवनविषयक तत्त्वज्ञान, त्यांचे नैतिक आदर्श, त्यांना स्फूर्ति देणारें वाङ्मय, त्यांना प्रमाण वाटणारे शास्त्रग्रंथ एकच आहेत. "वाचे बरवें तें कवित्व। कवित्वीं

---

१ 'महाराष्ट्रांतील सुधारणावादाचा विकास' या आगामी ग्रंथांतील हें पहिलें प्रकरण आहे.








बरवें रसिकत्व । रसिकत्वीं परतत्त्व । स्पर्शु जैसा॥'' असें म्हणणारा ज्ञानेश्वर, '' या देशभाषावाणी । उघडली परमार्थाची खाणी '' असें म्हणारा एकनाथ, '' जेणें वाढे भगवद्भक्ती । तो तो विशेष लिहिला ग्रंथीं '' असें म्हणणारा मुक्तेश्वर, आणि 'सुयश न जयांत हरिचें चित्रहि गुणभवन कवन तें अशुचि'' असें म्हणणारा मोरोपंत—या सर्व कवीश्वरांच्या वाङ्मयाचा सूर एकच आहे. त्यांनीं लिहिलेल्या ओव्या असोत किंवा अभंग असोत; श्लोक असोत किंवा आर्या असोत; कटाव असोत किंवा लावण्या असोत; त्यांच्या वाङ्मयनिर्मितीची प्रेरणा तत्वतः भिन्न नाहीं. त्यांच्या बहुविध साहित्यांतील विचारांचा आणि भावनांचा अंतःप्रवाह सलग व एकात्म आहे. यावरून एक गोष्ट स्पष्ट होते. ती ही कीं, यावनी राजसत्तेला महाराष्ट्रीय संस्कृतीच्या गाभाऱ्यांत प्रवेश मिळाला नाहीं. पाशवी सामर्थ्याच्या बळावर मुसलमानांना मराठ्यांचा मनःपिंड बदलता आला नाहीं.

## राज्यक्रांतीबरोबर समाजक्रांतीची मुहूर्तमेढ

एकोणिसाव्या शतकांतील राजकीय स्थित्यंतरांचें स्वरूप ह्या पूर्वकालीन घडामोडींपेक्षां अगदीं निराळें होतें. मराठ्यांच्या अध्यात्मप्रधान मध्ययुगीन संस्कृतीपेक्षां युरोपची विज्ञाननिष्ठ आधुनिक संस्कृति भौतिकदृष्ट्या निःसंशय श्रेष्ठ प्रगमनशील होती. त्यामुळें अल्पावकाशांतच महाराष्ट्रांत हिंदुस्थानांतील इतर प्रांतांप्रमाणें इंग्रजांचें बौद्धिक आधिराज्य स्थापन झालें. आपलें आसन स्थिर करण्यासाठीं इंग्रज राज्यकर्त्यांनीं जें धोरण आखलें, जे उपाय योजले, त्यामुळें आपल्या सामाजिक जीवनांत मूलगामी परिवर्तन घडून येण्यांस प्रारंभ झाला. राज्यक्रांतीबरोबरच समाजक्रांतीचीहि मुहूर्तमेढ रोवली गेली. पेशवाईंतलि सर्वसामान्य पांढरपेशा वर्गाची राहाणी आणि विसाव्या शतकांतील आजचा त्यांचा जीवनक्रम यांत जमीनअस्मानाचें अंतर आहे. आपल्या प्रचलित प्रवृत्ति आणि प्रेरणा, विचार आणि भावना आकांक्षा आणि योजना यांचा मागमूसहि त्या काळांत लागणार नाहीं. इंग्रजी विद्येच्या व वाङ्मयाच्या द्वारें आमच्यांतील सुशिक्षित विचारवंतांना आधुनिक जगाची प्रथम यथार्थ कल्पना आली. भौतिक जीवनाच्या प्रत्येक अंगोपांगांत पाश्चात्यांच्या मानानें आपण फारच मागासलेले आहोंत याची त्यांना स्पष्ट जाणीव झाली. आणि पाश्चात्य संस्कृतीचें सारसर्वस्व आत्मसात् केल्याशिवाय यापुढें आपणांस गत्यंतर नाहीं अशी बालंबाल खात्री होऊन त्यांनी 'राजखुषीनें व अक्कलहुशारीनें' इंग्रजांचें शिष्यत्व पत्करलें.

वेदांतव्याकरणांतील पाठिक पांडित्यानें आपलें दैन्य फिटणार नाहीं; तर त्यासाठीं आपणांस अद्ययावत् विज्ञानाचीच कास धरली पाहिजे याबद्दल कुणालाच संशय उरला नाहीं; आणि 'ज्ञान हेंचि शक्ति' ( Knowledge is power ) हा महामंत्र आम्ही मोठ्या निष्ठेनें जपूं लागलों. पारलौकिक कल्याणापेक्षां ऐहिक उत्कर्षाचा विचार करण्याचें सर्वांना अगत्य वाटूं लागलें. व्यक्तिजीवनापुरतेंच आपलें कार्यक्षेत्र मर्यादित न ठेवतां समाजजीवनाचाहि त्यांत समावेश करण्याची प्रवृत्ति निर्माण झाली. हजारो वर्षांची परंपरा बाजूला सारून आम्ही आपल्या समाजजीवनाचें तोंड अगदीं वेगळ्या दिशेकडे वळविलें. जुन्या जविनाविषयक मूल्यांबद्दल आमची वृत्ति सांशक बनली. जुने ग्रंथ, जुन्या रूढि, जुने आचार, जुने आदर्श यावरची श्रद्धा दिवसानुदिवस ढळत चालली; आणि पाश्चात्य जगांतील नवीन मूल्यांचें मर्म आम्ही भक्तिभावानें समजून घेण्याची खटपट सुरू केली.

मूठभर सुशिक्षितांच्या विचारसरणींत क्रांति झाली खरी; परंतु शेंकडो वर्षांच्या परंपरेनें समाजजीवनांत खोलवर रुजलेल्या अनिष्ट प्रवृत्तींचें समूळ उच्चाटन करण्यास भगीरथ प्रयत्नांची आवश्यकता होती. शिवाय त्या प्रतिगामी प्रवृत्तींशी ज्यांचे हितसंबंध पिढ्यानपिढ्या निगडित होते, त्या निरनिराळ्या वर्गांतील प्रबळ आणि प्रतिष्ठित लोकांच्या विरोधाला धिमेपणानें व निश्चयानें तोंड दिल्याखेरीज समाजाचें पाऊल पुढें पडणें शक्य नव्हतें. जांभेकर, लोकहितवादी, फुले, पंडित, भांडारकर, रानडे, आगरकर, ह्या महनीय व्यक्तींनीं हें कार्य हातीं घेतलें, आणि लोकांच्या स्तुतिनिंदेची पर्वा न करतां निःस्वार्थ बुद्धीनें व निरलस वृत्तीनें त्यांनी अखेर-







पर्यंत त्याचा पाठपुरावा केला. सनातनी पंडितांनीं व सुधारणाविरोधी सुशिक्षितांनीं या उदयोन्मुख प्रवृत्तींना वेळींच पायबंद घालण्यासाठीं आपल्या प्रयत्नांची पराकाष्ठा केली. एका बाजूला सुधारक-दुर्धारकांच्या वादविवादाची धुमश्चक्री चालू होती, तर दुसऱ्या बाजूला सर्वभक्षक काळ मोठ्या कुशलतेनें आपलें काम करीत होता. बदलत्या परिस्थितीच्या दडपणाखालीं लोकजीवनाच्या प्रत्येक शाखेंत हळूहळू परिवर्तन घडून येत होतें. परंपरागत पूर्व संस्कार आणि परिस्थितिजन्य नव्या प्रवृत्ति यांच्या ह्या झगड्यांतूनच उत्तरोत्तर सुधारणावादाचा विकास होत गेला.

## ब्रिटिशांपुढें महाराष्ट्राचा बिकट प्रश्न

लष्करी सामर्थ्याच्या बळावर ब्रिटिशांनीं पेशव्यांचें राज्य हस्तगत केलें; पण त्याबरोबरच महाराष्ट्रासारख्या राकट लढाऊ वृत्तीच्या मुलुखांत आपलें बस्तान बसविण्याचें बिकट आणि जोखमीचें काम त्यांच्या अंगावर येऊन पडलें. हिंदुस्थानांतील बंगाल, गुजराथ वगैरे प्रांतांची गोष्ट फार निराळी होती. पुंड, पेंढारी व पाळेगार यांच्या हल्ल्यामुळें हैराण झालेल्या तेथील लोकांना इंग्रजांचा शांततेचा व स्वस्थतेचा अम्मल सुखावह नि स्वागतार्ह वाटल्यास नवल नाहीं. बंगालसारख्या प्रांतांत तर जुलमी नबाबांच्या आणि अरेरावी सरंजामदारांच्या जाचांतून सामान्य जनतेला व व्यापारी वर्गाला मुक्त केल्याचें श्रेयहि ब्रिटिशांना लाभलें. महाराष्ट्रांतील लोकांना अशा प्रकारचें कोणतेंच आमिष दाखवितां येण्यासारखें नव्हतें. पेशव्यांच्या राज्याबद्दल जरी कुणाला फारसा आपलेपणा वाटत नव्हता, तरी मुलुखगिरीच्या किफायतीमुळें सैनिक व शेतकरीवर्ग सामान्यतः सुस्थितींत होतो[1]. इंग्रजांच्या आगमनामुळें मात्र ही स्थिति लगोलग पालटली. कांहीं झालें तरी शंभरदीडशें वर्षें महाराष्ट्रांत स्वातंत्र्याचें वारें खेळत होतें. शिपाईगिरी हा सर्व मराठ्यांचा आवडता पेशा होता. त्यामुळें नव्या अमदानींतील शांततेचें व सुरक्षिततेचें त्यांना विशेष कौतुक वाटण्याचें कांहींच कारण नव्हतें. उलट दिवसानुदिवस वाढत चाललेल्या आर्थिक हलाखीमुळें इंग्रजी राजवटीचें सत्यस्वरूप हळूहळू उघडकीस येऊं लागलें[2]. शिलेदार बारगिरांचें काम उरलें नाहीं. सरदार जहागीरदारांची सत्ता संपुष्टांत आली. शास्त्रीपंडित निराश्रित झाले. कसबी कारागीर बेकार बनले. जमीनधाऱ्याच्या ओझ्याखालीं टेकीस आल्यामुळें शेतकरीवर्गांत त्राण राहिलें नाहीं[3]. अशा प्रतिकूल परिस्थितींत लोकांच्या मनांत आपल्या राज्याबद्दल दृढ निष्ठा

1 " The Mahratta country presents in many respects a complete contrast to the above picture. The people are few, compared to the quantity of arable land; they are hardy, warlike, and always armed, till of late years. The situation of the lower orders was very comfortable, and that of the upper prosperous. There was abundance of employment in tne domestic establishments and foreign conquests of the nation."

Colebrooke--Life of Mountstuart Elphinstone Vol. II P. 79-80.

२ " सांप्रत हिंदु लोक एकत्र बसले, म्हणजे सहज गोष्टी निघतात कीं, हिंदुस्थानची पुढें गत कशी होईल? लोक अगदीं भिकारी होत चालले. व्यापार-धंदा, रोजगार हीं कामें नाहींशी झालीं. ब्राह्मणांस अन्न नाहीं. घरें ओसाड पडत चाललीं. माणसें स्वस्त झालीं. पदार्थांच्या किंमती उतरल्या. पैसा नाहिंसा झाला. इंग्रज लोक एकापाठीमागें एक आपलीं राज्य-संस्थानें, जहागिरी, पेनशनें घेत चालले. कोणी शिपाई राहिला नाहीं व लोक दरिद्री झाले. " लोकहितवादी–शतपत्रें ( नवी आवृत्ति ) पृ. ७७

3 " Every effort, lawful and unlawful, was made to get the utmost out of the wretched peasantry, who were subjected to torture, in some instances cruel and revolting beyond all description, if they would not or could not yield what was demanded. Numbers abandoned their homes and fled into the neighbouring native states. Large tracts of land were thrown out of cultivation, and in some districts no more than a third of the cultivable area remained in accupation. "—Bombay Administration Report of 1872-73, P. 41








उत्पन्न करणें किती कठीण होतें याची ब्रिटिश मुत्सद्यांना हमखास जाणीव होती.

एल्फिन्स्टन, माल्कम यांच्यासारख्या खोल व मुरब्बी मुत्सद्यांनीं हें काम सौम्यतेनें व सावधगिरीनें पार पाडलें. जिल्ह्याजिल्ह्यांत दौरा काढून त्यांनीं प्रथम लोकांची नाडी काळजीपूर्वक तपासली. राष्ट्रीयत्वाच्या सामर्थ्यशाली कल्पनेचा या लोकांच्या अंतःकरणाला अद्याप स्पर्शहि झालेला नाहीं हें त्यांनीं तेव्हांच ताडलें. ह्यांचा स्वाभिमान व्यक्तीपुरता, घराण्यापुरता, जातीपुरताच मर्यादित आहे हें त्यांच्या ताबडतोब ध्यानांत आलें. स्वतःचें वैभव व ऐश्वर्य गेल्याबद्दल जो तो हळहळत होता, पण देशाचें स्वातंत्र्य हारपल्याची कोणालाहि खंत वाटत नव्हती. इतर प्रांतांच्या मानानें महाराष्ट्रांत परकीयांबद्दल जास्त तीव्र द्वेष होता; परंतु राष्ट्रीयत्वाच्या व्यापक भावनेचें त्याला अधिष्ठान नसल्यामुळें परकीय सरकाराच्या प्रतिकारासाठीं आवश्यक असलेली प्रभावी संघटना त्यांतून निर्माण होणें शक्य नव्हतें. तेव्हां वजनदार वर्गाला सरकारी नोकरीच्या मोहपाशांत गुंतवून त्याच्या स्वार्थी असंतोषाची नांगी ठेचून टाकली, आणि लोकांच्या धर्मभावनेला धक्का न लावण्याची खबरदारी घेतली, तर आपल्या राज्याला तूर्त कसलाहि अंतर्गत धोका नाहीं अशी इंग्रज राज्यकर्त्यांनीं आपल्या मनाशीं खूणगांठ बांधली.

## ब्रिटिशांची भेदनीति

धर्मभावनेचा प्रश्नहि तेवढा तापदायक नव्हता, कारण त्यावेळीं आमची धर्मकल्पना अत्यंत संकुचित बनली होती. शिवकाळांत धर्म ही एक शक्ति होती. तानाजी, बाजीप्रभु, जिऊ महाला ह्या महाराष्ट्रीय योध्यांनीं धर्माभिमानाच्या प्रेरणेनेंच परधर्मीयांशीं झुंज दिली. तुकाराम—रामदासाबरोबर तिचा कार्यभाग संपला; आणि पेशवाईत तर तिच्यावर दांभिकतेची पुटें चढूं लागलीं. सवत्यासुभ्याच्या संकुचित कल्पनेनें व्यापक धर्मबुद्धीला हरताळ फासला; आणि होमहवन, जपजाप्य, रुद्राभिषेक यापलीकडे धर्माला कांहीं अर्थ उरला नाहीं. देवस्थानांच्या देणग्या कायम राहिल्या, तीर्थयात्रा करण्याला मोकळीक मिळाली, उत्सवांच्या दंगलींत व्यत्यय आला नाहीं म्हणजे आपला धर्म सुरक्षित राहिला अशी ज्यांची समजूत होती, आणि परधर्मीयांच्या वशांत आपला देश गेल्यामुळें आपल्या धर्मावर व संस्कृतीवर केवढें गंडातर आलें आहे हें समजण्याची ज्यांच्या अंगीं पात्रता नव्हती, त्यांना धार्मिक स्वातंत्र्य देण्यांत इंग्रजांचें कांहींच नुकसान नव्हतें. उलट त्यांच्या व्यापारांत आणि राज्यकारभारांत अडथळा न आणतां आम्ही चोवीस तास रामनामाचा जप करीत बसलों असतों, किंवा अहोरात्र आमच्या इष्ट देवतेवर अभिषेक करीत राहिलों असतों तर तें त्यांच्या पथ्यावरच पडलें असतें. धर्माच्या सोज्वळ नांवाखालीं गेलीं शंभर वर्षें आम्ही आपल्या कोट्यवधि अस्पृश्य बांधवांच्या नागरिक स्वातंत्र्याची गळचेपी केली; ब्राह्मण—ब्राह्मणेतर, स्पृश्य—अस्पृश्य, हिंदु—मुसलमान यांच्यांतील भांडणें आत्मघातकी वृत्तीनें पुन्हां पुन्हां उगाळीत बसलों हा ब्रिटिश राजनीतीचा विजयच आहे, असें म्हणावें लागतें.

लोकांच्या पोटांत शिरून गोडीगुलाबीनेंहि आपला कार्यभाग साधण्यासारखा आहे अशी खात्री झाल्यामुळें एल्फिन्स्टनप्रभृति मुत्सद्यांनीं आरंभीं तरी सामोपचाराचें व उदारतेचें धोरण ठेवलें. आपल्या साम्राज्यसत्तेबद्दल सर्वांना दरारा तर वाटावा, पण त्याबरोबरच आपल्या सुधारलेल्या शासनपद्धतीबद्दल त्यांच्या मनांत सहानुभूति उत्पन्न व्हावी असा त्यांचा यांत दुहेरी डाव होता. तो सफल होण्यासाठीं एतद्देशीयांच्या सहकार्याची त्यांना पदोपदीं गरज होती. लोकांच्या मनोवृत्तीची ज्यांना पूर्ण पारख आहे, आणि समाजजीवनाचीं सूत्रें आजतागायत ज्यांच्या हातीं आहेत, अशा वजनदार वरिष्ठ वर्गाकडूनच हें काम बिनबोभाट होऊं शकेल, हें इंग्रज अधिकाऱ्यांना स्पष्ट कळून चुकलें होतें. म्हणून कंपनी सरकारशीं राजनिष्ठ राहूं इच्छिणाऱ्या सरंजामदारांना व पंडितांना न दुखविण्याची त्यांनीं सुरवातीला खबरदारी घेतली. कोणाचाहि वृत्तिछेद होणार नाहीं, शरण येणारांचीं वतनें कायम राहातील, धार्मिक बाबतींत बिलकूल ढवळाढवळ केली जाणार नाहीं असें एल्फिन्स्टननें जाहीर आश्वासन दिलें. शिवाय पुणें येथें संस्कृत पाठशाळा स्थापून








असंतुष्ट ब्राह्मणांची मनधरणी करण्याचाहि त्यांनीं उपक्रम केला. वतनांच्या आशेनें सरंजामदार हुरळले. दक्षिणेच्या लोभानें पंडित लाचार बनले. वास्तविक पाहतां ज्यांनीं निःस्पृहतेनें समाजाच्या योगक्षेमाची अहर्निश काळजी घ्यावयाची, तेच लोक स्वार्थांध बनून आंग्ल प्रभूंच्या औदार्याचे व न्यायप्रियतेचे गोडवे गाऊं लागले; आणि पारतंत्र्याच्या दुर्धर बंधनांत आपल्या देशाला कायमचा जखडून टाकण्यास कारणीभूत झाले. अशा स्थितींत अज्ञानानें ग्रासलेल्या आणि दारिद्र्यानें गांजलेल्या जनतेचा असंतोष जागच्या जागींच जिरून गेला तर त्यांत काय नवल? कालमानाप्रमाणें एकेका वर्गाला हाताशीं धरून सर्व लोकांच्या तोंडाला शिताफीनें पानें पुसणाऱ्या ब्रिटिशांच्या या भेदनीतीलाच आम्ही वेळोवेळीं बळी पडलेलों आहोंत.

## शिक्षणयोजनेमागील ब्रिटिशांचें धोरण

एतद्देशीय लोकांवर जसजसे पाश्चात्य जगाचे संस्कार घडत जातील, तसतसे ऐदी सरंजामदारांचें व पाढिक पंडितांचें वर्चस्व कमी होत जाणार हें उघड होतें. आपल्या खास तालमींत तयार झालेल्या आणि अहमहमिकेनें आपल्या राज्याचा उदोउदो करणाऱ्या हस्तकांची ब्रिटिश सरकारला जरूरी होतीच. नफेबाज व्यापाऱ्यांच्या आणि बुभुक्षित नोकरांच्या रूपानें हे त्यांना आयतेच लाभले. हिंदुस्थानच्या सर्वांगीण प्रगतीच्या दृष्टीनें इंग्रजी राज्य हा खरोखर ईश्वरी अनुग्रहच होय, हें तत्त्व यांच्या अंतःकरणांत बिंबण्यासाठीं त्यांना पाश्चात्य पद्धतीचें शिक्षण देणें क्रमप्राप्त होतें. या दृष्टीनेंच ब्रिटिश सरकारनें आपली शिक्षणविषयक योजना आंखली. इ. स. १८२० मध्यें मुंबईस शिक्षामंडळीची स्थापना झाली. तिच्या अमदानींत मुंबई इलाख्यांतलि शैक्षणिक चळवळ बाल्यावस्थेंत होती. वीस वर्षांनीं (इ. स. १८४०) तिचें 'बोर्ड ऑफ् एज्युकेशन' या निमसरकारी संस्थेंत रूपांतर झालें. त्यानंतर मात्र सार्वजनिक शिक्षणप्रसाराच्या कार्याला पद्धतशीर प्रारंभ झाला. इ. स. १८५४ मध्यें स्वतंत्र सरकारी विद्याखातें अस्तित्वांत आलें. ह्या मध्यंतरींच्या काळांत महाराष्ट्रांतील निरनिराळ्या गांवीं इंग्रजी व मराठी शाळा स्थापन झाल्या. सरकारच्या प्रेरणेनें आणि प्रोत्साहनानें पदार्थविज्ञानशास्त्र, रसायनशास्त्र, शिल्पशास्त्र, अर्थशास्त्र, खगोलविद्या इत्यादि विविध विषयांवर मराठींत शालेय पाठ्यपुस्तकें प्रसिद्ध झालीं. या सर्व प्रयत्नांचा उद्देश अगदीं उघड होता. पाश्चात्य विद्या, शास्त्रें, आणि संस्कृति यांचा येथील लोकांना दृढ परिचय व्हावा, इतकेंच नव्हे तर त्यांचा त्यांच्या मनांवर खोल ठसा उमटावा—या धोरणानेंच सरकारचें शिक्षणविषयक कार्य चाललें होतें[1].

आपल्या साम्राज्याच्या सुस्थितीसाठीं ब्रिटिश मुत्सद्यांनीं दूरदर्शीपणानें जो विद्यादानाचा उपक्रम केला, त्यामुळें आधुनिक महाराष्ट्राच्या निर्मितलिा फार मोठी चालना मिळाली यांत अणुमात्र शंका नाहीं. इंग्रजी वाङ्मयाच्या आणि पाश्चात्य शास्त्रांच्या अभ्ययनानें एतद्देशीयांच्या अंतःकरणांत अल्पावधींतच देशाभिमानाची ज्योत प्रज्वलित होईल, पुढेंमागें ते आपलें स्वातंत्र्य हस्तगत केल्याशिवाय राहणार नाहींत याची त्यांना पुरेपूर जाणीव होती. परंतु राज्ययंत्र सुरळित चालण्यासाठीं तरी त्यांना पुढारलेल्या वर्गाला विवक्षित शिक्षण देण्यावांचून गत्यंतर नव्हतें. शिवाय जातिवैमनस्याच्या फुटीर वृत्तीनें खालपासून वरपर्यंत पोखरल्या गेलेल्या ह्या समाजांतील भिन्न भिन्न थरांत ज्या मानानें व क्रमानें जागृति होईल, त्या मानानें हक्कासाठीं व सत्तेसाठीं त्यांचीं भांडणें लागत जातील; आणि या अंतर्गत यादवीचा जास्तींत जास्त फायदा घेऊन

1 " The object of Government we take to be perfectly distinct and intelligible, namely, to make as vigorous an impression upon the Asiatic mind as possible, to rouse it from the torpor into which it has subsided for some hundred years past, and to place it in a condition for receiving and digesting the results of European progress and civilization. " Board of Education, Bombay, Report IV ( 1841 ) P. 22








आपणांस दीर्घकाळ आपलें आसन टिकवितां येईल, हेंहि त्यांनीं अचूक ओळखलें होतें. तत्कालीन इंग्रज अधिकाऱ्यांचीं शिक्षणविषयक पत्रकें व प्रतिवृत्तें पाहिलीं म्हणजे या सर्व प्रश्नांचा त्यांनीं किती बारकाईनें खल केला होता, आणि वरपांगीं उदार आणि व्यापक दिसणारें त्यांचें शिक्षणविषयक धोरण तत्त्वतः किती संकुचित व प्रतिगामी होतें याचा आपोआप उलगडा होतो.

सबंध मुंबई इलाख्याच्या शिक्षणासाठीं सरकारनें मंजूर केलेली रक्कम फारच तुटपुंजी होती. सर आर्स्किन पेरी यानें म्हटल्याप्रमाणें इंग्लंडमधील तत्कालिन एकेका शिक्षणसंस्थेचा खर्चहि या रकमेपेक्षां खात्रित अधिक असेल. त्यांतूनहि एकतृतीयांशापेक्षां जास्त रक्कम एकट्या मुंबई शहराच्या वांट्याला येत असे. ज्या संपन्न शहरांतील धनिक लोकांना द्रव्यसाहाय्याची कमींत कमी आवश्यकता, त्या ठिकाणीं एवढा पैसा खर्च झाल्यानंतर खेड्यापाड्यांतील लक्षावधि लोकांच्या शिक्षणाची आबाळ न झाली तरच आश्चर्य. उलट सद्यःस्थितींत जनता–शिक्षणाचा अवाढव्य कार्यक्रम हातीं घेणें सरकारला मुळींच शक्य नाहीं असा अभिप्राय जबाबदार विद्याधिकाऱ्यांनीं वेळोवेळीं निःसंदिग्धपणें व्यक्त केला आहे. केवळ आर्थिक टंचाईमुळें सामान्य जनतेच्या शिक्षणाचा प्रश्न डावलला जात होता, असेंहि म्हणतां येत नाहीं. त्यांत थोडें राजकीय धोरण होतें. समाजांतील पुढारलेल्या वर्गांत पाश्चात्य संस्कृतीचें बीजारोपण प्रथम व्हावें, आणि त्यांनीं तें नवविचाराचें लोण आपल्या मायभाषेच्या द्वारें थेट खालच्या थरापर्यंत नेऊन पोंचवावें अशी इंग्रज मुत्सद्यांची मनीषा होती. मुंबईंत पहिली इंग्रजी शाळा स्थापन झाली, तेव्हां तिच्यांत शक्य तों सधन व वरिष्ठ वर्गांतील होतकरू विद्यार्थ्यांनाच प्रवेश द्यावा अशी सरकारची स्पष्ट शिफारस होती[1]. पुण्याच्या संस्कृत पाठशाळेंत इ. स. १८५१ पर्यंत ब्राह्मणेतर विद्यार्थ्यांनाहि बंदी होती. पुण्यामुम्बईसारख्या शहरांची ही दशा; मग दूरदूरच्या खेड्यांत अस्पृश्यांच्या मुलांना शिकविण्याची कितपत संधि मिळत असेल त्याची कल्पना करणें अवघड नाहीं. इ. स. १८५० पर्यंत स्त्रीशिक्षणाच्या प्रश्नाबद्दलहि सरकारनें कधीं आस्था दाखविली नाहीं. सारांश, उच्चवर्णीयांच्या परंपरांगत समजुतींना धक्का बसेल अशी कोणतीहि गोष्ट करण्यास सरकारी अंमलदार त्या काळीं तयार नव्हते. विद्येच्या सामर्थ्यावर त्यांचा विश्वास होता. आज ना उद्यां येथील सुशिक्षित लोकच स्वयंस्फूर्तीनें हे प्रश्न धसाला लावतील आणि सरकारबद्दल उगाच लोकांचे गैरसमज होण्याची पाळी येणार नाहीं असा त्यांचा दृष्टिकोन होता. त्यांना सुधारणा घडून यावयास हव्या होत्या; पण त्या लोकांनीं आपण होऊन कराव्या, त्यांत सरकारनें सहसा हस्तक्षेप करूं नये असें त्यांचें मत होतें. पाश्चात्य विद्येचे आपल्या समाजजीवनावर किती दूरगामी परिणाम होण्याचा संभव आहे याची येथलि कूपमंडूक वृत्तीच्या धर्ममार्तंडांना कांहींच कल्पना नव्हती; नाहींतर त्यांनीं सुरवातीपासून सरकारी शिक्षणसंस्थांवरहि कडकडीत बहिष्कार घातला असता. लोकांची ही मनोवृत्ति बरोबर माहीत असल्यामुळें शिक्षणासारख्या पवित्र क्षेत्रांतहि सामाजिक समतेचें तत्त्व अंमलांत आणण्यास सरकार कचरत होतें. तत्कालीन विशिष्ट परिस्थितींत राज्यकर्त्यांच्या दृष्टीनें ही प्रतिगामी भूमिका पत्करणें कदाचित् अपरिहार्यहि असेल, परंतु त्यामुळें लक्षावधि बहुसंख्य लोकांच्या न्याय्य आकांक्षांची करुणास्पद कुचंबणा झाली हें नाकारण्यांत हशील नाहीं.

## ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या चळवळी

निर्वाहाचें साधन नाहीं, शिक्षणाची संधि

---

1 "Government stipulated that, to guard against a mixture of classes which might prevent the higher orders of natives from using the school, a preference should be given to the sons of wealthy natives and to boys who show particular promise of talent." A short history of the Elphinstone High School p. 4








नाहीं, जुन्या धंद्यांत त्राण उरलें नाहीं, नवे व्यवसाय करण्याची पात्रता नाहीं अशा पेंचांत खेड्यापाड्यांतील असंख्य लोक सांपडले होते. सरकारनें त्यांच्याकडे जाणून बुजून पाठ फिरविली. उच्चवर्णीयांनीं त्यांची अजिबात उपेक्षा केली. अशा स्थितींत त्यांच्या खुरटलेल्या जीवनांत अनपेक्षित स्थित्यंतर घडवून आणणारी खिस्ती धर्मप्रचाराची मोहीम महाराष्ट्रांत सुरू झाली. शनिवार वाड्यावर युनियन जॅक फडकण्यापूर्वींच खिस्ती धर्मोपदेशकांनीं मराठी मुलखांत आपलें निशाण रोवलें होतें. त्यांच्या मार्गांत अनंत अडचणी होत्या. धार्मिक तटस्थतेच्या धोरणामुळें सरकारचा त्यांना बिलकूल पाठिंबा नव्हता. महाराष्ट्रांतील पांढरपेशा वर्गानें त्यांना जागोजाग कसून विरोध केला. तेव्हां खेडेगांवांतील दारिद्री जनतेकडे त्यांनीं आपला मोर्चा वळविला. ठिकठिकाणीं केंद्रें स्थापून आधीं त्यांनीं आपल्या भावी कार्यक्षेत्राची कसोशीनें पाहणी केली ज्ञानेश्वर एकनाथादि साधुसंतांच्या या पुण्यभूमींत परधर्मीयांच्या प्रचाराची कांहीं मात्रा चालणार नाहीं, अशी लवकरच त्यांची खात्री झाली. परंतु त्यांनीं एकाएकीं धीर सोडला नाहीं. खेडेगांवांतील बहुसंख्य जनतेची असहाय व केविलवाणी स्थिति त्यांच्या डोळ्यांसमोर होती. या जागीं आपलें जाळें पसरण्यास मुबलक वाव आहे असें त्यांना आढळलें. बायबलांतील धर्मवचनांच्या शाब्दिक प्रचारापेक्षां सेवावृत्तीनेंच या गरीब व गरजू लोकांचीं मनें आपणांस वेधून घेतां येतील असा त्यांनीं कयास बांधला. लोकांच्या भाषेचा, धर्माचा, चालीरीतींचा त्यांनीं आस्थापूर्वक अभ्यास केला. देवळांत, बाजारांत, शेतांत ज्या ज्या स्थळीं चारचौघे गोळा होण्याचा संभव असे, त्या त्या ठिकाणीं जाऊन ते सर्वांशी खेळीमेळीनें वागूं लागले. उपहास, मानहानि, कुचेष्टा यांची त्यांनीं कदर केली नाहीं. लोकांचा तात्कालिक विरोध त्यांनीं शांतपणें सहन केला. हॉल, रीड, ॲलेन, स्टिव्हेन्सन, निस्बिट, विल्सन यांच्यासारखे आदर्श उपदेशक त्यांच्या पदरीं होते. त्यांची आपल्या कार्यावर नितांत निष्ठा होती. अडचणींचा डोंगर पाहून ते डगमगले नाहींत. त्यांनीं शाळा काढल्या, अनाथालयें उघडलीं, रुग्णालयांची स्थापना केली, मुद्रणालयें उभारून हजारों पत्रकें व पुस्तिका विनामूल्य वांटल्या. लोकांच्या दैनंदिन जीवनाशीं त्यांचा उत्तरोत्तर निकट संबंध येत चालला. त्यांच्या अडीअडचणी समजून घेऊन त्या ते तत्परतेनें निवारण करूं लागले. त्यांच्या चारित्र्याचा, धर्मशीलतेचा, त्यागवृत्तीचा प्रभाव पडल्याखेरीज कसा राहणार ? हळुहळु वातावरण निवळत गेलें. त्यांच्या कार्याबद्दल लोकांना उत्सुकता वाटूं लागली. अमेरिकन मिशन, स्कॉटिश मिशन, चर्च मिशन वगैरे धर्मसंस्थांचे प्रचारक गांवोगांव निःशंकपणें फिरूं लागले. हरणै, बाणकोट, चौल, रेवदंडा, आलिबाग, वसई, कल्याण, पुणें, नगर, नाशिक, बेळगांव इत्यादि ठिकाणीं प्रचारकेंद्रें वा शाळा उघडून त्यांनीं सर्व प्रांतभर आपल्या कार्याचा पसारा मांडला.

खिस्ती धर्मोपदेशकांच्या ह्या नानाविध चळवळींचा महाराष्ट्राच्या सामाजिक जीवनावर फार मोठा परिणाम घडून आला. खेड्यांखेड्यांतील दुःखी कष्टी लोकांची इतक्या अगत्यानें आजपर्यंत कोणी विचारपूस केली नव्हती. अन्यायी अंमलदारांनीं व आशाळभूत सावकारांनीं त्यांना कधीं साधी माणूसकी देखील दाखविली नसेल, आपले एतद्देशीय धर्मबांधव पदोपदीं आपली अवहेलना करतात; आणि गोऱ्या राज्यकर्त्यांचे भाईबंद एवढ्या कळकळीनें आपल्याशीं वागतात हें दृश्य खरोखरीच त्यांच्या अंतःकरणाला धक्का देणारें होतें. आमच्या उच्चवर्णीयांच्या ह्या बेजबाबदारपणाचा व समाजपराङ्मुखतेचा खिस्ती धर्मप्रचारकांनीं मनमुराद फायदा घेतला. वरिष्ठ वर्गांच्या धर्मभावनांना भिवून ज्या सामाजिक प्रश्नांकडे सरकार साळसूदपणें डोळेझांक करीत होतें, त्या सर्व प्रश्नांना त्यांनीं बेलाशक तोंड फोडलें. दलितोद्धार, साक्षरताप्रसार, स्त्रीशिक्षण, अस्पृश्यतानिवारण, जातिभेद, बालविवाह इत्यादि विषय आधुनिक काळांत खिस्ती धर्मोपदेशकांनींच प्रथम हाताळले. ब्रिटिश मुत्सद्यांचा दृष्टिकोन केवळ राजकीयच होता. त्यांत अर्थकारणाला प्राधान्य होतें. खिस्ती मिशनऱ्यांची विचारसरणि मुख्यतः धर्मप्रवण असल्यामुळें त्यांना समाजकारण जास्त महत्त्वाचें वाटणें स्वाभाविक









अनुक्रमणिका

होतें. दोघांच्याहि मनांत या देशांत पाश्चात्य संस्कृतीचें वर्चस्व स्थापावयाचें होतें. दोघांनींहि या कामीं भेदनीतीचाच अवलंब केला. राज्यकर्त्यांनीं वरिष्ठ वर्गाला कावूंत घेतलें. धर्मोपदेशकांनीं कनिष्ठ वर्गाची तरफदारी केली. दोघांचे मार्ग भिन्न असले तरी, त्यांचें कार्य परस्परांना पोषक होतें. म्हणूनच कित्येक इंग्रज अधिकारी ख्रिस्ती धर्मसंस्थांना व्यक्तिशः देणग्या देत; आणि बहुतेक धर्मप्रचारक ब्रिटिश सरकारच्या प्रजावात्सल्याचे स्तुतिपाठ गातें. जसजशी राज्याची घडी नीट बसत चालली, तसतसें धर्मप्रचारावरील सरकारी नियंत्रण कमी होत गेलें; आणि पराकाष्ठेचे प्रयत्न करुनाहि ख्रिस्ताच्या कळपांत फार थोडीं मेंढरें सामील होतात असें दिसून येतांच धर्मोपदेशकांची दलितोद्धाराची ऊर्मि ओसरूं लागली.

## ख्रिस्ती धर्मोपदेशकांचें शिक्षणविषयक कार्य

प्रत्यक्ष धर्मांतराच्या प्रचाराला आरंभीं सरकारचा आणि लोकांचा विरोध असल्यामुळें ख्रिस्ती धर्मपंडितांनीं आधीं साक्षरताप्रसाराचें सोज्वल कार्यच हातीं घेतलें. इ. स. १८१३ त अमेरिकन मराठा मिशनची स्थापना झाली. सरकारच्या अगोदर या संस्थेनें मुंबईंत मराठी शाळा उघडल्या. कोळ्यामाळ्यांत मिसळून बौद्धिक शिक्षण ही फक्त ब्राह्मणांचीच मिरास आहे या परंपरागत समजुतीला ख्रिस्ती धर्मोपदेशकांनीं हरताळ फासला. मनुष्यमात्राला विद्यार्जनाचा हक्क आहे, हें तत्त्व महत्प्रयासानें त्यांनीं खालच्या जातींतलि लोकांच्या गळीं उतरविलें[2]. पिढ्यानुपिढ्यांच्या सामाजिक दडपणानें लुप्त झालेला त्यांचा स्वाभिमान जाग्रत झाला. आपलीं मुलें शिकलीं सवरलीं, तर पुढें त्यांना आपल्याप्रमाणें लाजिरवाण्या स्थितींत दिवस कंठावे लागणार नाहींत, अशी या लोकांना आशा वाटूं लागली. शिवाय मुलांनाहि शिक्षणाची गोडी लागावी म्हणून ख्रिस्ती धर्मोपदेशक मधून मधून पाठ्यपुस्तकें, खाऊखेळणीं यांची खैरात करीत. हळुहळू त्यांच्या शाळा लोकप्रिय झाल्या. मुलांची संख्या वाढूं लागली. आणखी शाळा काढाव्या म्हणून गांवोगांवचे लोक मागणी करूं लागले. इ. स. १८२० मध्यें अमेरिकन मिशनच्या मुंबईच्या जवळपास २१ शाळा होत्या; आणि त्यांत सुमारें १०५० विद्यार्थी शिकत होते. इ० स० १८३१ त त्यांची संख्या चौतिसावर गेली, व त्यांच्यामार्फत जवळजवळ २००० विद्यार्थ्यांच्या शिक्षणाची तरतूद झाली. शाळेवर नेमलेले शिक्षक बहुधा एतद्देशीयच असत. मात्र युरोपियन धर्मोपदेशकांची त्यावर देखरेख असे; आणि त्यांच्या आदेशानुसारच शाळांचें काम चालें. स्कॉटिश मिशननें दक्षिण कोंकणांत हर्णै, बाणकोट इत्यादि गांवीं आपला तळ ठोकला; आणि आसपासच्या मुलखांत मराठी शाळा स्थापन केल्या. इ. स. १८२७ सालीं त्यांच्या ताब्यांत ८० शाळा होत्या; व त्यांतलि विद्यार्थ्यांची संख्या ३००० होती. ह्या सर्व ख्रिस्ती संस्थांचा प्राथमिक शिक्षणावर मुख्य भर होता. त्यांच्या शाळेंतील बरेचसे विद्यार्थी अगदीं खालच्या जातींतील असत. मूठभर धनिकांच्या नादीं न लागतां आपण जर ह्या दलितांच्या शिक्षणासाठीं परिश्रम घेतले, तर त्यांचें खात्रीनें चीज होईल, व त्यांच्या आप्तेष्टांनाहि आपल्या कार्याबद्दल कृतज्ञता वाटल्याखेरीज राह-

---

१ " रयतेचें हित तेंच सरकारचें हित, पण गड्या, मी तुला विचारून ठेवतों कीं आमचें मागील सरकार इतका दूरवर विचार कोठें करीत होतें ? त्यास पैक्याची गरज लागे तेव्हां गांवावर घाला घालून तोडमोड, मारहाण करून रयतेचा माल जबरदस्तीनें घेत असें; तसें हें सरकार करीत नाहीं. तेव्हां मी म्हणतों कीं, हें न्यायानें वर्तणारें आहे, आणि उद्योगी मनुष्यांस विशेष अनुकूल आहे "

मिसेस फारार--यात्रेकऱ्याचा वृत्तांत-पृ ८४ ( इ. स. १८३८ )

2 "Let, then, the advantages of education be offered alike to all; let the Brahman be taught that he must trust, not to his supposed superior origin, but to his industry and to his merits; let the despised Shudra be encouraged to feel that he too is a man, and that the road to knowledge and respectability is no longer closed against himself and his children." ज्ञानोदय--पु.--१०--पृ. ३११







णार नाहीं अशी या धर्मोपदेशकांना मोठी उमेद होती. म्हणून ह्या कामीं त्यांनीं अतोनात पैसा खर्च केला; आणि शेंकडो शूद्रातिशूद्रांना साक्षर बनविल्याचें श्रेय संपादन केलें.

ख्रिस्ती धर्मोपदेशक फक्त मुलांच्याच शाळा काढून थांबले नाहींत; त्यांनीं गांवोगांवीं मुलींच्याहि शाळा स्थापन केल्या. हिंदुस्थानांत येणारे बहुतेक पाद्री विवाहित असत. त्यांच्या कुटुंबांतील स्त्रियांनीं ह्या प्रश्नांत सुरवातीपासून लक्ष घातलें. इ.स.१८२४ मध्यें अमेरिकन मिशननें मुंबईंत पहिली मुलींची शाळा काढली. तेव्हांपासून त्यांनीं हें कार्य अव्याहत चालू ठेवलें. इ. स. १८२६ त या मिशनच्या देखरेखीखालीं एकंदर नऊ शाळा होत्या; आणि त्यांतील मुलींची संख्या २१० होती. त्यानंतर मिसेस विल्सन हिनें स्कॉटिश मिशनतर्फे इ. स. १८३० मध्यें मुंबईंतच सहा शाळा उघडल्या. त्यांतील विद्यार्थिनींची संख्याहि दोनशेंहून अधिक होती. नाशिकसारख्या जुनाट क्षेत्रांत मिसेस फारारनें स्त्रीशिक्षणाची मोहीम सुरू केली, आणि मिसेस रीड हिनें नगरला मुलींसाठीं स्वतंत्र शाळा काढली. अशा प्रकारें मुंबई, पुणें, नगर, नाशिक इत्यादि प्रमुख शहरांतून ख्रिस्ती धर्मोपदेशकानें या प्रश्नाला चालना दिली. इतर प्रांतांपेक्षां महाराष्ट्रांत स्त्रीशिक्षणाला जास्त अनुकूल वातावरण आहे असें त्या वेळच्या धर्मोपदेशकांनीं आपले अभिप्राय नमूद करून ठेवले आहेत. तरी देखील रूढिप्रिय सनातन्यांचा कमी विरोध झाला असें नाहीं. उच्चवर्णीयांच्या मुली त्यांच्या शाळेकडे कधींच फिरकत नसत. म्हणून अनाथ मुलींसाठीं मोफत वसतिगृहें स्थापून त्यांना शिक्षण देण्याचा त्यांनीं उपक्रम केला. त्यांच्या शाळेंतील विद्यार्थिनींचें प्रमाण लक्षांत येण्यासाठीं स्कॉटिश मिशनच्या मुंबईंतील शाळांची इ. स. १८३६ मधील आंकडेवारी येथें सादर करतों.

८ प्रॉटेस्टंट + ९ रोमन कॅथॉलिक + ४ ज्यू + ७ मुसलमान + १७ पार्शी + १४४ हिंदु = एकूण १८९. हिंदूंचें वर्गीकरण : ७६ मराठा + २० भंडारी + ६ कोळी + ४ कामाठी + १ सोनार + १ कासार + २ माळी + ४ धोबी + २ साळी + १ मद्रासी + २ ब्राह्मण + २५ महार = १४४.

विद्यार्थिनींची ही आंकडेवारी पाहिली, म्हणजे किती प्रतिकूल परिस्थितींत ख्रिस्ती महिलांनीं या कार्याचा पाठपुरावा केला तें ध्यानांत येतें. आधीं शाळेंत मुली येण्याची मारामार. त्यांतून ज्या कांहीं थोड्या येत त्या बहुधा अनियमित असत; आणि बालविवाहाच्या रूढीमुळें त्यांचा शिक्षणक्रमहि दोन-तीन वर्षांतच संपुष्टांत येई.[1] अशा निरुत्साहजनक परिस्थितींत विल्सन–रीड–मिचेलप्रभृति ख्रिस्ती धर्मोपदेशकांनीं स्त्रीशिक्षणाची आवश्यकता लोकांना पटवून देण्याकरतां अविश्रांत खटपट केली. घरोघरीं जाऊन त्यांनीं प्रौढ बायकांचीं मनें वळविलीं, लहान मुलींना ळळा लाविला; आणि परोपरीनें आपल्या शाळा लोकप्रिय करण्याची शिकस्त केली. महाराष्ट्रांतील स्त्रीशिक्षणाच्या इतिहासांत त्यांचें कार्य चिरस्मरणीय आहे यांत लवमात्र शंका नाहीं.

## ख्रिस्ती प्रचारकांचें आक्रमक धोरण

आपल्या धर्मग्रंथांच्या प्रचाराला अनुकूल भूमिका तयार करण्याच्या इराद्यानें ख्रिस्ती धर्मप्रचारकांनीं साक्षरताप्रचाराचा उपक्रम केला. त्याबरोबर त्यांना नानाविध विषयांवर शालोपयोगी पुस्तकें तयार करावीं लागलीं. पाठ्य पुस्तकांची योजना करतांना विद्यार्थ्यांना सहजगत्या ख्रिस्ती धर्मतत्त्वाची ओळख होईल अशी दक्षता घेतली गेली होती. शिवाय ह्या ख्रिस्तभक्तांनीं आपल्या समग्र धर्मग्रंथांचीं भाषांतरें क्रमाक्रमानें प्रसिद्ध केलीं. इ. स. १८२५–२७ या दरम्यान 'स्कूल बुक अँड स्कूल सोसायटी,' 'बॉम्बे-मिशनरी युनियन,' 'बॉम्बे ट्रॅक्ट आणि बुक

1 "We have, still, occasion to deplore the disadvantages connected with native female education, arising from the early, and frequently capricious, removal of the girls from schools, and from the irregularity of their attendance."

Oriental Christian Spectator, Vol. V (1834) P. 29








सोसायटी ' या संस्था अस्तित्वांत आल्या आणि त्यांनीं खिस्ती धर्मासंबंधीं विपुल वाङ्मय प्रकाशित केलें. ह्या सर्व धर्मसंस्था अतिशय एकोप्यानें व दिलजमाईनें काम करीत होत्या अमेरिकन मिशनचा प्रचार सरळ व एकमार्गी होता; परंतु स्कॉटिश मिशनचे प्रचारक चतुरस्र पंडित होते. स्टिव्हेन्सन, विल्सन, निब्विट यांची असाधारण कार्यनिष्ठा आणि गाढ व्यासंग याबद्दल सरकारी अधिकाऱ्यांना आणि सुशिक्षित युवकांना आदर वाटत होता. त्यांनीं पहिल्यापासून आक्रमक धोरण पत्करलें. आपल्या धर्माची श्रेष्ठता सिद्ध करण्यासाठीं त्यांनीं हिंदु धर्म व समाजरचना यांची दोषैकदृष्टीनें छाननी करण्यास प्रारंभ केला[१]. कनिष्ठ जातींतील लोकांना त्यांच्यावर होणाऱ्या अन्यायाची व जुलमाची वेळोवेळीं जाणीव करून देऊन त्यांचा बुद्धिभेद करण्याची संधि सहसा वाया दवडली नाहीं. हिंदुधर्म, प्रसिद्धीकरण, भगवद्गीतेचें सार, ब्राह्मणांचें महत्त्व, मूर्तीचा उच्छेद, पुनर्जन्मनिर्णय इत्यादि ग्रंथ त्यांनीं प्रसिद्ध केले. निरनिराळ्या धर्मांवर प्रकट हल्ला करून त्यांच्या कैवाऱ्यांना आपल्या पक्षाचें मंडण करण्यास त्यांनीं आव्हान दिलें. मोरभट दांडेकर, स्वदेशधर्माभिमानी नारायणराव, कृष्णशास्त्री साठे यांनीं हिंदु धर्माची बाजू घेऊन खिस्ती पंडितांशीं दोन हात केले.[२] मूर्तिपूजा, पुनर्जन्म, बालविवाह, अस्पृश्यता, जातिभेद इत्यादि धार्मिक व सामाजिक प्रश्नांची राजरोस चर्चा होऊं लागली. केवळ खिस्ती धर्मोपदेशकांच्या वाक्प्रहारांनीं शेंकडों वर्षें चालत आलेल्या रुढि कधीं नाहींशा झाल्या नसत्या, परंतु सामाजिक दृष्ट्या आतां त्यांचें प्रयोजन संपलें होतें, इतकेंच नव्हे तर बदललेल्या परिस्थितींत आम्हांलाहि त्या अनिष्ट व तापदायक वाटूं लागल्या होत्या. त्यामुळें खिस्ती धर्मोपदेशकांच्या टीकेंत कितपत तथ्य आहे याची शहानिशा केल्याखेरीज आम्हांला गत्यंतर नव्हतें. त्यांना निरुत्तर करण्याच्या निमित्तानें कां होईना, सनातनी पंडितांना नवें कालमान लक्षांत घेऊन जुन्या तत्त्वांचें व रुढींचें पुन्हां परिशीलन करणें भाग पडलें.

## आधुनिक सुधारणावादाचा जन्म

याप्रमाणें महाराष्ट्राच्या सामाजिक जीवनांत दोन भिन्न कार्यप्रवाह वेगवेगळ्या दिशेनें परिवर्तन घडवून आणीत होते. सरकारी शिक्षणक्रमांतून नवशिक्षितांची पहिली पिढी बाहेर पडली. बाळशास्त्री जांभेकर, भाऊ महाजन, दादोबा पांडुरंग यांच्यासारखे कांहीं अपवाद वगळले तर या अर्धशिक्षितांत खऱ्या ज्ञानलालसेचा अभावच होता[३].

पांचसात ' बुकें ' शिकून इंग्रजी भाषेचें मामुली

१ " आम्ही ज्या आज्ञा कळविल्या त्या पाहून वाचणारांस लज्जा आणि खेद वाटणार नाहीं हें अशक्य आहे. त्या आज्ञा अतिशय वाईट आहेत. त्या नीतीचा नाश करणाऱ्या आहेत. जर त्या खिस्ती शास्त्रांतील वचनांशीं ताडून पाहिल्या तर आकाशांतील प्रकाश आणि नरकांतील अंधःकार यांत जितकें अन्तर तितकेंच त्यांत दिसून येईल."
हिंदुधर्मप्रसिद्धीकरण--( दुसरें ) पृ ५६

२ " पाद्री याणी आजपर्यंत बहुत द्रव्य खर्च करून व श्रम करून त्यांचे उद्योग किती सुफल झाले हें त्यांचे लक्षांत असेलच. किती विद्वान् हिंदूंनीं आपला धर्म टाकून आजपर्यंत खिस्ती धर्म घेतला आहे हा त्यांनीं विचार करावा आणि एथील लोक न्यू झीलंड व अमेरिका एथील आरण्यक पशुतुल्य लोकांसारिखे सहज बाटले जाणार नाहींत, आणि त्यांचीं शास्त्रें सर्व विषयेंकरून परिपूर्ण आहेत हें पक्कें लक्ष्यांत ठेवावें." किल्ला-पृ. १५०

३ " There is a great desire on the part of native young men to study English. I would not at all intimate that this desire springs from a love of knowledge for its own sake. Its source is, doubtless, the conviction which is daily increasing in the native mind, that, ere long, a knowledge of English will be the chief, if not the sole, road to situations of honour and emolument."—Board of Education, Bombay. Report I ( 1840—41 ) p. 17







ज्ञान मिळविलें, आणि एकदां कायमची सरकारी नोकरी पटकाविली कीं, आयुष्याची इतिकर्तव्यता झाली अशी त्या काळीं सर्वमान्य समजूत होती. सन १८४०—५५ या दरम्यान महाराष्ट्रांतील बहुतेक जिल्ह्यांच्या मुख्य ठिकाणीं इंग्रजी विद्यालयें स्थापन झालीं. पुणें, नगर, नाशिक, सातारा, बेळगांव, सांवतवाडी, रत्नागिरी इत्यादि शहरांत वाचनालयें निघालीं. दर्पण, दिग्दर्शन, प्रभाकर, ज्ञानसिंधु, ज्ञानोदय, उपदेशचंद्रिका, ज्ञानप्रकाश, ज्ञानस्मारक, विचारलहरी इत्यादि नियतकालिकें प्रसिद्ध होऊं लागलीं. निरनिराळ्या शास्त्रीय व व्यावहारिक विषयांवर मराठींत बरेचसे भाषांतरात्मक व कांहीं थोडे स्वतंत्र ग्रंथ छापले गेले. दळणवळणाचीं नवीननवीन साधनें अस्तित्वांत आल्यामुळें ज्ञानप्रसाराचें कार्य सुकर झालें. महाराष्ट्राच्या सर्व भागांत पाश्चात्य विद्येचा प्रकाश, अत्यल्प प्रमाणांत कां होईना, जाऊन पोहोंचला. इंग्रजी भाषेच्या द्वारेंच आमच्या बुद्धिजीवी वर्गाला आधुनिक जगाची तोंडओळख झाली. पाश्चात्यांचें राजकीय व सांस्कृतिक ऐश्वर्य पाहून आमच्या सुशिक्षितांची मति गुंग झाली.

' आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेन—
माश्चर्यवद्वदति तथैव चान्यः ।
आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति
श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् ॥

या श्लोकांत वर्णन केल्याप्रमाणें त्यांचें वाङ्मय, तत्त्वज्ञान, इतिहास, राज्यघटना यांकडे आश्चर्यस्तिमित नजरेनें सर्वजण बघूं लागले. पण त्यांपैकीं फारच थोड्या लोकांना त्यांच्या अंतःस्वरूपाचें यथार्थ आकलन झालें असेल. इंग्रजी वाङ्मय हें वाघिणीचें दूध खरें, पण तें सगळ्यांना एकदम पचलें नाहीं. त्यामुळें नवशिक्षितांत राज्यकर्त्यांबद्दल नसता न्यूनगंड निर्माण झाला. त्यांचे राष्ट्रीय गुण आत्मसात् करण्याची धमक नसल्यामुळें त्यांच्या बाह्य जीवनाचें अंधानुकरण करण्याची प्रवृत्ति सर्रास बोकाळली. परकीय अंमलदारांची सदोदित खुशामत करून गोरगरिबांना पिळून काढण्यांतच या पिढीनें आपले गुण उधळले[१]. जुन्यांची सद्दी संपली होती. नव्यांनीं ताळतंत्र सोडला होता. समाजजीवनाच्या प्रत्येक शाखेंत बौद्धिक अराजकच माजलें. सरकारच्या स्वार्थी धोरणानें व खिस्ती धर्मोपदेशकांच्या खोडसाळ प्रचारानें समाजजीवनाचा पाया ढासळून पडतो कीं काय, असें भय उत्पन्न झालें. त्यामुळें देशांतील विचारवंत व कर्तबगार लोक अंतर्मुख बनले. सध्याच्या संक्रमणावस्थेंत समाजांत बऱ्यावाईट अनेक प्रवृत्तींचा सुळसुळाट झाला आहे. तेव्हां शांत चित्तानें त्यांचें पर्यालोचन करून पुरोगामी प्रवृत्तींचा निर्भीडपणें पुरस्कार केल्याखेरीज घडगत नाहीं, याची त्यांना तीव्रतेनें जाणीव झाली. भांबावलेल्या जनतेला योग्य मार्गदर्शन करण्याच्या त्यांच्या या प्रेरणेंतून आधुनिक सुधारणावादाचा जन्म झाला.

---

१ " आमचेच लोक आपला नाश करून घेतात यास हें एक दुसरें उदाहरण पाहा. याचप्रमाणें कंपनीचें राज्यांतही मामलेदार व शिरस्तेदार अवल पिकांचें निमित्तानें रयतेस बुडवितात. या लोकांस स्वदेशाभिमान वगैरे जे गुण आहेत ते ऐकून देखील माहीत नाहींत; मग आंगीं असणें कोठून! याचे हे असे परिणाम घडून येतात. हिंदूंची जात ही केवळ श्वान जातीप्रमाणें आहे. हे आपाआपल्यांत भांडण्यास व एकमेकांचा द्वेष करून घरें बुडविण्यांत मोठे समर्थ आहेत. परंतु इतर जातींशीं इतके भ्याड आहेत कीं गोरे लोकांचे पुढें त्या बिचाऱ्यांस घाबरून शुद्धि सुचेनाशी होते. "

प्रभाकर—१६ जानेवारी १८४२








# आनंद केन्टिश कुमारस्वामी

श्री. पां. ग. देशपांडे

" कला, जीवन, धर्म व भक्ति यांचें इतकें सूक्ष्म आकलन करून घेऊन त्यांचें खरें हार्द इतक्या चातुर्यानें प्रतिपादन करणारा दुसरा एकहि लेखक विद्यमान लेखकांत नाहीं अशी माझी समजूत आहे. "

—एरिक जिल

भारतीय कला, तत्त्वज्ञान, धर्म, साहित्य, भाषा इत्यादि भारतीय संस्कृतीच्या विविध अंगांचा सखोल अभ्यास करून तिच्या मुळाशीं असलेल्या रहस्याचें उद्घाटन करून तें आपल्या देशबांधवांच्या पुढें एका सिद्धहस्त कलाकाराच्या थाटानें मांडणारे, तिच्या उपासनेप्रीत्यर्थ व सेवेप्रीत्यर्थ आपलें सर्वस्व अर्पण करणारे आणि कोणत्याहि प्रकारच्या प्रलोभनांनीं विचलित न होतां स्वतःचें जीवनकार्य एकनिष्ठपणें करीत राहून जगांतील विद्वानांमध्यें एक अद्वितीय कलामीमांसक व तत्त्वचिंतक म्हणून ख्याति मिळवणारे असे श्री. आनंद केन्टिश कुमारस्वामी हे गेल्या सप्टेंबरच्या १० तारखेस अमेरिकेंत बॉस्टननजीक वयाच्या सत्तराव्या वर्षीं मरण पावले. त्यांच्या जीवनाची व कार्याची माहिती तर दूरच राहो, परंतु त्यांच्या मृत्यूची बातमी देखील देण्याची आपल्या देशी वर्तमानपत्रांना आवश्यकता वाटली नाहीं. कुमारस्वामींनीं प्रसिद्धीची कधीं पर्वा केली नाहीं. ही गोष्ट सिद्ध करण्यास आणखी वेगळ्या पुराव्याची कांहींच जरूर नाहीं.

## विद्याभ्यास

कुमारस्वामी यांचा जन्म सिलोनमध्यें कोलंबो मुक्कामीं मुदालियार नांवाच्या एका घरंदाज व प्रतिष्ठित कुटुंबांत २२ ऑगस्ट १८७७ रोजीं झाला होता. त्यांचे वडील सर मुथु कुमारस्वामी मुदालियार हे एक सुखवस्तु गृहस्थ असून त्यांना विद्येची चांगली अभिरुचि होती. संस्कृत, प्राकृत व पाली या भाषा त्यांना चांगल्या अवगत होत्या. इंग्रजी भाषेवर देखील त्यांचें प्रभुत्व होतें. सिलोनच्या कायदेमंडळाचे ते एक सभासद होते. तेथें व लंडन येथील शिष्ट समाजांत त्यांच्या ठसकेबाज इंग्रजी वक्तृत्वाची चांगलीच छाप पडे. एकदोन बौद्ध ग्रंथांचीं पालीमधून इंग्रजी भाषांतरें प्रथम त्यांनींच केलीं असें म्हणतात. ' आरिचन्द्र ' (?) नांवाच्या एका संस्कृत नाटकाचेंहि इंग्रजी भाषांतर करून तें त्यांनीं राणी व्हिक्टोरियास अर्पण केलें आहे. पूर्वेकडील देशांतून प्रथम बॅरिस्टर होण्याचा व ' सर ' ही पदवी प्राप्त करण्याचा पहिला मान त्यांनाच द्यावा लागतो. पामर्स्टन, डिझ्रायली वगैरे बड्या बड्या इंग्रजांशीं त्यांची खूप मैत्री होती.

सर मुथूंचें लग्न इंग्लंडमधील एका जुन्या घराण्यांतील एलिझाबेथ क्ले बिबी या नांवाच्या महिलेशीं इ. स. १८७६ सालीं झालें होतें. आनंद कुमारस्वामी हे या दंपतीचेंच अपत्य होत. त्यांच्या नांवांतील केंटिश हा शब्द त्यांच्या इंग्रज मातेमुळेंच दाखल झालेला आहे.

आनंद कुमारस्वामी दोन वर्षांचे असतांनाच त्यांचे वडील वारले. तेव्हां त्यांच्या मातुःश्री मुलास घेऊन विलायतेस गेल्या, व तेथेंच आनंदाचें सर्व शिक्षण झालें. ( त्यांच्या मातुश्री थेट १९४२ पर्यंत हयात होत्या. ) जवळ जवळ २५ वर्षांचें वय होईपर्यंत कुमारस्वामी शिक्षणाच्या निमित्तानें इंग्लंडांत










अनुक्रमणिका

राहिले. प्रथम ग्लॉसेस्टर परगण्यांतील स्टोनहाऊस येथील विक्लिफ कॉलेजांत व नंतर लंडनच्या युनिव्ह-र्सिटींत त्यांचें शिक्षण झालें. विज्ञान हा त्यांचा खास अभ्यासाचा विषय होता; व त्यांतूनहि भूस्तर-विज्ञान व खनिजशास्त्र यांची त्यांना विशेष गोडी होती. कॉलेजांत भूस्तरविज्ञान व खनिजशास्त्र हे दोन विषय घेऊन त्यांनीं लंडन युनिव्हर्सिटीची बी. एससी. ची परीक्षा दिली व तींत ते पहिल्या वर्गांत पास झाले. पुढें त्यांना लंडनच्या युनिव्हर्सिटी कॉलेजमध्यें फेलो नेमण्यांत आलें. वयाच्या बाविसाव्या वर्षीं त्यांचा ' सिलोन रॉक्स ॲण्ड ग्रॅफाइट ' या विषयावरील लेख ' क्वार्टर्ली जर्नल ऑफ धि जिऑलॉजिकल सोसायटी ' मध्यें प्रसिद्ध झाला होता. त्यावरुन आपल्या अभ्यासाच्या विषयावरील त्यांचें प्रभुत्व चांगलें दिसून येतें. वयाच्या पंचविसाव्या वर्षी म्हणजे इ. स. १९०२ मध्यें त्यांची सिलोनच्या खनिज–पाहणी व संशोधन-खात्याचे संचालक म्हणून नेमणूक झाली. या जागेवर असतांना त्यांनीं भूस्तर-विज्ञानाच्या क्षेत्रांत जें संशोधनकार्य केलें त्यावरुन त्यांना लंडन युनिव्हर्सिटीकडून ' डॉक्टर ऑफ सायन्स ' ही पदवी मिळाली. ' सिलोनच्या खनिज संपत्तिचा पाहणीचा अहवाल ' हा त्यांचा पहिला ग्रंथ होय.

## सिलोनांत

ज्या काळांत कुमारस्वामी इंग्लंडांत विद्याभ्यास करीत होते, त्या काळीं तिकडे जॉन रस्किन आणि विलियम मॉरिस या दोघांचा प्रभाव सार्वत्रिक पसरलेला होता. कुमारस्वामींचे कॉलेजांतील अभ्यासाचे विषय जरी विज्ञानाच्या क्षेत्रांतील होते, तरी या दोन समर्थ जीवनवीरांचा प्रभाव त्यांच्या मनावर पडल्याशिवाय राहिला नाहीं. त्यांचें मानस हें कविमानस होतें. कला, काव्य, व अध्यात्म या विषयांची गोडी त्यांना प्रथमपासून असावीसें वाटतें. त्यांच्या आवडत्या ग्रंथकारांत एकहार्ट, संत ऑगस्टाईन, व क्लाउड ऑफ धि अन्नोइंग, मॉरिस, विलियम ब्लेक, वगैरे युरोपकडील अनेक साहित्यिक व अध्यात्मवादी आहेत. भारतीय ग्रंथ व ग्रंथकारांचीं नांवें देण्याची जरूरच नाहीं. रस्किन आणि मॉरिस हे कला, हातकारागिरी व साध्या जीवनाचे प्रखर पुरस्कर्ते होते आणि यंत्रांच्या उत्तरोत्तर वाढत चाललेल्या प्रसारानें समाजाचें जीवन कसें छिन्नविच्छिन्न होत आहे, यंत्र ही माणसाच्या माणुसकीचा नाश करणारी वस्तु आहे, त्याच्यासमोर टिकाव धरण्यास हातकारागिरीला प्रतिष्ठित बनविलें पाहिजे, तींत असलेल्या सौन्दर्याची लोकांना जाणीव करुन दिली पाहिजे, इंग्लंडांत सर्वत्र—विशेषतः शहरांतून—यंत्रयुगामुळें जी श्रीहीनता व ओंगळपणा पसरला होता तो नाहिंसा करुन रोजच्या वापराच्या वस्तूंतहि सौन्दर्य दाखल करावयास पाहिजे, असें ते म्हणत व त्यासाठीं सतत झटत. त्यांच्या या विचारांचे संस्कार कुमारस्वामींच्या मनावर चांगलेच उमटले होते. तेव्हां त्यांचें शिक्षण पूर्ण झाल्यावर जेव्हां ते एका उंच पदावर नेमणूक होऊन सिलोनांत आले व स्वतःच्या कामानिमित्तानें त्या देशांत इकडून तिकडे भ्रमण करूं लागले व सिलोनमधील लोकजीवनाशीं त्यांचा संपर्क येऊं लागला, तेव्हां पाश्चिमेकडील यंत्रोद्योगवादाची सावली सिलोनवर देखील पडली आहे व त्यामुळें देशी हुन्नरउद्योग व हस्तव्यवसायांचा नाश होत आहे, साधनसंपन्न लोक स्वतःच्या प्राचीन वारशाला विसरुन पोषाख, राहणीकरणी इत्यादि बाबतींत इंग्रजांचें अनुकरण करीत आहेत, बाटवण्याच्या उद्देशानें चालविण्यांत येणाऱ्या मिशनऱ्यांच्या शिक्षणसंस्थांत जात आहेत व सर्वरीत्या इंग्रजांचें आंधळें व बाह्य अनुकरण करण्याच्या मागें लागले आहेत व स्वतःची राष्ट्रीयता गमवीत आहेत असें त्यांच्या नजरेस आलें व हें दृश्य त्यांना पाहवलें नाहीं. मिशनरी लोकांच्या शिक्षणानें स्थानिक प्रजेच्या जीवनाच्या मुळांवरच घाव पडत आहे असें त्यांना वाटलें. इ. स. १९१० मध्यें सिलोनच्या लोकांच्या सतत मागणीमुळें जेव्हां तेथील इंग्रज सरकारनें सिंहली भाषेचें शिक्षण शाळांतून आवश्यक करण्याचें धोरण स्वीकारलें, तेव्हां सरकारच्या त्या कृत्याचा निषेध करण्यासाठीं त्या टापूंत काम करणाऱ्या मिशनऱ्यांच्या शिक्षणसंस्थांच्या ' सिलोन एज्युकेशनल ॲसोसिएशन ' नांवाच्या मंडळानें एक सभा मुद्दाम घेतली होती. त्या सभेंत एक पादरी महाशय असें म्हणाले, " सिंहली ही तर








# आनंद केन्टिश कुमारस्वामी

सिलोनी लोकांची गृहभाषा (होमलँग्वेज) आहेच; तेव्हां ती शाळेंत शिकविण्याची कांहीं जरूर नाहीं!'' दुसरें एक बाळ तर यापुढें जाऊन निःसंकोचपणें असें उद्गारलें "मी तर माझ्या शाळेंत कोणी विद्यार्थी सिंहली बोलला तर त्याला सजाच फटकारतों!!" या प्रसंगावरून त्या वेळच्या सिलोनमधील परिस्थितीची कांहींशी कल्पना आपल्याला येते व चीड आल्याशिवाय राहत नाहीं. इंग्रजी शिक्षणाचा मोह येथें इतका सार्वत्रिक झाला होता कीं केंब्रिज लोकलची परीक्षा पास करवून घेणें म्हणजे मुलींच्या बाबतींत हुंड्याचें काम पार पाडल्यासारखें होई.

कुमारस्वामींची वाढ इंग्लंडांतील स्वतंत्रतेच्या वातावरणांत झालेली होती. तेथील विद्यार्थ्यांना शाळाकॉलेजांतील शिक्षणाखेरीज भोंवतालच्या वातावरणांतून व लोकजीवनांतून जीवनोपयोगी अशी इतरहि पुष्कळ शिदोरी मिळते; कुमारस्वामींना देखील ती मिळाली होती. इंग्रजी हुकमतीविषयीं, मिशनरी लोकांच्या बाटवण्याच्या प्रवृत्तीविषयीं, तसेंच मेकॉलेप्रणीत इंग्रजी शिक्षणाविषयीं त्यांच्या मनांत तीव्र उद्वेग उत्पन्न झाला. व्यापार-उद्योगांत उपयोगीं पडणाऱ्या सिलोनमधील खनिज संपत्तीचें संशोधन ते करीत होते. ह्यावेळींच तेथील सांस्कृतिक खनिज संपत्ति—इतस्ततः जागजागीं पसरलेले पुरातत्त्वाचे व कालग्रस्त होत चाललेल्या सिलोनच्या लोकजीवनाचे अवशेष—हीं देखील त्यांच्या दृष्टीस पडत होतीं. आणि या सांस्कृतिक संपत्तिचें मूल्य त्या लौकिक खनिज संपत्तीपेक्षां त्यांना जास्त वाटलें. म्हणून आपल्या देशाची दिवसेंदिवस जास्त जास्त बिघडत चाललेली अवदशा पाहून पाश्चात्य संस्कृतीच्या त्या प्राणघातक आक्रमणापासून सिंहली संस्कृतीचें व तेथील हुन्नरउद्योग व हस्तव्यवसायांचें संरक्षण करण्याच्या कामीं आपल्याकडून होईल तें करण्यासाठीं कुमारस्वामींनीं निर्भयपणें कंबर कसली. त्यांचें लग्न एका इंग्रज रमणीशीं झालें होतें. एका सरकारी उच्च हुद्यावर ते होते. पत्नीशीं तत्रि मतभेद पत्करुन त्यांनीं प्रतिष्ठा, संपत्ति व आरामाचें जीवन देणाऱ्या सरकारी नोकरीचा राजीनामा दिला; आणि सिंहलच्या व भारताच्या कलेची व संस्कृतिची सेवा करण्याची त्यांनीं दीक्षा घेतली. त्यांचें हें करणें त्यांच्या बायकोस पसंत पडलें नाहीं व तिनें कुमारस्वामींशीं काडीमोड करून घेतली.

## 'सिलोनची मध्ययुगीन कला'

आपल्या राष्ट्रीय कार्याचा प्रारंभ कुमारस्वामींनीं 'सिलोन नॅशनल रिव्ह्यू' चें संपादन कार्य हातीं घेऊन व राष्ट्रीय शिक्षण व सामाजिक सुधारणेची संस्था स्थापून केला. त्याबरोबरच सिलोनभर प्रवास करून तेथें पूर्वापार चालत आलेल्या हुन्नरउद्योगांचें व हस्तव्यवसायांचें आणि कारागिरांच्या महाजनाचें निरीक्षण आणि अध्ययन केलें. व त्याचा परिपाक म्हणून 'मिडीवल सिंहलीज आर्ट' (सिंहलची मध्ययुगीन कला) या नांवाचा एक सुंदर मोठा ग्रंथ लिहिला. या ग्रंथांतील विचार, भाषा इत्यादींवर म्हणजे त्यांच्या अंतरंगावर विलियम मॉरिसचा प्रभाव पडलेला दिसून येतो, इतकेंच नव्हे तर त्यांतील कागद, छापकाम वगैरेंवर म्हणजे त्याच्या बहिरंगावरहि मॉरिसच्या कलेची छाप पडलेली आपल्या दृष्टीस पडल्याशिवाय राहत नाहीं. ज्या छापखान्यांत मॉरिसचें छापण्याचें काम चालें, त्याच छापखान्यांत (हँडप्रेसमध्यें) हा ग्रंथ छापण्यांत आला होता. भगिनी निवेदिता या हा ग्रंथ पाहून फारच प्रसन्न झाल्या व त्यांनीं त्यावर एक विस्तृत समालोचना लिहून त्याच्या अंतरंग व बहिरंगाची अतोनात वाखाणणी केली. लेखकाच्या भाषेची महाकाव्यें व महाकथा (एपिक्स अँड सागाज्) च्या भाषेशीं तुलना केली. पूर्वेकडील पारिभाषिक शब्दांसाठीं त्यानें योजलेल्या समुचित इंग्रजी पर्यायाबद्दल त्याचें अभिनंदन केलें; 'पूर्व व पश्चिम दोहोंकडील कला व संस्कृतिचें त्यास उत्तम आकलन झालेलें दिसतें आणि म्हणून असें काम करण्यास त्याची पात्रता बिनतोड आहे,' असें सांगून शेवटीं त्यांनीं असें म्हटलें कीं, स्वदेशी व राष्ट्रीय भावनेस ज्ञान व संस्कृतीचा जो भरभक्कम पाया पाहिजे तो पाया अशा ग्रंथाच्या द्वारेंच मिळूं शकतो. या ग्रंथांत कुमारस्वामींनीं सिलोनमधील लोकजीवनाची ऐतिहासिक समालोचना करून तेथील कारागिरांचें सामाजिक जीवनांत कसें प्रतिष्ठित स्थान








होतें त्याची आणि त्यांच्या महाजनांची ( गिल्ड्‌ज् ) व सिलोनच्या कलेची सुरस माहिती दिली आहे. या ग्रंथानें कुमारस्वामींसाठीं एकदम आंतरराष्ट्रीय ख्याति व प्रतिष्ठेचें दार उघडलें

## हिंदुस्थानाकडे

परंतु सिलोनच्या संस्कृतीचीं अमुक अशीं कांहीं वैशिष्ट्यें असलीं तरी मुळांत ती भारतीय संस्कृतीची एक शाखाच होय, तिचें एक अंगच आहे, असें कुमारस्वामी यांचें दृढ मत होतें. सिलोन व हिंदुस्थान यांना ते वेगळे क्वचितच मानीत.

सिलोनचें राज्यतंत्र हिंदुस्थानापासून वेगळें ठेवून इंग्रजांनीं सिलोनचें पारावार नुकसान केलें आहे, असें ते म्हणत. तेव्हां भारतीय संस्कृतीचें सखोल अध्ययन करण्याकडे त्यांनीं वळावें हें अगदीं स्वाभाविक होतें. इतकेंच नव्हे, तर सिलोनच्या कलेवरील त्यांचा उपर्युक्त ग्रंथ पाहून त्यांच्या कित्येक मित्रांनीं त्यांना तसें करण्याचा आग्रहपूर्वक सल्ला देखील दिला. कुमारस्वामींच्या ठिकाणीं पूर्वेकडील कल्पनाशक्ति व भावना आणि पाश्चिमेकडील–विशेषतः तिकडील विज्ञानाची–कार्यसाधकता व सूक्ष्मदृष्टियुक्त चिकाटी यांचा वारशानें व शिक्षणानें चांगला सुमेळ जमलेला होता. त्यामुळें ते या कार्यासाठीं किती सुयोग्य होते व तें काम त्यांनीं कसें पार पाडलें हें त्यांच्या अर्धशतकावरील लहानमोठ्या ग्रंथांवरून उत्तम दिसून येतें.

## भारतमाता

तो काळ हिंदुस्थानांतील वंगभंगाच्या विरोधाच्या चळवळीचा होता; स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण व स्वराज्य या लाल–बाल–पाल व अरविंद-प्रणीत चतुःसूत्रीचा होता; हिंदुस्थानाच्या उत्थानाचा होता. कुमारस्वामी हिंदुस्थानालाच आपली मातृभूमि समजत, कारण त्यांच्या मतें सिंहल हा हिंदुस्थानच्या इतर प्रांतांप्रमाणें केवळ एक प्रांत होता. या वेळीं त्यांनीं काढलेलें भारतमातेचें शब्दचित्र त्यांच्या मनांत वसत असलेल्या मातृभूमीविषयीं गंभीर अनुराग व भक्तीचें उत्तम प्रतीक आहे. मातेची करुणदशा वर्णून नंतर तिचीं मुलें आतां जागीं झालीं असून तीं आतां लवकरच मातेचें पांग फेडतील, असा आशावाद त्यांनीं व्यक्त केला आहे.

कुमारस्वामी भारताकडे वळले. त्यांनीं सर्वत्र देशाचा प्रवास करून त्याचें साक्षात् दर्शन घेतलें. शिल्प, स्थापत्य, चित्र इत्यादींचे त्याचे प्राचीन अवशेष, त्याच्या कलेचे सर्वोत्तम नमुने पाहिले, कित्येक वस्तूंचा संग्रह पण केला आणि त्या सर्व वस्तूंच्या सौंदर्याचें व रहस्याचें आपल्या देशबांधवांना यथायोग्य आकलन व्हावें म्हणून त्यांनीं भारतीय कलेच्या मूलभूत सिद्धांतांचें निरूपण सुरू केलें. पाश्चात्यांच्या कलेशीं तिची तुलना केली आणि भारतीय संस्कृतीचा जगाला–पश्चिमेला–काय संदेश आहे, त्याचें एक मार्मिक व जोरदार वर्णन 'मेसेज ऑफ दि ईस्ट' ( पूर्वेचा संदेश ) या छोट्याशा निबंधांत केलें. हा निबंध लहान असला तरी मोठा विचारप्रवर्तक आहे. पश्चिमेचा पूर्वेवर घडणारा परिणाम चोहोंकडे आपल्या नजरेस पडतो. कारण तो जीवनाच्या वरच्या थरालाच केवळ स्पर्श करतो. परंतु पूर्वेचा पश्चिमेवर घडून येणारा परिणाम आपल्या जरी चटकन् नजरेस पडत नाहीं, तरी तो फार खोल व मूलगामी आहे. ग्टे, डायसन, कँट, शोपेनहॉर, वीनिंजर ( Weininger ) हे या परिणामाचे द्योतक होत असें त्यांनीं म्हटलें आहे आणि शेवटीं असा आत्मविश्वास व्यक्त केला आहे कीं, पंधराव्या–सोळाव्या शतकांत लॅटिन व ग्रीक विद्येच्या पुनरुज्जीवनानें युरोपांत जी क्रांति झाली तिच्यापेक्षांहि जास्त दूरगामी क्रान्ति पूर्वेच्या पश्चिमेवर होत असलेल्या परिणामामुळें घडून येणार आहे.

## स्वदेशी

राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या चळवळीबाबत कुमारस्वामींनीं या काळांत फार जोरदार लेख लिहिले आहेत. त्यांपैकींच कांहीं नंतर 'आर्ट ॲन्ड स्वदेशी' ( कला आणि स्वदेशी ) व 'एसेज इन नॅशनल आयडियालिझम्' 'राष्ट्रीय ध्येयवादाविषयीं लेख' या दोन पुस्तकांच्या रूपानें प्रसिद्ध करण्यांत आले. स्वदेशीविषयीं बोलावयाचें तर कुमारस्वामींपेक्षां स्वदेशीचा जास्त समर्थ विवे-








# आनंद केन्टिश कुमारस्वामी

चक व पुरस्कर्ता क्वचितच्च आढळेल. आपल्याला नेहमी लागणाऱ्या वस्तू आपण आपल्या देशांतच निर्माण करून परदेशांतून आयात होणाऱ्या वस्तू बंद करून देशाला आर्थिक शोषणापासून बचावणें, हा स्वदेशीचा प्राथमिक उद्देश मान्य केल्यावर देखील स्वदेशीच्या बाबतींत विचार करण्यासारखें पुष्कळ शिल्लक राहतें. परदेशी कारखान्यांत तयार होऊन येणाऱ्या अनेक गचाळ व कुचकामाच्या वस्तू आपण आपल्या देशांत निर्माण करणें हा कांहीं स्वदेशीचा अर्थ नव्हे, असा त्याचा उद्देश असतां कामा नये. परंतु लोकांच्या जीवनांत वाटेल तसल्या श्रीहीन व निरर्थक वस्तू दाखल होणार नाहींत, इकडे स्वदेशीच्या पुरस्कर्त्यांनीं लक्ष द्यावयास पाहिजे. मँचेस्टरच्या कारखान्यांच्या ऐवजीं मुंबई अहमदाबादच्या कारखान्यांनीं आपल्या साळीकोष्ट्यांना बेकार बनवावें; दोन्हीं सारखेंच आहे. स्वदेशीच्या नांवानें या दुसऱ्याला कवटाळण्यांत कांहीं अर्थ नाहीं. थोडक्यांत म्हणजे, परदेशाहून येणाऱ्या गचाळ, चैनीच्या किंवा निरुपयोगी वस्तू देशांत बनवून वापरण्याऐवजीं स्वदेशी वृत्ति व स्वदेशी मानस कमावणें हें स्वदेशीच्या चळवळीचें लक्ष असावयास पाहिजे, असें ते म्हणत. स्वदेशीच्या अर्थाला जास्त व्यापक व खोल बनवून ते त्याला आध्यात्मिकतेपर्यंत नेत. ज्याच्यासाठीं हिंदुस्थानाची पूर्वापार ख्याति चालत आलेली आहे, त्या 'आतिथ्या'च्या गुणासाठीं तरी निदान स्वदेशीचा स्वीकार आपण केला पाहिजे, असें त्यांनीं म्हटलें आहे. बाहेरचीं माणसें हिंदुस्थानला पाहाण्यास आपल्या देशांत आलीं असतांना त्यांच्याच फॅशन्स्, त्यांचें फर्निचर, पोषाख, खाद्यपेयें आणि विशेष म्हणजे ज्या वस्तू ग्राम्य (व्हलगर) समजून त्यांनीं टाकून दिलेल्या असतात त्यांचाच संभार त्यांच्यापुढें मांडणें, त्यांत त्या अतिथींचा तर अपमान आहेच पण स्वमानहानि आहे, असें कुमारस्वामी म्हणतात.

## राष्ट्रीय शिक्षण

राष्ट्रीय शिक्षणाच्या बाबतींत त्यांनीं दर्शविलेले विचार असेच मूलगामी आहेत; व त्यांनीं त्यांचें केलेलें प्रतिपादनहि मोठें जोरदार व निरुत्तर करणारें आहे. "इंग्रजांनीं हिन्दुस्थानांत एक व्यापक शिक्षणाचें तंत्र उभारून हिन्दवासियांवर मोठा उपकार केला आहे. त्यांना स्वातंत्र्य, संस्कृति इत्यादींचे विचार व कल्पना देऊन त्यांना स्वराज्यासाठीं पात्र बनविलें आहे," इत्यादि प्रकारचीं इंग्रजी शिक्षणाचीं स्तुतिस्तोत्रें आपण पुष्कळ ऐकलीं आहेत—अजून देखील कधीं कधीं ऐकतों. कुमारस्वामींचा सर्वांत जास्त तीव्र विरोध या शिक्षणाविषयींच होता. मेकॉलेप्रणीत शिक्षणाचे ते कट्टे शत्रू होते व शेवटपर्यंत तसेच राहिले होते. (पहा 'ध कर्स ऑफ फॉरिन रूल'—'परराज्याचें अरिष्ट') सर जॉर्ज बर्डवुड यांचें एक अवतरण[1] देऊन ते म्हणतः "या शिक्षणप्रणालीनें हिन्दी संस्कृतीच्या मुळावरच घाव घातला आहे; स्वतःच्या पैतृक संपत्तीचें आकलन करण्याची शक्तिच आपल्यांत राहूं दिली नाहीं; आपल्या प्राचीन वारशापासून आपल्याला वंचित केलें आहे; त्याच्याविषयीं आपल्या मनांत अनादर उत्पन्न केला आहे. तो येथपर्यंत कीं, आपलें जुनें तेवढें सर्व बुरसलेलें, अर्थहीन; व इंग्रजांनीं आपल्याला शिक्षणाची देणगी दिली आहे ती दिव्य आहे, असें आपल्यापैकीं पुष्कळांना वाटूं लागलें व त्या शिक्षणालाच चिकटून राहण्याचा ते प्रयत्न करूं लागले. व अजून देखील या मोहांतून आपली सुटका होत नाहीं. गम्मत म्हणजे अशी कीं आज जेव्हां या शिक्षणाच्या विधायकांचे वारस (इंग्रज लोक) स्वतः आपणच या शिक्षणाचें हिंदुस्थानांतील कार्य पाहून

१ "या शिक्षणानें हिंदी लोकांच्या स्वतःच्या साहित्याविषयींच्या आवडींचा नाश केला आहे; स्वतःच्या कलांमधून जो आनंद त्यांना लुटतां येत असे, त्याचा नाश केला आहे, आणि सर्वांत वाईट गोष्ट म्हणजे त्यांच्या पूर्वापार चालत आलेल्या धर्माविषयीं त्यांच्या मनांत जी आस्था होती व त्यांतून जी शांति व समाधान त्यांना लाभत, त्याचा नाश केला आहे. स्वतःच्या घराबद्दल म्हणजे कुटुम्बाबद्दल--आपल्या आईबापांविषयीं, बहिणींविषयीं, व स्वतःच्या पत्नीविषयीं देखील--त्यांच्या मनांत नावड व तिटकारा उत्पन्न केला आहे. प्रत्येक कुटुम्बांत त्यानें असंतोष निर्माण केला आहे."








असें म्हणूं लागले होते कीं, 'तुम्ही शिक्षणाच्या नांवाखालीं जें थोतांड हिंदुस्थानांत माजवलें आहे, त्याच्या परिणामाचें श्रेय (!) आम्हांला देतां तें शिक्षण आम्हीं तर केव्हांच टाकून दिलें आहे. हें तर आमच्या शिक्षणपद्धतीचें तुम्हीं एक कॅरिकेचर (हास्यचित्र) विडंबन सुरू केलें आहे. लंडन युनिवार्सिटीची स्थापना (१८३५ ?) झाली, त्या वेळच्या शिक्षणविषयक विचारांना तुम्हीं अजून बिलगून बसलां आहांत ही मोठ्या खेदाची गोष्ट आहे. तरी हल्लींच्या या सर्व कुपरिणामांचें खापर कृपा करून आमच्या डोक्यावर फोडूं नका'."

हिंदुस्थानांत आम्ही साक्षरतेचा प्रसार केला असा दावा इंग्रज लोक सांगतात. याला कुमारस्वामींचें अगदीं अलीकडील उत्तर ('परराज्याचें अरिष्ट' हा लेख पहा) आहे कीं स्वतःची भाषा चांगली बोलतां येणें व तींत निर्माण झालेलें श्रेष्ठ कोटीचें साहित्य समजणें ही गोष्ट महत्वाची आहे; तें वाचतां येतें किंवा नाहीं ही गोष्ट गौण आहे. (येथेंहि असें म्हणणें भाग आहे कीं, आवश्यक प्राथमिक शिक्षणाचें ना. गोखल्यांचें बिल फेटाळून लावून आपल्या इंग्रज राज्यकर्त्यांनीं साक्षरताप्रसाराचें कार्यहि केलें नाहीं.) प्लेटोचा उल्लेख करून कुमारस्वामी म्हणतात, 'साक्षरता ही एक आळशी माणसाला आपल्या स्मृतीला तकलीफ द्यावी लागूं नये म्हणून योजण्यांत आलेली केवळ एक युक्ति किंवा हिकमत आहे.' म्हणून लोकांना जर खरें शिक्षण द्यावयाचें असेल, तर साक्षरता वगैरेंच्या अवडंबराच्या भानगडींत न पडतां, पॅट्रिक गेडीस म्हणतो त्याप्रमाणें त्यांच्या राष्ट्रीय संस्कृतीच्या वाहनाच्या (माध्यमाच्या) द्वारांच त्यांच्या बुद्धीचा विकास घडवून आणला पाहिजे. आणि त्यासाठीं 'आपल्या रामायण व महाभारतासारख्या महान् ग्रंथांच्या पायावर खऱ्या शिक्षणाची मांडणी झाली पाहिजे' असें कुमारस्वामी भर देऊन सांगतात. सिंहलमधील शिक्षणाविषयीं बोलतांना त्यांनीं असें म्हटलें आहे कीं, "येथें सिंहली व तामिळ भाषा व भारतीय संस्कृति हे अध्ययनाचे मूलभूत व आवश्यक विषय म्हणून ठेवले पाहिजेत."

राष्ट्रीय शिक्षणाची चर्चा करतांना त्यांनीं येथपर्यंत म्हटलें आहे कीं, "तुमच्या मुलांना खरें राष्ट्रीय शिक्षण द्यावयाचें असेल तर चालूं सांचाच्या नवीन संस्था स्थापन करून व त्यांना सरकारची व युनिव्हर्सिटीची मान्यता मिळवून भागणार नाहीं. असा प्रयत्न करणें व्यर्थ आहे. त्यासाठीं खरा मार्ग म्हणजे सरकारच्या व पाद्री लोकांच्या शिक्षणसंस्थांवर सर्वशः बहिष्कार टाकून आपल्या पद्धतीनें शिकवण्याची सुरुवात करणें हा होय."

स्त्रीशिक्षणाच्या बाबतींत त्यांनीं कधीं उत्साह दाखवला नाहीं. उलट कांहीं अंशीं विरोधच केला आहे. याचें कारण तें असें सांगत कीं, "पोटाची खळगी भरण्यासाठीं कांहीं तरी व्यवसाय करतां यावा म्हणून पुरुष वाटेल तसें शिक्षण घ्यावयास तयार होत असतील तर खुशाल होवोत. परंतु आपल्या स्त्रियांना जीवनकलहाच्या आखाड्यांत उतरण्याची जरूर नसते. त्याच एक प्रकारें आपल्या संस्कृतीचें संरक्षण करीत आल्या आहेत. त्यांना जर तुम्हीं इंग्रजी शिक्षणांत टाकलें तर आपल्या संस्कृतीचा विनाशच होईल." लोकमान्य टिळक स्त्रीशिक्षणाचा विरोध कां करीत त्याचें रहस्य यावरून चांगलें कळून येईल.

स्वदेशी व राष्ट्रीय शिक्षणविषयक त्यांचे विचार ऐकून 'तुम्ही तर अस्सल हिन्दी इसमापेक्षां देखील जास्त कट्टर हिन्दी आहांत' असें लोक त्यांना म्हणत.

## कलेची सेवा

राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्याच्या काळांत स्वदेशी व राष्ट्रीय शिक्षण वगैरेंच्या महत्त्वाचा स्वीकार—आचारांत नाहीं, तर विचारांत तरी—होण्यास तितकीशी अडचण नव्हती. उलट या दोन्हीं गोष्टी त्या लढ्याच्या अंगभूत झाल्या होत्या. परंतु कलेचा या सगळ्यांशीं काय संबंध अशी भावना सार्वत्रिक होती. त्यांतून हिंदुस्थानच्या इतिहासाच्या परदेशी संशोधकांनीं व लेखकांनीं हिंदुस्थानापाशीं स्वतःची कला, स्वतःचीं महाकाव्यें वगैरे कांहीं नाहीं, जें कांहीं आहे तें सगळें ग्रीस किंवा इतर कोणत्या तरी देशाच्या संसर्गापासून मिळालेलें आहे, असें हिन्दी








लोकांच्या मनावर ठसविलें होतें. बुद्धाची मूर्ति ग्रीसमधून आयात झाली आहे, बदामीच्या अनंत-शायी विष्णूच्या मूर्तीचें श्रेय उत्तर युरोपच्या एखाद्या देशास दिलें पाहिजे, रामायण होमरच्या काव्यावरून सूचित झालेलें आहे, असें निःसंकोचपणें सांगण्यांत येई. आणि म्हणून कलेच्या शिक्षणासाठीं इंग्रजांनीं जेव्हां मुंबई, कलकत्ता, वगैरे ठिकाणीं कलामंदिरें (स्कूल्स् ऑफ आर्ट) स्थापन केलीं, तेव्हां त्यांतून पाश्चात्य कलेचे अध्यापक नेमून त्या कलेचे पाठ देण्यास सुरुवात केली. परंतु एकोणिसाव्या शतकाचा शेवटचा भाग व विसाव्याचा आरंभकाळ हा भारताच्या उत्थानाचा व वैचारिक मंथनाचा महत्त्वाचा काळ होता. इतर क्षेत्रांप्रमाणें कलेंतहि भारतीय दृष्टि स्थिरपणें दाखल होत होती. हॅवेल, निवेदिता, अवनीन्द्रनाथ ठाकूर व त्यांचें शिष्यमंडळ आणि कुमारस्वामी या सर्वांनीं भारतीय कलेचा गौरव प्रस्थापित करण्याचें कार्य हातीं घेतलें. शिल्प, स्थापत्य, चित्र, संगीत इत्यादि विविध अंगांनीं युक्त अशी भारताची स्वतःची कला आहे, जगाला तोंडांत बोटें घालावयास लावतील असे तिचे उत्कृष्ट नमुने आजदेखील देशांत विद्यमान आहेत, आणि या कलेच्या मुळाशीं जीं तत्त्वें आहेत तीं इतकीं चिरस्थायी व मौलिक आहेत, तिचा पाया इतका भरीव आहे, कीं त्यांत वारंवार फेरबदल करण्याची जरूरच पडत नाहीं. येथें जीवन, विचार व कला या तिघांमध्यें एकरूपता आहे. भारतीय तत्त्वज्ञान हाच भारतीय कलेचा भरभक्कम व शाश्वत असा पाया आहे, असें कुमारस्वामींनीं आपल्या लिखाणांत दाखवून दिलें आहे. (त्यांच्या कलेविषयीं विचारांचें किंवा त्यांनीं केलेल्या भारतीय कलेच्या मीमांसेचें निरूपण करण्यासाठीं अधिकारी पुरुषानें एक स्वतंत्र लेख काय, लेखमालाच लिहावयास हवी.) (भारतीय कलेच्या विविध प्रकारांचें उगमस्थान योग-दर्शन हें आहे, असें हॅवेलनें म्हटलें आहे, व मागाहून त्यानें नगाधिराज देवतात्मा हिमालयाला त्याच्या जोडीस बसविलें, हें येथें सहज आठवतें.) त्यासाठीं त्यांनीं वेद व आगमापासून थेट रवीन्द्रनाथ ठाकुरांच्या साहित्यापर्यंतचे वैदिक, बौद्ध (पाली व संस्कृत) जैन, शैव, वैष्णव इत्यादि धर्मग्रंथ, शिल्पशास्त्रावरील ग्रंथ, नीतिसार, नाट्यशास्त्र, त्याचप्रमाणें साहित्यशास्त्रविषयक ग्रंथांचें गंभीर अवगाहन केलें, व त्यांतून एक एक शब्द वेंचून भारतीय कलेचें निरूपण केलें. याचें प्रत्यंतर पाहावयाचें असल्यास वाचकानें इ. स. १९२४ मध्यें त्यांनीं बोस्टन येथून प्रसिद्ध केलेली 'बिब्लिओग्राफी ऑफ इंडियन आर्ट' (भारतीय कलाविषयक सूचि) पाहावी. या सूचींत त्यांनीं ज्या सांस्कृतिक वातावरणांत भारतीय कलेचा उगम व परिपोष झाला, त्या वातावरणाचें प्रतिबिंब ज्यांत पडलें आहे अशा तत्त्वज्ञानविषयक, धार्मिक, साहित्यविषयक ग्रंथांची सामान्य यादी प्रथम देऊन नंतर शिल्प, चित्र, वस्त्र व इतर गौण कलाविषयींच्या साहित्याची माहिती दिली आहे. या सूचींत पुस्तकांचीं केवळ नांवेंच दिलीं आहेत. तिला सर्वांगपरिपूर्ण व अद्यतन करून प्रत्येक ग्रंथाविषयीं टीप देण्याचा कुमारस्वामींचा मानस होता, परंतु तशी संपूर्ण सूचि प्रसिद्ध झाल्याचें पाहाण्यांत किंवा ऐकिवांत नाहीं. उपर्युक्त सूचींत सात-आठशें लहानमोठ्या पुस्तकांचा उल्लेख आहे.

भारतीय कलेच्या निरूपणाचा आरंभ त्यांनीं 'धि एम् ऑफ इंडियन आर्ट' (भारतीय कलेचें उद्दिष्ट), 'धि आर्ट ऑफ धि ईस्ट ॲण्ड ऑफ ध वेस्ट' (पूर्वेकडील कला व पश्चिमेकडील कला), 'इन्फ्ल्यूएन्स् ऑफ ग्रीक ऑन इंडियन आर्ट' (ग्रीक कलेचा भारतीय कलेवर परिणाम), 'आर्ट ॲण्ड स्वदेशी' (कला व स्वदेशी) इत्यादि लहान लहान निबंध व पुस्तकें लिहून केला. यांपैकीं 'ग्रीक कलेचा भारतीय कलेवर परिणाम' हा निबंध त्यांनीं १९०८ सालीं कोपनहेगन येथें भरलेल्या पौर्वात्य-विद्याविशारदांच्या आन्तरराष्ट्रीय परिषदेंत वाचला होता, आणि ग्रीसच्या परिणामाच्या बाबतींत पंडितांत ज्या समजुती रूढ झालेल्या होत्या, त्यांचें खंडन केलें होतें. 'हिन्दुस्थानांतील कलामंदिरांपुढें (स्कूल्स ऑफ आर्टपुढें) कोणतें कार्य आहे?' या लेखांत, त्या मंदिरांनीं भारतीय कलेच्या खंडित झालेल्या परंपरेचीं (ट्रॅडिशनचीं) सूत्रें एकत्र आणून तींत नवीन प्राणप्रतिष्ठा करणें हें त्यांच्या पुढील








खरें काम आहे असें कुमारस्वामींनीं म्हटलें आहे. आणि त्या परंपरागत कलेचें खरें व वैविध्यमंडित स्वरूप मांडण्यासाठीं त्यांनीं विपुल लिखाण केलें. भारतीय कलाकृतींचें प्रत्यक्ष दर्शन घेण्यासाठीं त्यांनीं हिंदुस्थानच्या एका टोंकापासून दुसऱ्याटोंकापर्यंत प्रवास केले व कित्येक उत्कृष्ट कलाकृतींचा संग्रह देखील केला.

याच सुमारास म्हणजे १९१० मध्यें त्यांनीं इंग्लंडांत भारतीय कलेचा अभ्यास व प्रसार करण्याच्या उद्देशानें हॅवेल, लेडी हेरिंगहॅम, लॉरेन्स बिन्यन, विलियम राथेन्स्टीन वगैरेंच्या बरोबर 'इंडिया सोसायटी'च्या स्थापनेंत भाग घेतला. याच वर्षीच्या अखेरीस राष्ट्रीय महासभेच्या अधिवेशनाच्या दिवसांतच संयुक्त प्रांतांच्या गव्हर्नरानें अलाहाबादेस एक जंगी प्रदर्शन भरवण्याचें ठरवलें. व त्यांतील कलाविभागाच्या सजावटीचें काम कुमारस्वामी यांचेवर सोंपविण्यांत आलें. सदरहू प्रदर्शनासंबंधीं त्यावेळच्या वर्तमानपत्रांतून येथें व विलायतेंतहि अनुकूल प्रतिकूल टीका पुष्कळ झाली. राजकारणाचा प्रश्नहि छेडण्यांत आला. परंतु कुमारस्वामींच्या विभागाच्या सफलतेविषयीं कोणी बदसूर काढला नाहीं. हें प्रदर्शन सफल करण्यासाठीं कुमारस्वामींनीं पुष्कळ श्रम घेतले. त्यासाठीं त्यांनीं ओरिसाचा मुद्दाम प्रवास केला. 'ट्रेडिशन्स् इन् इण्डिया' या विषयावर चढाओढीचा निबंध मागवून त्यासाठीं स्वतः २५० रुपयांचें बक्षीस जाहीर केलें.

याच सुमारास इंग्लंडमधील हॅरप ॲन्ड कंपनीनें स्वतः योजलेल्या वेगवेगळ्या लोकांच्या 'मीथ्स अँड लेजन्ड्ज्'च्या सुंदर मालेंत हिंदुस्थानच्या पौराणिक कथा व आख्यानांविषयीं एक ग्रंथ लिहविण्याचें ठरवून तें काम भगिनी निवेदिता यांस सोंपवलें. निवेदितांनीं या ग्रंथाचा आराखडा तयार करून प्रस्तावनेचें प्रकरण व इतर कांहीं भाग लिहिला व अशांतच त्या मरण पावल्या. तेव्हां तें काम पुरें करून देण्यास कुमारस्वामींस विनंति करण्यांत आली.

त्यांनीं हें काम इतक्या सुंदर रीतीनें पार पाडलें कीं श्री. अर्धेन्द्रकुमार गांगूलीसारख्या विद्वान् व कलारसिक परीक्षकानें त्याचा ('द मीथ्स ॲन्ड लेजंड्ज् ऑफ द हिंदूज् ॲन्ड द बुधिस्ट्स्') 'वर्षांतील सर्वोत्तम ग्रंथ' म्हणून गौरव केला व असा अभिप्राय दिला कीं, 'या क्षेत्रांत आतांपर्यंत जे कांहीं थोडे फार ग्रंथ लिहिले गेले आहेत, त्या सर्वांना या ग्रंथानें मागें टाकलें आहे''. या ग्रंथाचा जवळ जवळ दोन तृतीयांश भाग कुमारस्वामी यांनीं लिहिलेला आहे. हिंदुस्थानच्या संस्कृतीचें हार्द समजण्यास हा ग्रंथ एक उत्तम साधन आहे.

इ. स. १९१२-१३ च्या एका सत्रांत लंडन युनिव्हर्सिटीनें 'भारतीय कला' या विषयावर चार व्याख्यानांची एक माला योजून ती गुंफण्यास त्याच युनिव्हर्सिटीचे फेलो डॉ. कुमारस्वामी यांस आमंत्रण दिलें. हीं व्याख्यानेंच नंतर 'आर्ट्स ॲन्ड क्रॅफ्ट्स्' मालेंत 'धि आर्ट्स् ॲण्ड क्रॅफ्ट्स् ऑफ् इंडिया ॲण्ड सिलोन,'' या नांवानें प्रसिद्ध झालीं. यांत भारतीय कलेच्या समग्र क्षेत्राची ओळख करून देण्यांत आली आहे. हें पुस्तक पुरातत्त्वसंशोधक पंडितांच्यासाठीं नसून सामान्य जनतेसाठीं आहे, असा खुलासा कुमारस्वामींनीं केला आहे. [ व मूळ हीं व्याख्यानें लंडन युनिव्हर्सिटीतर्फे योजलेल्या विद्याविस्तार–मालेंतच (एक्स्टेन्शन लेक्चर्स म्हणून) देण्यांत आलीं होतीं. ] २५० पृष्ठें मजकूर व २२५ चित्रांनीं अलंकृत असें हें पुस्तक सामान्य माणसाच्या खिशाला देखील परवडण्यासारखें आहे. परंतु खेदाची गोष्ट म्हणजे कुमारस्वामींच्या इतर अनेक ग्रंथांप्रमाणें हें पुस्तक देखील आज उपलब्ध नाहीं. 'आर्ट्स् ॲण्ड क्रॅफ्ट्स्' मालेंतील पुस्तकांत याची सर्वोत्तम पुस्तक म्हणून गणना झाली आहे. कुमारस्वामींच्या व्याख्यानांची लंडन युनिव्हर्सिटीकडून जाहिरात झाल्यानंतर आपल्या इकडील एका युनिव्हर्सिटीला (पंजाबच्या) भारतीय कलेवर व्याख्यानें देवविण्याचें सुचलें व तिनें समरेन्द्रनाथ गुप्त यांजकडून सहा व्याख्यानें देवविलीं.

भारतीय कलाकृतींची चित्रांच्या द्वारां थोडीतरी प्रत्यक्ष ओळख व्हावी म्हणून कुमारस्वामी यांनीं वेळोवेळीं अशा निवडक कलाकृतींचे संपुट (आल्बम्स) प्रसिद्ध केले व त्यांतून त्या कलाकृतींविषयीं








माहिती व विवेचन हि करून भारतीय कलेच्या रहस्याचें उद्‌घाटन व निरूपण केलें आहे. अशा चित्रसंपुटांत 'विश्वकर्मा' ( भाग १ ते ८ ); 'रजपूत पेंटिंग' ( रजपूत चित्रकला, भाग १—२ ), 'इंडियन ड्राइंग्ज' ( हिंदी आलेखनें, भाग १—२ ); 'पोर्टफोलिओ ऑफ इंडियन आर्ट्' ( भारतीय कलेचा संपुट ), बोस्टन संग्रहस्थानांतील हिंदी कलाकृतींच्या सूची (त्यांत शिल्प, रजपूत चित्रकला, जैन चित्रकला व मोगल चित्रकला या प्रत्येकावर एक एक वेगळा खंड आहे), हे मुख्य होत. या सर्व संपुटांचें सविस्तर वर्णन करणें स्थलाभावी येथें शक्य नाहीं. कांहींचीं थोडीशीं वैशिष्टयेंच फक्त पाहूं. 'विश्वकर्मा' या संग्रहांत शंभरावर चित्रें असून इंग्लंडमधील विख्यात शिल्पी व कलाधर एरिक जिल यानें त्याचा उपोद्‌घात लिहिला आहे. त्यांत 'कलाकार हा वस्तूंचा निर्माता आहे, वस्तूंच्या चित्राचा नव्हे' हें भारतीय कलेस साविशेषपणें लागूं पडणारें सत्य सर्वच कलेचें महत्त्वाचें लक्षण होय असें त्यानें प्रतिपादन केलें आहे.

## रजपुत चित्रकला

रजपुत चित्रकलेला पाश्चात्य पंडित वेगळी प्रतिष्ठा देण्यास तयार नसत. ते मोगल किंवा इंडो—पर्शियन कलेच्या नांवानेंच तिला ओळखीत. कुमारस्वामींनीं पंजाब, काश्मीर, जम्मू, राजपुताना वगैरे प्रदेशांतून हिंडून रजपूत चित्रकलेचा एक समृद्ध संग्रह गोळा केला व त्याच्यावर विस्तृत विवेचन लिहून असें सिद्ध केलें कीं, रजपूत कला ही प्राचीन भारतीय परंपरेंतूनच निघालेली आहे व शुद्ध भारतीय कलाच आहे. व तिचे विषय वैष्णव, शैव व शीख धर्मासंबंधींच आहेत. इतकेंच नव्हे तर रजपूत चित्रकलेंतील राधाकृष्णांच्या चित्रांचा लक्षपूर्वक अभ्यास केल्याशिवाय भागवत संप्रदायाचा अभ्यास पुरा झाला असें म्हणतां येणार नाहीं; इतकें त्या धर्माच्या दृष्टीनें या कलेचें महत्त्व आहे. मोगल चित्रकलेचा रजपुत कलेवर जर कांहीं प्रभाव पडला असेल तर तो फारच गौण आहे; उलट, नांवाजलेल्या मोगल कलाकारांपैकीं दोनतृतीयांशापेक्षां देखील जास्त कलाकार हिंदूच होते असें त्यांच्या नांवांवरून दिसतें, असें कुमारस्वामी म्हणतात.

'पोर्टफोलियो ऑफ् इंडियन आर्ट्' मध्यें त्यांनीं बोस्टन संग्रहालयांतील भारतीय कलेच्या १०८ निवडक कृती दिल्या आहेत. प्रत्येक कृतीविषयीं वर्णनात्मक टीप दिली आहे. या संग्रहाच्या बाबतींत आपल्या देशाच्या दृष्टीनें एक दुःखद गोष्ट येथें सांगितल्याशिवाय राहवत नाहीं. १९१० सालीं अलाहबादेस प्रदर्शन भरलें त्यावेळीं व त्यापूर्वी कुमारस्वामींनीं हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं हिंडून भारतीय कलाकृतींचा एक सुंदर संग्रह गोळा केला होता. हा संग्रह काशीसारख्या एखाद्या मध्यवर्ती जागीं सुरक्षितपणें ठेवण्याची व्यवस्था करून त्यांतून पुढें भारतीय राष्ट्रीयकलाभवनाचा विकास करण्याचा प्रबंध केल्यास हा सर्व संग्रह आपण विनामूल्य राष्ट्रास अर्पण करण्यास व सदरहु कलाभवनाचे रक्षक ( क्यूरेटर ) म्हणून निर्वेतन काम करण्यास आपण तयार आहोंत अशा अर्थाची विनंति कुमारस्वामींनीं देशांतील पुढाऱ्यांस केली. परंतु त्यावेळीं देशाच्या प्रथम कोटीच्या पुढाऱ्यांपैकीं कित्येक तुरुंगांत पडले होते किंवा निर्वासित झाले होते म्हणून म्हणा, राजकारणी चळवळीच्या वेळीं अशा प्रकारच्या स्थायी जबाबदारीचें काम कसें अंगावर घ्यावें असें वाटून म्हणा किंवा अर्धेन्द्रकुमार गांगूली म्हणतात त्याप्रमाणें, त्यावेळीं जे देशाचे पुढारी बाहेर होते त्यांना असल्या कामाचें महत्त्व न पटल्यामुळें म्हणा, कुमारस्वामींच्या हांकेस ओ देण्यास कोणी पुढें सरसावलें नाहीं आणि अमेरिकेंतील डॉ. रॉस यांच्या देणगीच्या बळावर तो सर्व संग्रह बोस्टनच्या ललित कलेच्या संग्रहस्थानानें विकत घेतला आणि पुढें १९१७ सालीं कुमारस्वामी स्वतः हिंदुस्थान सोडून त्या संग्रहस्थानांत हिन्दी, इराणी व मुस्लिम कलेचे संशोधक म्हणून नेमले गेल्यावर अमेरिकेस गेले. तेव्हांपासून गेल्या सप्टेंबरमध्यें ते वारले तोंपर्यंत त्यांचें जीवन बोस्टनमध्येंच व्यतीत झालें. अर्थात् या काळांत ते पूर्वेकडील कलाधामांची यात्रा करण्यासाठीं दोनदां हिंदुस्थानांत येऊन गेले. आज भारतीय कलाकृतींचा चांगल्यांत चांगला व जास्तींत जास्त समृद्ध संग्रह जर कोठें एका ठिकाणीं








असेल तर तो बोस्टनच्या संग्रहस्थानांतच आहे असें सांगतात.

बोस्टन संग्रहालयांतील भारतीय कलेच्या संग्रहांचा जो कॅटलॉग ( सूचि ) कुमारस्वामींनीं प्रसिद्ध केला, त्याच्या पहिल्या खंडांत त्यांनीं भारतांतील ईश्वरविषयक कल्पनेचा विकास वर्णून नंतर वेगवेगळ्या धार्मिक संप्रदायांचा तात्त्विक इतिहास दिला आहे आणि कालानुक्रम दर्शविणारी एक सालवार यादी दिली आहे. याखेरीज भारतीय कलाविषयक साहित्याची सूचि जोडली आहे.

परंतु त्यांच्या कलाविषयक ग्रंथांत त्यांचा सर्वश्रेष्ठ ग्रंथ म्हटला म्हणजे ' हिस्टरी ऑफ् इंडियन ॲण्ड इंडोनेशियन आर्ट ' ( हिन्दी व इंडोनेशियन कलेचा इतिहास ) हाच होय. या इतिहासाचें काम यथोचितपणें पार पाडण्यासाठीं कुमारस्वामींनीं जगांत जेथें जेथें हिन्दी कलाविषयक संग्रह आहे अशा अमेरिका, युरोप व एशियामधील तमाम संग्रहांची मुलाखत घेतली, प्रत्यक्ष कलाक्षेत्रांच्या—कांहींच्या तर अनेक वेळा—यात्रा केल्या, आणि मोहन–जो–दडो व वेदांच्या काळापासून थेट १८ व्या शतकांतील भारतीय व बृहत्तर–भारतीय कलेचा इतिहास लिहिला. हा ग्रंथ जवळ जवळ ४०० चित्रें व ९ नकाशांनीं मंडित केलेला आहे आणि " अगणित पैलू व प्रकार असलेल्या अशा एका विशाल विषयाची फार बारकाईनें व चौकसपणें अद्भुत मांडणी यांत केली आहे. आतां हें खरें कीं, विषयाच्या विस्ताराच्या मानानें ती पाहिजे त्यापेक्षां जास्त संक्षिप्त आहे. "

तथापि भारतीय कलेविषयीं लोकभोग्य छोटेसें पुस्तक हवें असेल तर आपण त्यांचे ' इंट्रोडक्शन टु इंडियन आर्ट ' (भारतीय कलेची तोंडओळख) हें पुस्तक अवश्य वाचावें. इ. स. पूर्वी ७ व्या शतकापासून थेट रजपुत चित्रकलेपर्यंतच्या कलेच्या विकासाचा वृत्तान्त एका अखंड परंपरेच्या विकासाच्या स्वरुपांत त्यांत दिलेला आहे. आणि या कलेच्या गाभ्यांत भक्तीचा रस प्रधान आहे असें सांगण्यांत आलें आहे. आणि याच कारणानें गेल्या ऑगस्ट महिन्यांत श्री. एस्. चंद्रशेखर यांनीं त्यांची बोस्टन मुक्कामीं मुलाखत घेतली त्यावेळीं कलेच्या हेतूविषयीं विचारलेल्या " कलाकृती काय संक्रांत करूं शकतात ? " या प्रश्नाच्या उत्तरादाखल कुमारस्वामी कांहींशा कटु स्वरानें असें म्हणाले होते कीं, " एक दुःखद सत्य आपण एकदम सांगून टाकूं या कीं, बहुतेक कलाकृती ईश्वराला अनुलक्षून आहेत, आणि आजकाल त्याचें तर नांव देखील शिष्टसमाजांत कोणी घेत नाहीं. " जगांतील जवळ जवळ सर्वच श्रेष्ठ कला देव आणि धर्माविषयीं आहे, असें त्यांनीं एशिया, युरोप वगैरेकडील कलांचें सूक्ष्म अवलोकन व अध्ययन करुन दाखवून दिलें आहे.

## हिन्दु व बौद्ध धर्म

धर्माच्या बाबतींत कुमारस्वामी एक प्रकारें 'सनातनी'च होते असें म्हटलें पाहिजे. एरिक जिलनें त्यांचें, तत्त्वज्ञ व धर्मशास्त्रज्ञ म्हणूनच, वर्णन केलें आहे. त्यांच्या 'मीथ्स् ॲन्ड लेजन्ड्स् ऑफ ध हिन्दूज ॲण्ड ध बुधिस्ट्स ' या पुस्तकाविषयीं आपण पूर्वी बोललोंच आहोंत. त्यानंतरच्या पुस्तकांपैकीं १९१६ मध्यें प्रसिद्ध झालेल्या 'बुद्ध ॲन्ड ध गॉस्पेल ऑफ् बुधिझम' ( बुद्ध व त्याचा उपदेश ) व सन १९४३ मध्यें प्रसिद्ध झालेल्या ' हिन्दुइझम ॲन्ड बुधिझम' ( हिन्दु धर्म आणि बौद्ध धर्म ) या दोन पुस्तकांचाच येथें विचार करूं. पहिल्या पुस्तकाचें प्रयोजन सांगतांना, बुद्धानें उपदेशिलेल्या धर्माची एका बाजूनें ब्राह्मण धर्माशीं व दुसऱ्या बाजूनें खिस्ती धर्माशीं( विशेषत: त्यांतील अध्यात्मवादाशीं) तुलना करुन त्याच्या द्वारा जीवनाच्या तत्त्वज्ञानांत निश्चित भर टाकण्याचा हेतु या ग्रंथाच्या मुळाशीं आहे. केवळ बौद्ध धर्माविषयीं माहिती देणाऱ्या अनेक ग्रंथांत एका आणखी ग्रंथाची भरती करण्याचा इरादा नाहीं, असें कुमारस्वामी म्हणतात. व पुढें असें सांगतात ' बुद्धानें मानवजीवनाचें एक निश्चित ध्येय ठरवलें आणि त्याच्या विषयीं स्पष्ट विधानें केलीं आहेत. त्याचीं विधानें खोटीं असतील व त्याचें ध्येय जर निरर्थक असेल तर त्या विधानांचें खंडन करणें व त्या ध्येयावरील लोकांचा विश्वास उडवून देणें हें काम फार अगत्याचें होऊन बसतें. परंतु बुद्धानें केलेली मानवजीवनाची चिकित्सा बरोबर असेल आणि त्यानें आपल्यापुढें ठेवलेलें ध्येय शुभ असेल तर त्याचा सार्वत्रिक स्वीकार










अनुक्रमणिका

करणें हेंहि तितकेंच अगत्याचें होतें.' असें म्हणून विग्रहानें पीडित जगापुढें बुद्धाच्या उपदेशांतील दोन विचाररत्नें ते उदाहरणार्थ ठेवतातः "विजय वैर उत्पन्न करतो, कारण पराभव पावलेले दुःखी असतात—जयो वैरं विसृजति दुःखमास्ते पराजितः" आणि रुरुजातकांत बोधिसत्त्वानें विचारलेला प्रश्न, "ज्यानें पापकर्म केलें आहे त्याच्याशीं आपण होऊन कठोरपणें कोण बोलेल? असें करणें म्हणजे त्याच्या अपराधाच्या जखमेवर मीठ चोळल्यासारखेंच होईल ना?" आणि असा प्रश्न कुमारस्वामी विचारतात, "बौद्ध व हिंदुधर्मानें—कारण बुद्धाच्या धर्माची उत्पत्ति हिंदुधर्मातूनच झाली आणि त्यांतच तो विलीन झाला—अशा प्रकारच्या देणग्या मानवजातीला दिल्या आहेत. अशा धर्मांचा फारच गंभीरपणें व समभावपूर्वक विचार करणें हें आपलें कर्तव्य नाहीं काय?"

'हिंदुधर्म आणि बौद्ध धर्म' या पुस्तकांत ते या दोन धर्मांचें ऐक्य आणखी जास्त भर देऊन दाखवतात. हिंदु धर्मांत कर्म, माया, इत्यादींविषयीं ज्या अनेक चुकीच्या समजुती शिरल्या आहेत त्यांचें निरसन करून हिंदुधर्माची शुद्ध स्वरूपांत मांडणी पहिल्या विभागांत केली आहे.

बौद्ध धर्माविषयीं प्रतिपादन करतांना ते असें म्हणतात कीं, बौद्ध धर्माच्या वरकांती अभ्यासामुळें तो ब्राह्मणधर्माहून भिन्न वाटतो; परंतु जसजसा खोल अभ्यास करावा तसतसें असें वाटूं लागतें कीं, या दोन धर्मांना एकमेकांहून वेगळें मानावें तरी कसें! कोणकोणत्या बाबतींत बौद्धधर्म हिंदुधर्मासारखाच चुस्त सनातनी नव्हता हें सांगणें अशक्य होतें. उपनिषदें व त्यांचाच समकालीन बौद्धधर्म हे एकमेकांचे विरोधी नव्हते, तर ते दोघे एका समाजशत्रूचे (कर्मकांड इत्यादींचे) विरोधी होते असें ते म्हणतात.

अलीकडे कित्येक वर्षांपासून कुमारस्वामी वेदाच्या संशोधनांत व त्याचा अर्थ लावण्यांत पडले होते व त्याचें प्राथमिक फळ म्हणून 'ऋग्वेद—ए लॅन्डनामा बुक,'.' ए न्यू ॲप्रोच टू द वेदाज' व आणखी कांहीं पुस्तिका त्यांनीं आपल्याला दिल्या आहेत. आपल्या प्राचीन साहित्य व भाषाशास्त्राखेरीज प्राचीन काळच्या इतर देशांतील धार्मिक साहित्याचा व कल्पनांचा उपयोग केल्यास आपण वेदाच्या अर्थाच्या जास्त नजीक जाऊं असें त्यांचें म्हणणें आहे.

भारतीय समाजशास्त्र व राज्यमीमांसा यांवर देखील कुमारस्वामींनीं निबंध लिहिले आहेत, आणि त्या सर्वांची रचना धर्माच्या पायावरच केलेली आहे असें दाखविलें आहे.

पाश्चिमात्य प्रजा एशियांतील देशांवर आपल्या वाटवण्याच्या प्रवृत्तीच्या आवेशांत (प्रॉसेलिटाइझिंग फ्यूरी) मोठा जुलूम करीत आहे असें त्यांना वाटे. स्वतःचा धर्मच नव्हे, तर स्वतःचें शिक्षण व स्वतःचीं संस्कृतिदेखील त्या देशांवर लादण्याचा सतत प्रयत्न करून त्या लोकांचा संहारच त्यांनीं मांडला आहे, असा त्यांचा निश्चित अभिप्राय बनला होता. 'ॲम् आय् माय् ब्रदर्स कीपर?' (मी माझ्या भावाचा राखणदार आहे काय?) या पुस्तकांत या संबंधींचे त्यांचे विचार पाहावयास मिळतील.

कुमारस्वामींचें लिखाण इतकें विपुल व विविध आहे कीं, त्या सर्वांचा त्रोटक परिचय देणेंहि कठिण आहे. काहींच्या बाबतींत तसा प्रयत्न करूं गेल्यास लेखकाच्या अनधिकारचेष्टेंतच भरीव भर पडावयाची.

पूर्वेकडील व पश्चिमेकडील प्राचीन व अर्वाचीन मिळून दीड एक डझन भाषा तरी कुमारस्वामींना अवगत होत्या, असें त्यांच्या लिखाणावरून दिसतें. शिल्परत्न, अभिनयदर्पण वगैरे कित्येक संस्कृत ग्रंथांचीं किंवा ग्रंथांतील विशिष्ट भागांचीं त्यांनीं भाषांतरें केलीं आहेत. विद्यापति व रवीन्द्रनाथ यांच्या बंगाली काव्यांचीं, दानलीला व इतर अनेक हिन्दी पद्यांचीं पद्यमय भाषांतरें त्यांनीं केलीं आहेत. गुर्जर कवि कलापीच्या 'पांथ पंखी' नांवाच्या एका काव्याचा त्यांनीं केलेला पद्यमय अनुवादहि उपलब्ध आहे. कित्येक विवेचकांनीं त्यांचा कवि म्हणून उल्लेख देखील केलेला आहे.

कुमारस्वामींची भाषा निश्चित, अर्थघन व मार्मिक आहे. पूर्वेकडील विचार पश्चिमेकडील








भाषेंत मांडण्याच्या बाबतींत ते जवळजवळ राधाकृष्णन् इतकेच सिद्धहस्त आहेत. शब्दांच्या मुळापर्यंत जाऊन त्यांत जास्तींत जास्त अर्थ भरणें हें त्यांचें वैशिष्ट्य आहे. ' नामूलं लिख्यते किंचित् ' या पंडितांच्या मुद्रालेखाबरोबर ' नानपेक्षितमुच्यते ' या औचित्यसूचक सूत्राचेंहि त्यांनीं कसोशीनें पालन केलें आहे. याचें उत्तम उदाहरण त्यांच्या हिंदुधर्मावरील निबंधांत पाहावयास सांपडतें. त्यांच्या लिखाणांत यथोचित जोर आहे व दीर्घ अभ्यास व चिंतनाच्या अंतीं बनलेले निश्चित अभिप्राय व्यक्त झालेले आहेत. मरणापर्यंत त्यांची अभ्यासी वृत्ति प्रखरपणें जिवंत होती. अमेरिकेसारख्या ' सुधारलेल्या ' व साधनसंपन्न देशांत राहूनहि ते साधें व तपस्वी जीवन व्यतीत करीत, असें म्हणतात. त्यांच्या विद्यमान पत्नीच्या ( या बाई मेक्सिकोच्या वतनी आहेत. पंधरा वर्षांपूर्वी आपल्या मुलास घेऊन संस्कृतच्या अध्ययनासाठीं त्या काशीस आल्या होत्या) शब्दांत सांगावयाचें म्हणजे ' ते एक अवलिया आहेत. प्रपंचाची त्यांना कांहीं पर्वा नाही. त्यांचीं पुस्तकें, त्यांचे चित्रांचे व इतर कलाकृतींचे संग्रह हीच त्यांची संपत्ति आहे. ' राहाणीचें मान अमर्यादपणें वाढवीत जाण्यांत कांहींच संस्कारिता नाहीं. उलट, तें जितकें उच्च ( म्हणजे महाग ) तितकी संस्कारिता खालच्या प्रतीची, असें ते म्हणत. एक-दोन वर्षांतच बोस्टन संग्रहालयाच्या सेवेंतून निवृत्त होऊन हिंदुस्थानांत येऊन हिमालयाच्या पायथ्याशीं किंवा तिबेटांत एखाद्या प्रशांत स्थळीं वास्तव्य करून चिंतनात्मक जीवन व्यतीत करण्याची त्यांची अभिलाषा होती. अमेरिकेच्या धांवाधावीच्या संस्कृतीला ते कंटाळले होते. स्वतंत्र भारताच्या पुनर्रचनेच्या वेळीं त्यांची देशाला जास्तींत जास्त जरूर होती. त्यांच्या मृत्यूमुळें हिंदुस्थानानें त्यांच्या परिणत प्रज्ञेचा मोठा लाभ गमावला आहे.

हिंदुस्थानापासून हजारों मैल दूर राहत असूनहि-कदाचित् त्याच कारणानें देखील—हिंदुस्थानांत काय चाललें आहे इकडे त्यांचें सतत लक्ष असें. श्री. चंद्रशेखर यांच्याशीं झालेल्या संभाषणांत त्यांनीं हिंदुस्थानांपुढील प्रचलित प्रश्नांविषयीं आपले ठाम अभिप्राय व्यक्त केले आहेत. गेल्या फेब्रुवारींत ' युनायटेड नेशन्स वर्ल्ड ' या नांवाच्या मासिकांत लिहिलेल्या ' ध कर्स ऑफ् फॉरीन रूल ' (परराज्याचें अरिष्ट) या लेखांत राजकीय स्वातंत्र्य मिळाल्यावर देखील भारताचा आत्मा मुक्त झाला असें अजून म्हणतां येत नाहीं, असें म्हटलें आहे. जगाला गांधींचा हिंदुस्थान पहावयाचा आहे. कोणत्याहि उपायानें विकत घेतां येणार नाहीं असा तोच एक महापुरुष आहे असें त्यांनीं म्हटलें आहे. अगदीं अलीकडे म्हणजे ' एशियन रिलेशन्स कॉन्फरन्स'ला योग्य दिशेकडील पाऊल म्हणून वर्णून त्यांनीं तिचें स्वागत केलें होतें.

## पूर्वपश्चिम—समन्वयाचें ध्येय

लेखाचा विस्तार मर्यादेबाहेर गेला आहे. तथापि येथेंच थांबल्यास कुमारस्वामींच्या व्यक्तित्वाला मोठा अन्याय केल्यासारखें होईल. म्हणून त्यांच्या समग्र प्रवृत्तींच्या मागें कोणत्या वस्तूची प्रेरणा होती तें स्पष्ट करून घेऊं.

रुडयार्ड किप्लिंग यानें आपल्या प्रतिभेचा दुरुपयोग केला किंवा भिन्न भिन्न दृष्टींचा समन्वय करण्याच्या बाबतींत स्वतःच्या अपात्रतेवरच सूड घेऊन तो पूर्व व पश्चिम यांच्या मधील सनातन भेदाचा व विद्वेषाचा फिरस्ता बनला. कुमारस्वामींनीं पूर्वेच्या कलेचा व संस्कृतीचा आजन्म उग्रपणें पुरस्कार केला. यावरून ते पश्चिमेचे द्वेष्टे असावेत असा ग्रह होण्याचा संभव आहे. परंतु पूर्वेकडील कला व संस्कृतीइतकाच पश्चिमेकडील कलेचा व संस्कृतीचा त्यांचा सखोल अभ्यास होता. पश्चिमेकडील कलाकारांविषयीं व अध्यात्मवाद्यांविषयीं—विशेषतः युरोपांतील मध्ययुगीन अध्यात्मवाद्यांविषयीं व कलाकारांविषयीं—त्यांना पराकाष्ठेचा आदर वाटत होता. प्लेटोच्या 'रिपब्लिक'ची स्तुति करून ते कधीं कंटाळत नसत. म्हणून अखिल मानव्याच्या कल्याणासाठीं पूर्व व पश्चिम यांचा सुमेळ साधण्याबाबतचे त्यांचे विचार दर्शविणारे ' डॅन्स ऑफ शिव ' ( शिवाचें नृत्य ) मधील रोमे रोलाँ यांनीं उद्धृत केलेले दोन परिच्छेद येथें देऊन हा लेख पुरा करूं.

': एशियाला वाचवा. त्याचा ध्येयवाद संकटांत सांपडला आहे. त्याला जर तुम्हीं वांचवलें नाहीं,








## आनंद केन्टिश कुमारस्वामी

तर लक्षांत ठेवा कीं, तुम्ही ज्या संपत्ति व हिंसेवर आधारलेल्या साम्राज्यवादानें त्याला सुसज्ज कराल, त्या साम्राज्यवादाच्या शस्त्रानेंच एशियाच्या हातून तुमचा विनाश होईल. एशियाचें अधःपतन तुमच्या नाशास कारणीभूत होईल त्याच्या उद्धारांतच तुमचें क्षेम व कुशल आहे. ''

" नवभारताच्या महान ध्येयवाद्यांना केवळ राष्ट्रवाद संतोष देऊं शकत नाहीं. स्वदेशाभिमान ही फक्त एक स्थानिक महत्त्वाची वस्तु आहे.... महान् आत्म्यांना महान् कार्यें पार पाडावयाचीं असतात. केवळ हिंदुस्थानचेंच जीवन नव्हे, तर जीवनमात्राची आपण एकनिष्ठपणें उपसना केली पाहिजे. अखिल मानवजातीचें सुख हें कोणाहि एका पक्षाच्या विजयापेक्षां जास्त महत्त्वाचें आहे. कोणी एखादें राष्ट्र किंवा विशिष्ट मानववंश किंवा जाति ही कांहीं परमेश्वराची भविष्यकालीन लाडकी प्रजा होणार नाहीं.हें भाग्य तर, ज्यांच्यांत युरोपच्या कर्मयोगाची वीरता आणि एशियाचें चिंतनाचें गांभीर्य किंवा धृति या दोहोंचा संयोग झालेला असेल, अशा समग्र दुनियेंतील उमद्या लोकांनाच लाभणार आहे. ''

---

## गांधीजींची अपूर्व सेवा

" सर्व प्रकाश नष्ट झाला होता पण एकच तेजस्वी ज्योत तेवत होती व भोंवतालचा अंधार उजळीत होती. अशा ह्या भयंकर काळांत म. गांधींच्या सांनिध्याची खरी किंमत आपणांपैकीं किती जणांना कळली आहे ? गेल्या अर्धशतकाहूनहि अधिक काळ त्यांनीं केलेली देशसेवा आपणां सर्वांना विदित आहे. पण गेल्या चार महिन्यांत त्यांनी केलेली सेवा पूर्वी केलेल्या कोणच्याहि सेवेहून श्रेष्ठ आहे. सर्व जग जणूं महापुरांत वाहून जात असतांना, गांधीजी आपल्या ध्येयाशीं एकनिष्ठ राहून, पर्वतासारखे स्थिर व दीपगृहाप्रमाणें प्रकाशमान भासले. त्यांचा शांत पण गंभीर आवाज इतरांच्या हलकल्लोळांमधून ऐकूं येत होता व सत्कार्याचा मार्ग दर्शवीत होता. या तेजस्वी ज्योतीमुळेंच आपली भारत व भारतवासीय यांवरलि श्रद्धा ढळली नाही. ''—पं. जवाहरलाल नेहरू, दीक्षान्तभाषण, रौप्यमहोत्सव, अलहाबाद विश्वविद्यालय, डिसेंबर १९४७

---

## नवभारताचें चित्र

" ज्या प्रकारचा भारत आम्ही बनवूं पहात आहोंत, त्या भारतांत जातिवाद, तुटकपणा, फुटीर वृत्ति, अस्पृश्यता, धर्मवेड यांना स्थान मिळणार नाहीं. प्रत्येकाला धार्मिक स्वातंत्र्य राहील. परंतु राष्ट्राच्या राजकीय व आर्थिक बाबतींत धर्माला ढवळाढवळ करण्यास संधि मुळींच मिळणार नाहीं. ''
—पं. जवाहरलाल नेहरू, वर उल्लेखिलेल्या भाषणांमधून.



अनुक्रमणिका






# प्राचीन प्राग्ज्योतिषपुर हें काठेवाडांत

प्रा. वि. व. आठवले

[ 'गीता जयन्तीची नक्की तिथि कोणती? कौरव-पांडवांचें युद्ध इसवी सनापूर्वी किती वर्षें झालें आणि कोणत्या तिथीस सुरूं झालें? भारत-भागवतांतून उल्लेखिलेलीं स्थळें आज भौगोलिक दृष्ट्या ओळखून काढतां येणें शक्य आहे काय? भारतांतील श्रीकृष्ण-पांडवादिकांचा सुसंगत इतिहास आपणांस उकलून दाखवितां येतो काय?' इत्यादि प्रश्न प्राचीन भारतीय संस्कृतीच्या अभ्यासकांसमोर नेहमींच उभे असतात. अशा प्रश्नांचीं उत्तरें देण्याचा प्रा. आठवले यांनीं प्रस्तुत लेखांत प्रयत्न केला आहे. प्रा. आठवले ह्यांनीं भारतादि ग्रंथांतील संदर्भांचा सूक्ष्म अभ्यास करून आणि प्रत्यक्ष पर्यटन करून भूगोलशास्त्र व खगोलशास्त्र यांच्या आधारें वरलि प्रश्नांचें संशोधन-पूर्वक विवेचन केलें आहे. विशेषतः त्यांनीं भारतकालीन प्राग्ज्योतिषपुर हें आसामांत होतें अशी जी प्रचलित समजूत ती चुकीची असून प्राग्ज्योतिषपुर हें काठेवाडांत होतें हें सप्रमाण सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे, तें वाचकांस खचित उद्‌बोधक वाटेल—का. सं. ]

भारत, भागवत, हरिवंश, विष्णुपुराण इत्यादि ग्रंथांत पांडव व श्रीकृष्ण यांच्या ज्या गोष्टी दिल्या आहेत त्यांत ऐतिहासिक सत्य कांहींच नाहीं, काल्पनिक भारुडच फार आहे अशी कल्पना आधुनिक विज्ञानशास्त्र शिकल्यामुळें पुष्कळांची होऊं लागली आहे. एकादी गोष्ट सांगितलेली असेल तर ती कोठें घडली, केव्हां घडली याची पूर्वापरसंगति सांगतां येत नसेल तर ती गोष्ट कादंबरीवजा होणारच. भारत-भागवतांतील गोष्टींमध्यें दिक्कालानुक्रम आहे कीं नाहीं याची छाननी करून बघण्याचा प्रयत्न अद्यापि पूर्णपणें कोणी केला नाहीं. पूर्णपणें याचा अर्थ-ज्या स्थळीं अमकी गोष्ट घडली असें सांगितलें असेल तें स्थळ प्रत्यक्ष पाहून पुराणांत दिलेलें स्थल-वर्णन ( पर्वत, नद्या इत्यादि ) जमतें कीं नाहीं तें ठरविणें. उदाहरणार्थ, श्रीकृष्णाचें लग्न प्रथम रुक्मिणीशीं झालें, नंतर जांबवतीशीं व त्यानंतर सत्यभामेशीं झालें. हा कालानुक्रम निश्चित आहे. पण त्यांचीं माहेरें कोणतीं व किती वर्षांच्या अंतरानें तीं लग्नें झालीं व श्रीकृष्ण त्यावेळीं कोठें होते व किती वर्षांचे होते हें सांगतां आल्याशिवाय तीं विधानें काल्पनिक वाटणारच.

या स्थलनिर्णयाखेरीज भारतांतील कांहीं विधानांचा आम्हांस नीट अर्थ लागला नाहीं म्हणून 'नाचावयास येईना तेव्हां अंगणच वांकडें' या म्हणीसारखें आम्हीं भारतकारासच मूर्खांत काढलें आहे. उदाहरणार्थ, 'पांडवांचें सैन्य व कौरवांचें सैन्य पुष्यनक्षत्रावर कुरुक्षेत्राकडे रवाना झालें' असें स्पष्ट विधान भारतांत आहे. तसेंच "कौरवांस सूर्य व चंद्राचीं लागोपाठ १३ दिवसांच्या अंतरानें ग्रहणें पडून क्षय पक्षाचा अपशकुन लागला. पण पांडवांस कोणताहि अपशकुन लागला नाहीं. धूमकेतूचा अपशकुन कौरवांस झाला. पांडवांस सर्व शकुन शुभच लागले" हें विधान भारतांत स्पष्ट आहे. आम्हीं चुकीनें 'एका नक्षत्रावर निघाले' याचा अर्थ 'एकाच दिवशीं निघाले' असा केला व त्याच्याशीं वरील विधानाचा मेळ बसत नाहीं असें दिसलें म्हणून भारतकारांनीं काल्पनिक भारुड सांगितलें असा निष्कर्ष काढला. आश्विन अमावास्येस चित्रा नक्षत्रापाशीं राहु असल्यामुळें सूर्यग्रहण झालें व पुढें १३ दिवसांनीं कार्तिक पौर्णिमेस चंद्रग्रहण झालें असे तिथि, नक्षत्र









अनुक्रमणिका

व ग्रहणांचे स्पष्ट उल्लेख असूनहि युद्धाचें वर्ष, तिथि, नक्षत्र व महिना नक्की ठरविण्यास उपयोगी पडणारा पुरावा 'भाकडकथा' या सदराखालीं पडून निकामी झाला.

## महाभारतांतील युद्धाच्या सुरुवातीची तिथि

पांडवकालीं अमान्त मासगणना होती कीं पौर्णिमान्त मासगणना होती यास पुरावा न शोधतां अमांत गणनाच असली पाहिजे असा आग्रह श्री. ज. स. करंदीकरें यांनीं धरल्यामुळें 'मी पुष्य नक्षत्रावर तीर्थयात्रेस निघालों व आज ४२ वे दिवशीं श्रवण नक्षत्रावर भीम व दुर्योधन यांचें गदायुद्ध होणार हें कळल्यामुळें तावडतोब येथें आलों' हें भारतांतील बलरामाचें वचन त्यास प्रक्षिप्त मानावें लागलें. युद्ध मार्गशीर्ष महिन्यांत शुक्ल पक्षांत झालें, याबद्दल वाद नाहीं. गणना अमांत होती कीं पौर्णिमांत होती याचा निर्णय करावयाचा असल्यास त्या वेळीं शुक्लपक्ष प्रथम धरीत कीं कृष्णपक्ष प्रथम येई, याबद्दल भारतांतील विधानें बघितलीं कीं निर्णय आलाच. भारतांत तीन ठिकाणीं 'कृष्णपक्ष प्रथम'

---

१ नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या गीतामंजरींतील श्री. करंदीकर यांचीं कांहीं निर्णयात्मक विधानें, गीता व भारत यांतील स्पष्ट विधानांशीं कशीं विरोधी आहेत, त्याचीं उदाहरणें अशीं– (१) 'मासगणना अमान्त पद्धतीची होती' गी. मं. पा. ८५८. पौर्णिमेस महिना संपे व कृष्णपक्ष प्रथम येई, हें वर दाखविलें आहेच. शिवाय भारतांत पौर्णिमा हा शब्द दृष्टांतांत देखील न वापरतां (पौर्णिमास्यां इवोडुराट्) पौर्णिमासी असा शब्द वापरला आहे. चंद्राच्या कला पुऱ्या होणें व महिना पुरा होणें यांमध्यें भेद नव्हता हें यावरुन सिद्ध होतें. (२) 'भारतीय युद्धाच्या वर्षीं १३ दिवसांचा पंधरवडा आला होता ही कल्पना मागून घातली असावी असें दिसतें' गी. मं. पा. ८६४. श्रीकृष्ण व कर्ण यांची शिष्टाईनंतर कृष्ण–अष्टमीस गांठ पडली. त्या दिवशीं चित्रा नक्षत्राकडे राहु मागें सरकत आहे व सूर्य चित्रेकडे पुढें जात आहे, म्हणून सूर्यग्रहण होणार असें कर्ण भाकित करीत आहे. कार्तिक पौर्णिमेस चंद्रग्रहण झालेल्याचा उल्लेख भारतांत आहे. १३ दिवसांच्या अंतरानें चंद्र व सूर्य या दोघांसहि ग्रहण लागलें असें भीष्मपर्वांत दोन ठिकाणीं सांगितलें; 'चौदा दिवसांनीं दोन ग्रहणें झालेलीं मी पाहिलीं, १५ दिवसांनीं झालेलीं पाहिलीं, १६ दिवसांच्या अंतरानें झालेलीं देखील पाहिलीं; पण हा १३ दिवसांत दोन ग्रहणांचा योग कधींहि पाहिला नव्हता.' (भीष्म. ३.३३). १३ दिवसांत दोन ग्रहणें झालीं म्हणूनच दोन तिथींचा क्षय पन्धरवडा प्रत्यक्ष पाहिला. (३) 'कार्तिक कृष्ण ५ ला शिष्टाई निष्फळ. दुर्योधनाच्या सैन्याचें त्याच दिवशीं प्रयाण. पांडवांकडे जाण्यापूर्वी कृष्णानें कर्णाची गांठ घेतली, कार्तिक कृष्ण सप्तमी' गी. मं. पा. ८५९. कृष्ण उपप्लव्यास परत गेल्यावर, पुष्यनक्षत्रावर पांडवांचें सैन्य निघालें. त्याच दिवशीं बलराम तीर्थयात्रेस गेले, हें वर दाखविलें आहेच. कार्तिक वद्य पंचमीनंतर पुष्य नक्षत्र मार्गशीर्ष वद्य तृतीयेस येतें. युद्ध मार्गशीर्ष शुक्ल पक्षांत झालें! (४) 'युद्धाच्या दिवशीं नक्षत्र भरणी' गी. मं. पा. ८६०; 'गदायुद्ध मूळ नक्षत्रावर' गी. मं. पा. ८६३. बलराम, गदायुद्ध सुरू होणार इतक्यांत; ४२ दिवसांची तीर्थयात्रा करून परत आले, (गदायुद्ध-पर्व) त्या दिवशीं श्रवण नक्षत्र होतें असें भारतांत स्पष्ट म्हटलें आहे. हे ऐतिहासिक प्रसंग अडूं लागल्यामुळें श्री. करंदीकर यांनीं गीतामंजरींत पान ८६३ वर शिष्टाईपासून भीष्मनिर्याणापर्यंत अमक्या गोष्टी अमक्या तिथि–नक्षत्रावर घडल्या असें दाखविणारा जो तक्ता दिला आहे, त्यांत पांडवांचें सैन्य केव्हां निघालें, बलराम तीर्थयात्रेस कां व केव्हां गेले, याबद्दल मुळींच उल्लेख केला नाहीं. (५) 'भीष्मपतन मार्गशीर्ष कृष्ण ६ व भीष्मनिर्याण माघ कृष्ण ५. शरशय्या एकूण ५९ दिवस'–गी. मं. पा. ८६३. भारतांत भीष्मपतनानन्तर भीष्मनिर्याणापर्यंत कोणत्या गोष्टी घडल्या याचा हिशेब पुढीलप्रमाणें आहे. पतनापासून गदायुद्धापर्यंत ९ दिवस. गंगेच्या कांठीं अशौच पाळण्यासाठीं ३० दिवस मुक्काम (शांति १·२). हस्तिनापुरांत श्रीकृष्णांनीं युधिष्ठिरांस पांचजन्याभिषेक केला, त्यांत १० दिवस मोडले. (शांति ४०·४२). नंतर भीष्माकडे सर्वजण गेले. 'उत्तरायणास अद्यापि ५६ दिवस आहेत. तुम्ही युधिष्ठिरास राजधर्म सांगा' असें कृष्णांनीं भीष्मास सांगितलें. (शांति ५१·१४). राजधर्म सहा दिवस ऐकल्यावर युधिष्ठिरानें "आतां पुरे. उत्तरायण लागलें कीं परत येईन" असें सांगितलें. (अनुशा. १६६)

(चालू टीप पान ४८ वर पहा










अनुक्रमणिका

हा उल्लेख आहे. शिवाय माघ शुक्ल द्वादशीस अश्वमेधाचा घोडा परत आला अशी बातमी युधिष्ठिरास कळली, त्यावेळीं युधिष्ठिर भीमास म्हणतो 'माघी पौर्णिमेस महिना संपेल'. यावरून पांडवकालीं पौर्णिमांत गणना असे, हें सिद्ध होतें.

बलरामांच्या वचनावरून युद्धाची तिथि व नक्षत्र ठरतें. श्रवणनक्षत्र पौष शुक्ल प्रतिपदेच्या आसपास येतें. युद्ध संपलें त्या दिवशीं श्रवणनक्षत्र होतें या संबंधीं वाद नाहीं. त्याचे पूर्वी १८ वें नक्षत्र युद्धाचे दिवशीं असणारच. मृगापासून श्रवण नक्षत्र १८ वें येतें. अर्थात् युद्ध मृगनक्षत्रावर सुरू झालें हें ठरतें. मृगनक्षत्र मार्गशीर्ष पौर्णिमेच्या आसपास म्हणजे मार्गशीर्ष त्रयोदशी, चतुर्दशी या दिवशीं असणार. मार्गशीर्ष शुद्ध एकादशीस मृगनक्षत्र कधींही येऊं शकत नाहीं. अर्थात् श्री. ज. स. करंदीकर यांनीं काढलेली गीताजयंतीची मार्गशीर्ष शुक्ल एकादशी ही तिथि दुराग्रहाची ठरते. भारतसावित्रींत सांगितलें 'हेमंते प्रथमे मासे शुक्लपक्षे त्रयोदशी। प्रवृत्तं भारतं युद्धं नक्षत्रे यमदैवते ॥'. मृगनक्षत्राची देवता यम आहे.

आतां पांडव व कौरव यांचीं सैन्यें मार्गशीर्ष शुक्ल त्रयोदशीच्या किती आधीं व कोठून कुरुक्षेत्रीं

---

( मागील पानावरून टीप पुढें चालू )

५० रात्री हस्तिनापुरांत काढल्यावर उत्तरायण लागलेलें युधिष्ठिरानें पाहिलें. तेव्हां निर्याणाची तयारी करून सर्वजण भीष्माकडे गेले. ( अनु. १६७·५. ) त्यावेळीं भीष्म म्हणतात 'आज ५८ दिवस मी तीक्ष्ण शरशय्येवर (तुमची वाट बघत ) आहे. हे दिवस मला शंभर वर्षांप्रमाणें भासले. ( अनुशासन १६७·२६-२७ ). या श्लोकाचा अर्थ एकूण शरशय्या ५८ दिवस असा श्री. करंदीकर यांनीं केला आहे. ३० दिवस नगराबाहेर अशौचांत गेले व युधिष्ठिर भीष्मांची परवानगी घेऊन ५० दिवस हस्तिनापुरांत राहिला, तर एकूण शरशय्या ५८ दिवस होईल कशी ? 'माघोऽयं समनुप्राप्ते मासः सौम्यः। त्रिभागशेषः पक्षोऽयं शुक्लो भवितुं अर्हति ॥' ( अनु. १६७·२८ ) यांत 'अयं शुक्लः पक्षः। अयं माघः मासः त्रिभागशेषः भवितुं अर्हति।' असा सरळ अन्वय आहे. पौर्णिमांत गणनेंत शुक्ल अष्टमीस महिन्याचा ३/४ भाग पुरा होतो. अर्थात् भीष्मनिर्याणदिवशीं माघ शुक्ल ८ होती. श्री. करंदीकर यांनीं 'शुक्ले भवितुं अर्हति' असा दूरान्वय लावून फलज्योतिषाच्या एका बादरायणसंबंधाच्या आधारें कृष्णपंचमी येते असें सिद्ध केलें! गी. ८·२४ च्या विरोधी तें आहे.

भीष्मांची शरशय्या वर दिलेल्या हिशेबाप्रमाणें ( ९+३०+१०+५६ )=१०५ दिवसांची येते. भीष्मपतन मार्गशीर्ष वद्य अष्टमीस व निर्याण माघ शुक्ल अष्टमीस धरल्यास शरशय्या फक्त ४५ दिवस येईल. या दोन हिशेबांत ६० दिवस अगर बरोबर दोन महिन्यांचा फरक येतो. अर्थात् युद्धाच्या वर्षी दोन महिने अधिक मास आले होते असें दाखवितां आल्यास हा विरोध देखील नाहींसा होतो. अधिक मासाप्रमाणें आपल्या पंचांगांत क्षयमास देखील येतो. पण तसला योग १८७ वर्षांनीं येतो. त्या वर्षी दोन अधिक मास घालतात. १३ दिवसांच्या अंतरानें दोन ग्रहणें येऊन क्षय-पक्ष ज्या वर्षी होईल त्या वर्षी तसा योग येणें शक्य आहे. पंचांगें करणाऱ्यांनीं या बाबत विचार करावा व इ. स. पूर्वी ३०१८ अगर ३०३८ या सालीं क्षयमासाचा योग होता कीं नाहीं तें पहावें अशी प्रस्तुत लेखकाची सूचना आहे. उज्जैन येथील वेधशाळेंतील सुपरिंटेंडेंट श्री. वैद्य यांस मी जानेवारी १९४६ मध्यें विचारलें होतें कीं 'इ. स. पूर्वी ३०१०-३०२०याचे दरम्यान क्षयमासाचा योग आला होता काय ?' त्यांनीं मला उत्तर पाठविलें कीं 'क्षयमासाचें गणित करून असक्या वर्षी क्षयमास होता हें ठरविणें फार किचकट आहे; पण त्या सुमारास क्षयमासाचा योग होता एवढें मात्र सांगतां येतें.'

सध्यां आपण दर २॥ वर्षांनीं अधिक मास पंचांगांत दिलेला पहातों. पांडवांचे वेळीं दर पांच वर्षांनीं एकदम दोन महिने अधिक घालण्याचा प्रघात असल्यास वरील प्रश्नाचा उलगडा होऊं शकेल. भारताचार्य वैद्य यांनीं भारताच्या उपसंहारां( पान ६१० )मध्यें लिहिलें. "पांडवांच्या काळीं दर पांच वर्षांनीं दोन महिने ( ऋतु ) एकदम अधिक घालण्याचा संप्रदाय असावा असें आम्हीं पूर्वी एके ठिकाणीं दाखविलें आहे."








आलों त्या प्रश्नाकडे वळूं. श्रीकृष्ण हस्तिनापुरास शिष्टाईसाठीं आश्विन शुक्ल चतुर्दशी रोजीं रेवती नक्षत्रावर उपप्लव्याहून निघाले, ते आश्विन वद्य ३ रोजीं हस्तिनापुरास पोहोंचले. वद्य षष्ठीस शिष्टाईची सभा झाली. त्या दिवशीं श्रीकृष्णांस कैद करण्याचा प्रयत्न दुर्योधनानें केला पण तो फसला. त्या दिवशींच त्यानें हुकूम फर्माविला कीं, 'उद्यां कुरुक्षेत्राकडे सैन्यानें जावयाचें आहे, अशी घोषणा आज दवंडी पिटवून करा.' दुसरे दिवशीं सकाळीं दुर्योधन भीष्मांकडे गेला व त्यानें त्यांस सेनापति होण्याची विनंति केली. कर्ण दुर्योधनाबरोबर होता. त्यांस पाहून भीष्म म्हणाले "कर्णास माझ्या बरोबरीचा करणार असशील तर मी सेनापति होणार नाहीं. हा हीनकुलांतील असून 'अर्धरथ' आहे." कर्णाचा असा अपमान झाल्यामुळें कर्ण चिडला व म्हणाला "भीष्म युद्धभूमीवर असेपर्यंत मी युद्धास येणार नाहीं." नंतर भीष्मांस सेनापतिपदाचा अभिषेक झाला. अभिषेकाचे शेवटीं दुर्योधनानें हुकूम केला कीं 'आज पुष्यनक्षत्र आहे (अश्विन वद्य ७): तेव्हां कुरुक्षेत्रास प्रस्थान झालेंच पाहिजे.' हत्तीच्या अंबारींतून प्रस्थानसमारंभ झाला.

श्रीकृष्ण विदुराकडे होतेच. त्यांस ही बातमी कळली. दुसरे दिवशीं (अश्विन वद्य ८) ते परत उपप्लव्यास जाण्याकरितां निघाले. त्यांनीं कर्णास भेटावयास बोलाविलें. कर्णाची गांठ श्रीकृष्णांनीं रथांत घेतली. बरोबर संजय होता. युद्धांतून अजीबात बाहेर राहण्याविषयीं त्यास श्रीकृष्णांनीं सल्ला दिला पण कर्णानें तो मान्य केला नाहीं. तेव्हां कृष्ण म्हणाले, "आजपासून सातवे दिवशीं अमावास्या आहे, तेव्हां त्या अमावास्येस युद्धाची तयारी सुरूं करा असा माझा निरोप द्रोणादिकांस सांग." कर्ण स्वतः युद्धांत भाग घेणार नसल्यामुळें तसा निरोप द्रोणाकडे श्रीकृष्णांस पांडवांतर्फे पाठविणें भाग पडलें. कर्ण म्हणाला "स्वातीकडून चित्रेकडे राहु मागें सरकत आहे व सूर्य चित्रेकडून स्वातीकडे जात आहे; तेव्हां या अमावास्येस ग्रहण होईल असें वाटतें." या विधानास दुजोरा "चित्रास्वात्यंतयोर्मध्ये विष्टितः परुषः ग्रहः। रोहिणीं पीडयत्येवमुभौ च शशिभास्करौ। चंद्रसूर्यौ उभौ ग्रस्तौ एकमासीं त्रयोदशीं॥" या दोन विधानांवरून पूर्णपणानें मिळतो.

पांडवांचें सैन्य कृष्ण उपप्लव्यास परत गेल्याशिवाय कुरुक्षेत्राकडे जाणें शक्य नव्हतें. श्रीकृष्ण परत आल्यावर म्हणाले, 'माझा सल्ला कौरवांनीं ऐकला नाहीं; तेव्हां आतां येत्या पुष्यनक्षत्रावर माझ्याबरोबर पांडवांनीं उपप्लव्याहून प्रयाण केलें पाहिजे.' अर्थात् हें पुष्यनक्षत्र कौरवांचें सैन्य ज्या पुष्य नक्षत्रावर बाहेर पडलें त्यानंतर २७ दिवसांनीं म्हणजे कार्तिक वद्य ५ रोजीं येणार. या कार्तिक वद्य पंचमीस उपप्लव्य येथें ज्या गोष्टी घडल्या, त्यांचें वर्णन उद्योगपर्वामध्यें मिळतें. दुर्योधनानें हस्तिनापुर येथें सेनापति म्हणून अभिषेक फक्त भीष्मांसच केला होता. युधिष्ठिरानें आपल्या सात अनीक सैन्यांचे सात सेनापती कार्तिक वद्य पंचमीस एकदम नेमले. या सेनापती नेमण्याच्या फरकाचें प्रत्यंतर पुढीलप्रमाणें मिळतें. दहावे दिवशीं भीष्म पडल्यानंतर अकरावे दिवशीं द्रोणाचार्यांस 'सेनापति' म्हणून अभिषेक दुर्योधनानें कुरुक्षेत्रांतील शिबिरांत केला. १५ वे दिवशीं द्रोण पडल्यावर कर्णास अभिषेक झाला असल्याचा उल्लेख आहे. शेवटचे दिवशीं शल्य सेनापति होता. पांडवांचेकडे तसें करण्याचें कारणच पडलें नाहीं.

---

१ हस्तिनापुर गंगेच्या पूर्व किनाऱ्यावर दोन मैल अंतरावर होतें. हल्लीं गंगा हस्तिनापुराच्या पूर्वेस ५ मैलांवर आहे. इंद्रप्रस्था (दिल्ली) च्या ईशान्येस ५७ मैलांवर आहे. उपप्लव्य हें विराटनगरीपासून १२–२० मैलांवर असावें. विराट शहर जयपूर पासून ईशान्येस ४५ मैलांवर आहे.

२ पांडवांचें सैन्य सात अनीक व कौरवांचें ११ अनीक होतें. १ अनीक=२४००० सैन्य. सौतीनें १० अनीकें = १ अक्षौहिणी असें नवीन कल्पित कोष्टक देऊन दोघांचें मिळून सैन्य १८ अक्षौहिणी होतें (अदमासें चाळीस लक्ष) असें विधान केलें. हा वाढावा सौतीनें केला यास पुरावा असा–"दुर्योधनानें आपल्या ११ अनीकसैन्याची पाहणी केली." असें मागच्या श्लोकांत विधान आहे. नंतर कांहीं श्लोक सोडून म्हटलें आहे कीं, 'कौरवांचें सैन्य ११ अक्षौहिणी होतें.' गीतेंत अनीक हा शब्द आहे, अक्षौहिणी हा नाहीं.








कार्तिक वद्य पंचमी रोजीं पुष्य नक्षत्रावर सात सेनापती नेमण्याचा कार्यक्रम उपप्लव्य येथें चालू झाला होता, इतक्यांत बलराम तेथें आले. त्यांच्याबरोबर गद, उद्धव, सांब इत्यादि यादव होते. त्यांनीं कृष्णास सुचविलें कीं ' दुर्योधन हा देखील आपला आप्त आहे, त्यास आपण युद्धांत मदत करणें इष्ट आहे.' श्रीकृष्णांनीं स्पष्ट सांगितलें कीं, " तुम्हास पांडवांचे बाजूनें लढावयाचें नसेल तर वाटल्यास लढूं नका. दोघांसही तुमचें साहाय्य नाकारा. पण तुम्हांस दुर्योधनाचे बाजूनें लढूं देणार नाहीं. " बलराम त्यावेळीं रागावून ४२ दिवस तीर्थयात्रेस पुष्यनक्षत्रावर गेले. बलराम निघून गेल्यावर श्रीकृष्णाचा मेहुणा रुक्मी ' पांडवांस मदत करतों ' म्हणून आला. पण त्याचा उद्दामपणा पाहून अर्जुनानें त्याची मदत नाकारली.म्हणून शल्य०(३५) व उद्योगमध्यें सांगितलें " गते रामे तीर्थयात्रां भीष्मकस्य सुते तथा। पाडवांचें सैन्य उपप्लव्याहून निघालें". कार्तिक पौर्णिमेस चंद्रग्रहण व त्याच्याआधीं १३ दिवस सूर्यग्रहण अशीं दोन ग्रहणें होऊन गेलीं असल्याकारणानें पाडवांच्या प्रयाणानंतर कोणताही अपशकुन झाला नाहीं.

अशा तऱ्हेनें अश्विन शुक्ल चतुर्दशीस श्रीकृष्ण शिष्टाईस निघाल्यापासून मार्गशीर्ष शुक्ल त्रयोदशीस युद्ध सुरू होईपर्यंत काय गोष्टी घडल्या त्याची सुसंगत माहिती भारतांत मिळते.

## भारतीय युद्धाचा काळ

पण हें युद्ध इसवी सनापूर्वीं किती हजार वर्षें झालें या प्रश्नासंबंधीं संशोधकांमध्यें अत्यंत मतभेद आहे. ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटीचे प्रो. पार्जिटर ' हें युद्ध इ. पू. ११००सालीं झालें,' असें वंशावळीच्या ( काश्मिरी ) पुराव्यावरून उत्तर काढतात. कै. भारताचार्य वैद्य हे मॅगॅस्थेनिसनें दिलेल्या वंशावळीच्या माहितीवरून ' इ. पू. ३१०० सालीं हें युद्ध झालें ' असें उत्तर काढतात. या दोन उत्तरांत २००० वर्षांचा फरक येतो.

युद्ध अमके सालीं झालें हें ठरविण्यास चित्रानक्षत्रापाशीं अश्विन अमावास्येस सूर्यग्रहण व पुढें १३ दिवसांनीं कार्तिकी पौर्णिमेस चंद्रग्रहण हा खगोलशास्त्राचा आधार अत्यंत महत्त्वाचा आहे. पण राहु १८ वर्षांनीं त्याच नक्षत्रापाशीं येतो व १९ वर्षांनीं तींच ग्रहणें येतात असा नियम असल्यामुळें अदमासें दर ३५० वर्षांनीं त्या तऱ्हेच्या ग्रहणांचा योग येऊं शकणार. अर्थात् ११०० ते ३१०० या २००० वर्षांत सहा वेळां तसल्या ग्रहणांचा योग येऊं शकेल. या सहा उत्तरांपैकीं कोणतें उत्तर बरोबर तें ठरवितां येण्यास कांहींच आधार देतां येत नाहीं. गेल्या मे महिन्यांत नरकासुराचें प्राग्ज्योतिष व मुरु दैत्याची अलका नवानगर संस्थानांत ( काठेवाडांत ) होती, हा शोध मला त्या संस्थानांत दरबारी पाहुणा म्हणून हिंडत असतां लावतां आला. त्या नरकासुराचे वंशज आसामांत गेले. इ. स. ६०० मध्यें आसाममधील सिल्हेट जिल्ह्यांत भास्करवर्मा या आसामच्या राजानें एका जमिनीच्या दानपत्राचा ताम्रपट लिहून दिलेला सांपडला आहे. त्यांत त्यानें नरकासुर या आपल्या पूर्वजाचा उल्लेख केला आहे. ताम्रपटांत लिहिलें आहे ' नरकासुराचा मुलगा भगदत्त यानें भारतीय युद्धांत अर्जुनाशीं संग्राम केला. भगदत्ताचा मुलगा वज्रदत्त हा पराक्रमी राजा होता. वज्रदत्तानंतर ३००० वर्षांनीं त्याचा वंशज पुष्यवर्मा हा गादीवर आला. पुष्यवर्म्यापासून भास्करवर्मा १४ व्या पिढीचा. ' २५ वर्षांची पिढी धरल्यास पुष्यवर्मा भास्करवर्म्याचे आधीं ३५० वर्षें येतो.म्हणजे पुष्यवर्मा इ. स. २५० च्या सुमारास येतो. अर्थात् वज्रदत्त इ. स. पू. २७५० च्या सुमारास येतो. युद्धांत भगदत्त पुष्कळ म्हातारा होता. यावरून सिद्ध होते कीं भारतीय युद्धाचा काल इ. स. २७५० च्या आधीं असला पाहिजे. श्री. ज. स. करंदीकर, प्रो. पार्जिटर हे युद्धाचा काल अनुक्रमें १९०० व ११०० इतका अलीकडे ओढूं पाहतात. तीं सर्व उत्तरें चूक असें आपोआपच सिद्ध होतें. युद्धाचें वर्ष नक्की ठरविण्यास या पुराव्याचा उपयोग फारच आहे. कारण २७५० ते ३१०० या ३५० वर्षांत ज्या सालीं चित्रा नक्षत्रापाशीं राहु असून अश्विन अमावास्येस सूर्यग्रहण व कार्तिक पौर्णिमेस चंद्रग्रहण १३ वे दिवशीं असा योग सांपडेल, तें युद्धाचें वर्ष असणार










अनुक्रमणिका

हें नक्की. ३५० वर्षांत असला योग एकदांच येत असल्यामुळें दोन उत्तरें येऊन विकल्प होण्याचें कारण नाहीं. माझे कुर्ग संस्थानांतील ॲस्ट्रॉनोमर मित्र श्री. राजाराव यांस या प्रश्नाचें उत्तर काढावयास सांगितलें होतें. त्यांनीं इ. स. पू. ३०१८ हें उत्तर काढलें. कोडाईकनाल येथील Solar observatory मध्यें काम केलेले ॲस्ट्रॉनोमर श्री. पी. आर. चिदंबर अय्यर हे सध्यां, सेवानिवृत्त होऊन, पुण्यास राहिले आहेत. त्यांनीं या प्रश्नाचा दुसऱ्या रीतीनें विचार करुन इ. स. पू. ३०३८ हें उत्तर दिलें आहे. या दोन उत्तरांत फक्त २० वर्षांचा फरक असल्यामुळें युद्धाचें साल ठरविण्याचा प्रश्न जवळजवळ निकालांत निघाला असें म्हणण्यास हरकत नाहीं.

## नरकासुराचें प्राग्ज्योतिष

आतां नरकासुराचें प्राग्ज्योतिष काठेवाडांत कोठें होतें व तेथून तें आसामांत पश्चिमेकडून पूर्वेकडे कोणीं नेलें या प्रश्नास थोडक्यांत उत्तर देऊन हा लेख पुरा करूं. आसाममधील कामरूप जिल्ह्यास प्राग्ज्योतिष असें इ. स.१०० च्या सुमारास म्हणत, असा पुरावा मिळतो. आसाममधील ' गोहत्ती ' या शहरास प्राग्ज्योतिषपुर असें विकल्प-नांव अद्यापिही आहे. आसाममधील प्रसिध्द इतिहासज्ञ कै. डॉ. भट्टसाळी यांची समजूत होती कीं नरकासुर व भगदत्त हे मूळपासूनच आसामकडचे. आपलें मत त्यांनीं Indian Historical Quarterly च्या डिसेंबर १९४६ च्या अंकांत लेख या रूपानें व्यक्त केलें आहे.

श्रीकृष्णांनीं नरकासुराचा वध प्राग्ज्योतिषपुरांत केला. नरकासुराचें मुरु, निसुंद, पंचनद, हयग्रीव असे चार हस्तक होते. मुरु हा अलका या डोंगराळ भागांत असे, पंचनद व हयग्रीव हे जवळच लोहितगंग प्रदेशांत औदक्य गांवीं रहात असत. या पांच जणांनीं मुली पळवून आणून कैदेंत दडवून ठेवावयाच्या व त्या जहाजांतून इजिप्त, बॅबिलोनिया या देशांत नेऊन गुलाम म्हणून विकावयाच्या हा धंदा सुरू केला होता. सुरुस दहा मुली होत्या. त्या या पकडून आणलेल्या मुलींवर देखरेख करीत असत. श्रीकृष्णांनीं जरासंधाच्या भीतीनें प्रभासपट्टणजवळ द्वारका* नांवाचें नवीन शहर वसविलें होतें व तेथें जलदुर्ग बांधला होता. तेथें नरकासुराच्या अनन्वित कृत्याची तक्रार श्रीकृष्णांपुढें आली. श्रीकृष्णांनीं मुरु व नरक यांच्यांवर स्वारी करुन पकडून नेलेल्या हजारों मुली सोडवावयाच्या असें ठरविलें. या स्वारींत श्रीकृष्णाची सत्यभामा ही स्त्री बरोबर होती. ही स्वारी राजसूय यज्ञाचे आधीं झाली असली पाहिजे हें निर्विवाद. कारण सभा० ४५·७ मध्यें सांगितलें आहे--' श्रीकृष्ण प्राग्ज्योतिषाच्या स्वारींत गुंतले असतांना शिशुपालानें रैवतक पर्वताकडून येऊन द्वारकेवर हल्ला केला होता. '' शिशुपालाचा वध राजसूय यज्ञांत इंद्रप्रस्थ ( दिल्ली ) येथें झाला.

नरकासुर आसामध्यें होता असें मानल्यास मुरु वगैरे त्याचे हस्तक आसाममध्येंच असणार. श्रीकृष्ण सत्यभामेसह राजसूययज्ञाचे आधीं आसामकडे गेले असल्याचा कोठेंच उल्लेख नाहीं. अर्थात् नरकासुर आसामकडचा नव्हे हें खास. श्रीकृष्णांनीं प्राग्ज्योतिषावर स्वारी केली, त्या वेळीं प्रवेशद्वारांत द्विविद-वानर नांवाची व्यक्ति होती. त्या व्यक्तीचें नरकासुराशीं सख्य होतें. उद्योग० १३०·४१ मध्यें सांगितलें आहे कीं द्विविद वानरानें मोठमोठे दगड श्रीकृष्णावर फेंकण्याचा प्रयत्न केला. पुढें कांहीं वर्षांनीं आपल्या मित्राच्या वधाचा सूड घ्यावा म्हणून बलराम रैवतपर्वतामध्यें सपत्नीक क्रीडा करावयास गेला असतांना द्विविद वानरानें बलरामावर हल्ला केला होता. शेवटीं द्वंद्वयुद्धांत द्विविद मारला गेला. या माहितीवरुन स्पष्ट होईल कीं प्राग्ज्योतिषपुर रैवतक–( Gir hills )–पर्वताजवळ ५०–६० मैलांवर कोठें तरी असलेंच पाहिजे. त्या_

---

* सध्यां ज्या द्वारकेस तीर्थयात्रेस जातात ती द्वारका वरील द्वारकेपासून १७५ मैल दूर आहे. ' सर्व्हे ऑफ इंडिया ' तर्फे जे नकाशे प्रसिद्ध होतात त्यांत प्रभासपट्टण जवळील द्वारकेस मूळ द्वारका असें नांव दिलें आहे. ओखा मंडळ ( उपामंडल ) मधील द्वारका श्रीकृष्णांनीं शाल्वाचा पराभव ' सलाया ' या बंदरांत करुन त्याचें सौभ जहाज बुडविल्यानंतर मिळविली. बाणासुराच्या उषेचा अनिरुद्धाशीं विवाह येथें झाला.








शिवाय द्विविद वानरं आसामांतून काठेवाडांत सूड घेण्यास एकटा येणें शक्य नव्हतें.

### प्राग्ज्योतिष हें जामनगरजवळ

मे १९४७ मध्यें जामनगर येथें त्या बाबतींत संशोधन करावें म्हणून मी गेलों असतांना मला कळलें कीं, जामनगरपासून ६० मैलांवर 'वर्तू' नदीचे कांठीं गोप म्हणून एक खेडें आहे त्यास पूर्वीं प्राग्ज्योतिषपुर म्हणत असत. मी लगेच स्टेटची मोटार घेऊन तेथें गेलों. नकाशा बरोबर होताच. गोपजवळ डोंगराळ प्रदेश सुरू होतो. तेथून २० मैलांवर (Allech hills) अलका नांवाचा डोंगराळ भाग सुरू होतो. मुरूचा अलका-प्रदेश तो हाच. मुरु मणिपर्वतांतील गुहेंत मुली लपवीत असे. मणि हा शब्द स्फटिकास (Quartz ला) लावतात. ज्या डोंगराळ भागांत स्फटिक मिळतो त्यास मणिपर्वत म्हणणें साहजिक आहे. नवानगर संस्थानानें, स्फटिकाचा सोन्याच्या खाणीशीं संबंध असल्यामुळें व या अलका प्रदेशांत स्फटिक विपुल मिळतो म्हणून, स्फटिकाची खाण सुरू केली आहे. मी ती स्फटिकाची खाण पहावयास गेलों होतों. त्यावेळीं हरिवंशांत दिलेली हयग्रीव व पंचनद या लोकांची राहण्याचीं ठिकाणें--लोहितगंग व औदक्य देखील-तेथील नकाशांत लोहित व उदक अशीं दिलेलीं सापडलीं व त्या जागाही पहावयास मिळाल्या.

शिवाय सत्यभामेचे वडील सत्राजित् यांच्या[1] नांवाचें 'सत्रापूर' हें गांव देखील तेथेंच मिळालें. सत्यभामा 'अलका' प्रदेशांतील असल्यामुळें तिला श्रीकृष्णांनीं आपल्या बरोबर घेतलें, हा देखील उलगडा झाला. या सत्राजिताच्या गांवापासून २५ मैलांवर 'Barda hills' म्हणून टेकड्या आहेत. श्रीकृष्णाची जांबवती ही बायको जांबवानाची मुलगी. जांबवान् या डोंगराळ भागांत रहात असे. त्याची जागा अद्यापि दाखविली जाते. सत्राजितास मिळालेला स्यमंतक मणि गळ्यांत घालून त्याचा भाऊ प्रसेन शिकारीस गेला असतां एका सिंहानें प्रसेनास मारलें. त्या सिंहाची शिकार जांबवानानें केल्यामुळें जांबवानास तो मणि मिळाला. कृष्णावर स्यमंतक मणि चोरल्याचा आळ आला होता याचें कारण सत्राजित् व श्रीकृष्णाची एकदां माधवपुरें येथें गांठ पडली असतां सत्राजितास मणि दाखविण्याबद्दल विनंति केली होती, ती सत्राजितानें नाकारली. शिकारीहून प्रसेन परत न आल्यामुळें लोक शंका घेऊं लागले कीं श्रीकृष्णांनीं प्रसेनास मारून तो मणि लांबविला. मणि आणून दिल्याशिवाय चोरीचा आळ जाणें शक्य नव्हतें. श्रीकृष्णांनीं तपास केल्यावर जांबवानापाशीं तो मणि मिळाला. त्याच्याशीं युद्ध करून कृष्णांनीं त्याची मुलगी जांबवती व मणि मिळविला. मणि सत्राजितास परत दिल्यावर सत्राजितानें सत्यभामा श्रीकृष्णांस दिली.

नरकासुराचा व त्याचे हस्तक यांचा वध करून त्यानें कैदेंत ठेवलेल्या १४००० मुली श्रीकृष्णांनीं सोडविल्या. गोप खेड्याजवळील वर्तू नदी तेथून ३५ मैलांवर मियाणी (पूर्वीचें मीलनपूर) या बंदरापाशीं समुद्रास मिळते. तें बंदर गुलामांचा व्यापार व चांचेगिरी याबद्दल प्रसिद्ध होतें, अशी माहिती मी तेथें गेलों त्यावेळीं मिळाली. श्रीकृष्णास प्रसिद्ध शार्ङ्ग धनुष्य याच लढाईंत मिळालें! नरकासुरवधानंतर लवकरच श्रीकृष्णांनीं आपले वडील वसुदेव यांचे नांवानें अश्वमेधयज्ञ केला. या यज्ञांत मुख्य होतृत्व, पट्पूर नामक गांवांतील वाजसनेयी शाखेचा ब्राह्मण ब्रह्मदत्त यानें स्वीकारलें होतें. पट्पूरास हल्ली 'सत्तपूर' म्हणतात. सत्रापुरापासून तें १२ मैलावर पोरबंदर ते गोंडल या रेल्वे लाइनवर स्टेशनच आहे. हा यज्ञ वर्तू नदीचे कांठीं झाला. सत्तपुरापासून वर्तू नदी ८-१० मैलांवर आहे. या यज्ञांत पट्पुर येथील निकुंभ वगैरे दैत्यांनीं विघ्न आणण्याचें ठरविलें. नरकासुराचा मुलगा भगदत्त

---

१ वृष्णी व अंधक कुलांनीं जेव्हां मथुरा सोडली त्या वेळीं ते एकदम मूळ द्वारकेस आले नाहींत. तेथून पश्चिमेस ६० मैलांवर पोरबंदर हद्दींत माधवपूर गांव आहे, तेथें आले. माधवपुराहून ५० मैल उत्तरेस सत्राजित् रहात असे. तेथून सत्राजित् येई.








यानें देखील त्यांस मदत करावयाचें ठरविलें. पांडव या यज्ञासाठीं आले होते. कौरवांकडील कांहीं मंडळी व शिशुपाल या यज्ञांतला घोडा पळवून विघ्न करावें म्हणून आले होते. भगदत्त, शिशुपाल, निकुंभ यांनीं अडविलेला घोडा कृष्ण, अर्जुन यांनीं युद्ध करुन परत आणला. या युद्धांत निकुंभ मारला गेला.

राजसूय यज्ञाचे आधीं अर्जुन उत्तरेच्या बाजूस दिग्विजयास गेला होता. सभा. २६.७–९ यामध्यें सांगितलें कीं, उत्तरेकडील दिग्विजयास जाण्यापूर्वी अर्जुनानें प्राग्ज्योतिषपुर येथील भगदत्तावर स्वारी करुन त्याच्याकडून खंडणी वसूल केली व नंतर तो उत्तरेकडे दिग्विजयास गेला. वसुदेवाच्या यज्ञांत भगदत्तानें अडथळा केल्यामुळें अर्जुनानें त्याचा वचपा काढला हें उघड आहे.

भगदत्त भारतीय युद्धांत कौरवांचे बाजूनें लढला. द्रोण० २८–२९ मध्यें अर्जुनानें भगदत्ताचा वध केल्याचा उल्लेख आहे. भगदत्ताचा मुलगा वज्रदत्त यानें युधिष्ठिराच्या अश्वमेधाचा घोडा हस्तिनापुराहून त्रिगर्त (कांगडा प्रदेश–हस्तिनापुरच्या पश्चिमेस), तेथून प्राग्ज्योतिष, नंतर सिंधुदेश–असा पश्चिमेच्या बाजूस हिंडत असतां प्राग्ज्योतिष येथें अडविला. अर्जुनानें त्याच्याशीं युद्ध करुन घोडा सोडविला. व ' आगच्छेथाः महाराज परां चैत्रीं उपस्थितां। यदाश्वमेधो भविता धर्मराजस्य धीमतः ॥ ' असें सांगितलें. वज्रदत्त त्या आमंत्रणाप्रमाणें चैत्र शुक्ल प्रतिपदेस, युधिष्ठिरास चक्रवर्ती म्हणून अभिषेक झाला त्यावेळीं, हजर होता. त्यानंतर तो आसामकडे गेला व पूर्वीची आठवण म्हणून त्या ठिकाणास प्राग्ज्योतिष नांव दिलें. पश्चिमेकडील प्राग्ज्योतिषपुर पूर्वेकडे कोणी नेलें याचा खुलासा देखील झाला.

मुरुचा वध झाल्यानंतर त्याच्या दहा मुलींपैकीं कामकंटका नांवाची मुलगी प्राग्ज्योतिषपुरांत भगदत्ताकडे रहात असे. राजसूय यज्ञानंतर हिडिंबेचा भीमापासून झालेला घटोत्कच हा मुलगा इंद्रप्रस्थास असतांना द्रौपदीनें त्याचें लग्न करावयाचें ठरविलें. त्यावेळीं श्रीकृष्णांनीं बातमी सांगितली कीं, मुरुच्या कामकंटका या मुलीनें पण लावला आहे कीं जो मला बुध्दिवाद व शारीर बल या दोन्हींतही जिंकील त्याच्याशीं मी लग्न करीन. घटोत्कचानें प्राग्ज्योतिष येथें जाऊन तिला जिंकलें. तिच्यापासून घटोत्कचास बर्बरिक नांवाचा मुलगा झाला.

वरील माहिती स्कंदपुराण, गर्गसंहिता, भागवत, हरिवंश, विष्णुपुराण या सर्व ग्रंथांतून एकत्रित केली आहे. प्रत्येक हकीकतीचा उल्लेख भारतांत आलेला आहे. सविस्तर माहिती इतर पुराणांत मिळते. भारतांत श्रीकृष्ण व पांडव यांचा सुसंगत इतिहास तिथि महिना, नक्षत्र स्थळ इत्यादिकांचा उल्लेख करुन लिहिला आहे, हें आपोआप सिध्द होईलच.

---

**धर्मभावनेचें कार्य—**

" पुष्कळ वेळां असें म्हणतात–आणि त्यांत तथ्यहि आहे–कीं, धर्मभावनेनें सामान्य माणसालाहि आपण असामान्य आहों असें वाटतें. पण हें तितकेंच खरें नाहीं का, कीं धर्मभावनेनें असामान्यांना पण आपण सामान्य आहों असें वाटूं लागतें ! "

जी. के. चेस्टर्टन.







# प्रयाण

प्रा. गंगाधर गाडगीळ

आजींना लहर आली कीं आपल्या अंथरुणावरच्या चादरीला ठिगळ लावावें. खरें म्हटलें म्हणजे हें काम त्यांनीं सुनेला नाहींतर नातीला सांगायचें पण, नाहीं बस्स ! स्वतः त्या ठिगळ लावणार होत्या. म्हणजे एवढीसुद्धां त्यांना सत्ता नव्हती कीं काय ? त्यांनीं वाटेल तें केलें असतें. वत्ता मारुन चूल देखील कोसळून ठेवली असती ! आणि लोक जर हसले असते, तर बानचोदांचीं थोबाडें फोडून काढलीं असतीं त्यांनीं. मग समजलें असतें म्हातारीचे हात कसे सणसणीत लागतात तें !

बानचोद ! वीस वर्षांपूर्वीं मेलेल्या आजींच्या यजमानांची ती आवडती शिवी होती. त्या शब्दानें मेलेल्या आठवणी सजीव झाल्या. शंकरराव संतापले म्हणजे फुगणारी त्यांच्या कपाळावरची शीर आजींच्या नजरेसमोर दिसूं लागली. त्यांच्या घोट्याच्या हाडावरची काळी पडलेली कुरतडलेली कातडी त्यांच्या नजरेसमोर आली. आणि आंघोळ झाल्यावर नाकावरुन गळणारे पाण्याचे थेंब ! रुमाल बांधून लग्नसमारंभाला ते ज्या रुबाबानें डुलतडुलत जात आणि लोडाला टेकून बसत, तें आठवलें. त्या नुसत्या आठवणीनें विस्कळीत झालेले आजींचे मनोव्यापार परत त्यांच्या काबूंत आले. इतका त्यांना शंकररावांचा धाक होता. त्यांच्या बोलण्यांतल्या उपरोधाच्या धारेनें आजींना अनेकदां रडवलें होतें. आणि एकदांही त्यांनीं आजींचे अश्रू पुसले नव्हते.

आणखी ? आणखी 'कांहीं नाहीं, कांहीं नाहीं, कांही नाहीं,' असें तालासुरावर आजींचें मन म्हणूं लागलें. भिंतींवर नाचणाऱ्या, आरशानें पाडलेल्या कवडशासारखें तें 'कांहीं नाहीं' त्यांच्या मनांत नाचूं लागलें. आजींच्या जाणत्या मनानें त्या 'कांहीं नाहीं' ला पकडून ठेचून टाकण्याचा एक अर्धवट, दुर्बल प्रयत्न केला. पण पाण्यांत जसें ढेकूळ विरघळून जावें, तसा तो प्रयत्न विरघळला. नव्हे, त्यांचें जाणतें मनच त्या अजाण विचारांच्या भरतींत बुडून गेलें. आणि कधीं न संपणारी 'काहीं नाहीं' ची रांग हातवारे करीत उड्या मारीत त्यांच्या मनांत इतस्ततः नाचूं लागली. तो नाच पाहून आजींना हसूं येऊं लागलें. खु- खु-खु-खु- पण तें 'काहीं नाहीं' चें गाणें इतकें मोठें होऊं लागलें कीं, आजींच्या कानठळ्या बसल्या. भीतीचा काळा राक्षस दांत करकरावत त्यांच्या समोर येऊन उभा राहिला. आणि त्यांना वाटलें, खूप मोठ्यानें किंचाळावें. पण त्यांची बोबडीच वळली. शेजारच्या स्टँडचा पाय त्यांनीं घट्ट पकडून ठेवला. आणि मग एकदम पहातां पहातां तो 'कांहीं नाहींचा' पूर एकदम ओसरला. तुंबलेल्या मोरींतल्या पाण्याप्रमाणें.

आजींना कळेना ना कीं हें सारें झालें तें खरें कीं खोटें ! त्यांचें शरीर लटलटत होतें, एवढें मात्र खरें. पण त्यांचें जाणतें मन आतां इतकें दुबळें झालें होतें, सुसूत्रपणें विचार करायला इतकें असमर्थ झालें होतें कीं ह्या बाबतींत काय उपाय करावा तें त्यानां सुचेना. अनेक वर्षांच्या अनुभवानें विचारांचें जें बांधकाम, भावनांच्या ज्या विविध रचना, अनुभूतींच्या दाबानें आपोआप चालू होणारी जी कृतींची यंत्रसामुग्री त्यांच्या मनांत निर्माण झाली होती, ती सगळी हळुहळु मोडून तोडून कोलमडून








पडत होती. मनाच्या तळघराचें एकाच दिशेनें उघडणारें दार, ह्या मोडतोडीमुळें दोन्हीं दिशांना उघडूं लागलें होतें. निरनिराळ्या रसायनांचें योग्य मिश्रण करणारा कांपौंडर मूढ झाला होता. आणि जेवल्यानंतर काय करायचें तें न सुचल्यामुळें त्या तशाच ओल्या हातानें पानावर बसून राहूं लागल्या होत्या.

शक्य तों स्वतःवरचा काबू सोडायचा नाहीं, ह्या मूलभूत प्रवृत्तीमुळें त्या उठल्या आणि सुईदोरा घेऊन आल्या आणि मग सुईच्या नेढ्यांत दोरा खुपसण्याचा अयशस्वी प्रयत्न त्या पुन्हां पुन्हां करूं लागल्या. असें कितीतरी वेळ चाललें होतें. शेवटीं त्यांनां हंसायला यायला लागलें, मोठमोठ्यानें नव्हे, तर हळु, सावकाश, सतत!

दोरा--दोरा--पांढरा दोरा-- काळा दोरा-- नाक टोंचल्यावर त्यांत घातलेला काळा दोरा -पायाला चिकटणारी ओली दोऱ्याची गुंतावळ. ती ओली दोऱ्याची गुंतावळ त्यांनीं उचलून हातांत घेतली. तिचा लिबलिबित स्पर्श त्यांनां सारखा होत होता. त्या ती उलटी--सुलटी करीत होत्या. ती सोडव-ण्याचा प्रयत्न करीत होत्या. शेवटीं त्या स्वतःच त्या गुंतावळींत अडकल्या. आणि तें समजलें तेव्हां भेदरून जाऊन तिच्यांतून सुटण्याचा प्रयत्न करूं लागल्या. पण त्यांना कांहीं केलें तरीं सुटतां येईना. शेवटीं थकून त्या तशाच त्या गुंतावळींत अडकून राहिल्या. आणि उंदीर त्यांचें शरीर कुरतडून खाऊं लागले. तरीं त्यांना कांहीं करतां येईना. आणि कांहीं करावें असें वाटेही ना. त्या म्हणाल्या, 'लव-कर खाऊन टाका, बाबांनो, मला एकदां. म्हणजे सुटेन. खरोखरच सुटेन. पण इतकें सुख कोणाच्या नशीबीं असतेंय् !'

जाणत्या मनाच्या अधिकाराचा दिवा असा मधून मधून लागत होता आणि विझत होता. आणि अगदीं दाट धुकें मनांत सर्वत्र कोंडून राहिलें होतें. अशी दाट झांपड त्यानें डोळ्यांवर आणली होती कीं वाटत होतें, झोंपावें, झोंपून जावें. डोंगराची उशी करून समुद्राची चौघडी अंगावर घेऊन पापण्या मिटाव्या, त्या कधीं उघडूंच नयेत; मग आपल्या छातीवर, डोक्यावर झाडें उगवतील, आणि छोटा वसंत त्या झाडावरच्या चिंचा पाडून खाईल.

किती छान कल्पना होती! सातव्या वर्षी रागावून चिंचेच्या झाडाखालीं बसलेल्या असतांना आजींना ही कल्पना सुचली होती. आणि आतां तिला उकरून कोणी काढलें होतें? इतकी विलक्षण ताजी कशी राहिली होती ती?

काय? त्यानंतर कांहींच घडलें नव्हतें? आजी अजून सात वर्षांच्याच होत्या? अजून त्यांचें लग्न झालें नव्हतें? मुलें झालीं नव्हतीं? फक्त त्या हंसत बागडत गुंजेचा गोड पाला खात होत्या? पाटीवरचीं अक्षरें पुसून टाकावी, त्याप्रमाणें वर्षे पण पुसलीं गेलीं होतीं कीं काय? कीं पाखरांसारखीं ती भुर्रदिशीं उडून गेलीं होतीं?.........

दुरून कुठून तरी बँडचा आवाज ऐकायला येऊं लागला. जवळ, जवळ तो आला. त्या कर्कश आवाजाच्या ठोक्यांनीं डोकें अगदी लिबलिबित झालें. शेणासारखें! तो आवाज जसा दूर गेला तशी आजींना दुसरी एक लहानपणची आठवण झाली. त्यांच्या गांवांत दरवर्षी देवीपुढें एक बोकड कापीत असत. आणि कापण्यापूर्वी त्याच्या अंगावर हळदपिंजर घालून त्याला गांवभर वाजतगाजत मिरवीत असत. तेव्हां तो बटबटीत डोळ्यांचा बोकड कसा केविलवाणा दिसायचा? किती मूर्ख वाटायचा?

आजींना परत हंसायला येऊं लागलें. हळु, साव-काश, सतत! आणि ती बोकडाची मिरवणूक सारखी त्यांच्या डोक्यांतून वाजतगाजत जाऊं लागली. मिरवणुकींतल्या माणसांचे चेहेरे कोणी ते पुसून टाकले होते, त्यांचे पाय भुतांच्या पायांसारखे फेंगडे झाले होते आणि आजींच्या अंगावर हळदपिंजर टाकून ते त्यांना घेऊन चालले होते, किती लांबलांब चालले होते ते! आजींचे पाय दुखून आले, आणि तरी पण त्यांना मुकाट्यानें चालत रहावें लागत होतें.

शेवटीं त्या चिडून म्हणाल्या, "बोलेन मी बोलेन, तुम्ही कोण मला अडवणार? मी सिता-काकूंना सांगेन कीं माझी सून माझे हाल करते. मी समोरच्या वाण्याला सांगेन कीं तूं महागरा आहेस,








आम्हाला तुझे जिन्नस नकोत. आणि कुसुमच्या गायनमास्तरांना सांगेन कीं तुमची काळी पट्टी मी उपटून काढीन पेटींतून. बानचोद ! ''

शंकररावांच्या त्या शिवीनें आपलें काम बजावलें आर्जीनीं आपले विचार काबूंत आणले, आणि स्टँडचा पाय घट्ट हातांत पकडून ठेवला. लहानपणीं आई वारली तेव्हां त्या आपल्या आईचें एक लुगडें असेंच हातांत धरून झोंपीं जात असत.

तेवढ्यांत सुनबाईनें गरम चहा आर्जीच्या पुढें आणून ठेवला. थरथरत्या हातांनीं आणि लवलुवत्या ओठांनीं त्यांनीं तो चहा प्यायला. शुष्क झालेलें तोंड ओलें ओलें करीत, छातीचीं पिचलेलीं हाडें आंतून शेकून काढीत, चहा पोटांत गेला. आणि तिथून त्यानें साऱ्या शरीरभर उष्णतेच्या सुखदायक लहरी पाठविल्या. सायकलवरून जाणाऱ्या तारेच्या शिपायासारख्या. त्यांतली एक लहर आर्जीच्या मेंदूंत शिरली. तिनें सारें धुकें वितळून टाकलें. सारें बांधकाम परत सावरल्यासारखें झालें. आणि बसल्या बसल्या संध्याकाळची भाजी चिरून ठेवावी असा नेहमींचा साधासुधा विचार त्यांच्या मनांत आला.

तेवढ्यांत सूनबाई म्हणाली, " मी जरा खालीं जाऊन भाजी घेऊन येत्यें. तोंवर जरा बाळावर नजर ठेवा. ''

" त्याला घेऊन जायला काय होतें तुला ? माझ्या कपाळाशीं कशाला उगीच ती कटकट ? मी नाहीं सांभाळणार त्याला '' आजी चमत्कारिक हट्टीपणानें म्हणाल्या. त्या हट्टीपणाचा पीळ इतका विलक्षण होता कीं, त्यानें आर्जीचें सारें शरीर ताठलें. बोलतांना तोंडांतली थुंकी उडाली. आणि मग फुंकर मारतांच ज्योत विझावी तसा तो हट्टीपणा एकदम लुप्त झाला. मन रिकामें झालें; विचारक्रियेंत क्षणाची पोकळी निर्माण झाली. क्षणभर सारेंच सुन्न झालें.

सूनबाईनें काय म्हटलें, आणि आपल्यापुढें मुलाला ठेवून ती केव्हां गेली तें आर्जीच्या ध्यानांतही आलें नाहीं.

समोर बसलेला बाळ चिमटींत पेपरमिंटाची गोळी पकडण्याचा प्रचंड यत्न करीत होता. बोटें वळत होतीं. पण त्यांची चिमटी होत नव्हती. आणि चिमटी झाली तर ती वडीपासून दोन इंच अंतरावर जमिनीवर टेकत होती. एकदां तर बोटांच्या पकडींत वडी सांपडली देखील. पण बोटांवर बरोबर दाब देतां आला नाहीं. आणि वडी खालीं पडली. अशी सावकाश, कंटाळवाणेपणानें शरीराची आणि मनाची गुंफण होत होती. इंद्रियांच्या हालचालींवर ताबा मिळविण्याची धडपड चालली होती. पाळण्यांत असतांना नुसते वाटेल तसे हलणारे हातपाय कामाला जुंपले जात होते.

तेवढ्यांत बाळानें हात वर करून डोक्याला लावला आणि म्हटलें, ' बा '. आणि मग परत परत सारखी तीच क्रिया आणि तोच उच्चार तो करीत राहिला. कोणी तरी त्याला असें 'गुडबाय्' म्हणायला शिकवलें होतें. आणि त्या नव्या धड्याची ही पुन्हां पुन्हां घोकंपट्टी चालली होती. मनाचें बांधकाम सुरू झालें होतें. मनाच्या हालचालींत सूत्र ओंवलें जात होतें. एका व्यक्तिमत्त्वाचा पाया घातला जात होता.

तितक्यांत बाळाला एकदम आठवण झाली. जाणतेपणानें त्याला झालेली कदाचित् पहिलीच आठवण असेल. त्याची आई त्याच्याजवळ नव्हती. कांहींतरी कमी होतें. काय बरें कमी होतें ? मन बरेंच घोटाळलें, बुचकळ्यांत पडलें. अरे हो, त्याच्या तोंडांत स्तन देणारी, झटपट हालचाली करणारी, विचित्र आवाज करणारी एक रंगीबेरंगी वस्तु कुठें नाहींशी झाली होती ! आणि मग बाळ एकदम रडूं लागला. अगदीं मोठमोठ्यानें ! भूक लागल्यावर, थंडी वाजल्यावर जसा तो रडूं लागायचा तसा आतां आठवणीनें रडूं लागला.

ओक्साबोक्शीं रडणाऱ्या त्या मुलाकडे आजी तशाच कितीतरी वेळ मूढपणानें पहात राहिल्या. मनाच्या काय हालचाली चालल्या आहेत, त्या त्यांच्या त्यांनाच नीटशा समजत नव्हत्या. निरनिराळे तुटके तुटके पुसट विचार बुडबुड्यांसारखे वर येऊन फुटत होते. आणि धुकें, दाट आणि थंडगार धुकें सारें मन व्यापून राहिलें होतें.








एकदम दचकून त्या जाग्या झाल्या. आणि त्यांनीं थरथरत्या हातांनीं बोंड बाळाच्या तोंडांत दिलें. चुक्–चुक्–चुक्. चोखण्याची यांत्रिक क्रिया सुरू झाली. क्षुधातृप्तीच्या ब्रह्मानंदाचा सुखदायक भास झाला. उघडे डोळे कांहीं पाहिनासे झाले. बाळ कलंडला आणि झोपीं गेला. झोपेच्या गुहेंत खोल शिरला. मनाला थकविणारी जाणीव, संवेदना, सारें पुसलें गेलें. आणि विश्रांतीचें लांबलचक कार्य सुरू झालें.

आजींना वाटत होतें कीं, आपणहि असेंच कलंडून गाढ झोपीं जाऊं. ह्याची त्यांना पुसटशी भीति वाटली. पण होणार होतें तें इतकें सहज आणि निसर्गक्रमानें होणार होतें कीं कुठें कांहीं खटकतें आहे, अशी टोंचणी त्यांच्या मनाला वाटत नव्हती.

तितक्यांत वसंत शाळेंतून आला. तो आजींचा खांदा हलवून मोठमोठ्यानें म्हणाला, "आजी, मी पहा शर्टाचें वरचें बटन उघडें ठेवलें आहे. आहे कीं नाहीं आमची ऐटी आणि चैटी. अलिकडे असली फॅशन आहे हो. लोक फॅशन करतात म्हणून आम्हीं पण फॅशन करतों. परांजपेंची एवढी मिजास नकोयू. काय समजलाय्?" आणि वरचें बटन उघडें ठेवल्यामुळें उघडी पडलेली छाती फुगवून तो जोरजोरांत बाहेर गेला.

त्याच्या मनानें कांहीं एक नवा प्रदेश हस्तगत केला होता. ऐटी मिरविण्याची आवश्यकता त्याला आज पहिल्यानेंच पटली होती. आणि ती इच्छा व्यक्त करण्याचा एक सोपा मार्गही त्याला सांपडला होता. आणि हळुहळु परिस्थितीच्या टक्क्याटोणप्या-नुरूप, मनाच्या मूलभूत प्रेरणांनुरूप त्या इच्छेचा कमी अधिक विस्तार होणार होता. वसंतच्या, नव्हे वसंतरावांच्या व्यक्तिमत्त्वांतलें, त्यांच्या मनाच्या रचनेंतलें, त्या इच्छेचें स्थान निश्चित होणार होतें.

आणि त्याच वेळेला अनेक मानवी मनांची रचना सारखी चालू होती. कुठल्या कॉलेजमधल्या तरुणीला हंसण्याची एक नवीन लकब सांपडली होती. बायको कांहीं गंभीरपणानें सांगू लागली म्हणजे तें उडवून कसें लावायचें तें एक व्यसनी मनुष्य शिकत होता. आणि त्याच वेळेला त्याच्या मनांतल्या स्वाभिमानाच्या कल्पना कोलमडून पडत होत्या. उसन्या उत्साहानें वागण्याची संवय करुन घेतलेला मनुष्य खरोखरच उत्साही होत होता. स्वतःला प्रामाणिक समजणारा आणि त्याप्रमाणें वागणारा मनुष्य छिद्रान्वेषी आणि कडवट वृत्तीचा झाला होता. आणि म्हातारे होत चाललेले एक गृहस्थ मनांतल्या भीतीच्या वावटळींना बळी पडण्याइतके परत कमकुवत झाले होते.

इकडे आजींचें मन मात्र पडक्या घरासारखें झालें होतें. आणि धुकें सर्वत्र कोंडून राहिलें होतें. संध्याकाळ झाली. तें त्यांना समजलेंच नाहीं. शेवटीं सूनबाई जेव्हां काहीं तरी मोठ्यानें म्हणाली, तेव्हां त्या भानावर आल्या. त्यांनीं पाहिलें तों इलेक्ट्रिकच्या दिव्यांचा झगझगाट झाला होता. आणि जेवणाची वर्दळ घरांत चालू झाली होती. आजींना आश्चर्य वाटलें. मधला तास दोन तास कसा निसटला होता? कुठें गेला होता?

आजींच्या मुलाचें मन त्यांची अवस्था पाहून कळवळलें. तो त्यांच्याजवळ येऊन बसला आणि म्हणाला, "आई, तुला बरें का नाहीं वाटत आहे? कांहीं हवें आहे का तुला?" आजींना वाटलें कीं आतां आपण खूप कांहीं तरी बोलणार. पण त्या निःशक्तपणानें म्हणाल्या, "कांहीं नाहीं, कांहीं नाहीं." आणि त्यांनीं आपल्या मुलाच्या शर्टाची बाही पकडून ठेवली.

मुलाचा जीव अगदीं कलवळून गेला. त्यानें बायकोला कपभर कडकडीत दूध आणायला सांगितलें, आणि तें आजींच्या तोंडाला लावलें. सावकाश एक एक घुटका घेत तें आजींनीं प्यायलें. मुलगा म्हणाला, "आणखी हवें आहे का?"

आजी मान हलवून म्हणाल्या, "नको नको". त्या कपभर दुधानेंच आपल्या पोटांत कोणी शिशाचा गोळा ठेवला आहे असें त्यांना वाटत होतें.

पण त्या गरम पेयानें त्यांच्या छातीचीं हाडें शेकून निघालीं, अंगांतून उष्णतेचा प्रवाह धावला.








आणि डोक्यातलें धुकें पार निघून गेलें. सारें अगदीं स्पष्ट दिसूं लागलें. आवाज मोकळा झाला आणि त्या मुलाला म्हणाल्या, " आतां की नाहीं थोडा वेळ बैस तूं माझ्याजवळ. " त्याच्या पाठीवरुन त्यांनीं दुबळा हात दोनदां फिरवला. आणि मग त्यांच्या नाकाडोळ्यांतून पाणी गळूं लागलें.

मुलगा म्हणाला, " आई, आई, असें काय करत्येस ? डॉक्टरला बोलावूं का मी ? "

आजींनीं दुबळ्या हातांनीं नाकडोळे पुसले. आणि त्या हंसून म्हणाल्या, " अरे वेड्या, डॉक्टर काय करणार आहे येथें ? आतां फार मोठा वैद्य मला तपासणार आहे आणि औषध देणार आहे."

त्यांच्या मुलानें त्यांना अंथरुणावर नेऊन झोंपवलें. मग त्या म्हणाल्या, " हें पहा, फार काम करत जाऊं नकोस. तुझ्या प्रकृतीला दगदग, जागरणें झेपत नाहींत. अरे पैसा काय, नाहीं मिळाला तरी चालेल. मीं नाहीं कां कित्येक वर्षें पंधरा रुपयांत संसार केला ? सूनबाई, तूं शहाणी आहेस. ह्याला संभाळ आणि ह्यांचें श्राद्ध नीट करीत जा. ह्यांची कधीं आठवण येते कां रे तुला ? ' गुलामा ' असें म्हणून तुझे कसे खूप पापे घ्यायचे लहानपणीं. वसंत आणि बाळ कुठें गेले ? फिरायला ? कां पाठवलें त्यांना फिरायला ? बरें, माझ्या ट्रंकेंत पन्नास रुपये सांठवलेले आहेत. त्यांचीं त्या दोघांना मुंजींत चांदीचीं भांडीं कर. माझें नांव घाल त्या भांड्यांवर. दारावर भिकारी येतात त्यांच्यावर लक्ष ठेवीत जा, सूनबाई. चोरटे असतात ते. तूं माझें खूप केलेंस. आणि हें पहा बाबू, तूं माझ्याजवळ ये—जवळ ये—अं-अं. मला तुझा मुका घ्यायचा आहे ......"

बाबूराव एखाद्या बाईसारखे हंबरडा फोडून रडूं लागले. सूनबाईनें तोंड फिरविलें.

आजींनीं परत बाबूरावांच्या तोंडावरुन हात फिरविला. त्यांना खूप खूप बोलायचें होतें. आपल्या जीविताचा सारा इतिहास त्यांना आठवत होता. डोळ्यांसमोर स्वच्छ दिसत होता.

लहानपणींच आई मेल्यावर तिच्या ज्या लुगड्याला चिकटून त्या झोंपीं जात असत, तें लुगडें त्यांना स्पष्ट दिसत होतें. खेळतांना डोक्याला खोंक पडली होती तेव्हां झालेल्या वेदना, मावशीच्या घरीं दिवसभर राबल्यावर आणि बोलणीं खाल्ल्यावर रात्रीं अंथरुणांत येणारे दुःखाचे कढ, लग्नांत डोळ्यांत गेलेला धूर, पंधरा रुपयांत थाटलेला टुमदार संसार, शंकररावांचें आणि त्यांचें पहिलें भांडण, त्या भांडणांत शंकररावांनीं अंगावर भिरकावलेलें फुलपात्र, पहिली वटपौर्णिमा, तान्हेपणीं गेलेलीं दोन सोन्यासारखीं मुलें आणि शंकररावांनीं पाठीवर हात फिरवून केलेलें त्यांचें सांत्वन, बाबूची थाटाची मुंज, त्याची जरीची टोपी, लग्न झाल्यानंतर त्याच्या वागणुकींत आलेला तिरसटपणा, आणि आजारी पडतांच आईला सारखें उशाशीं बसवून ठेवण्याचा त्याचा पोरकटपणा, शंकररावांचा मृत्यु..........

खूप खूप, सगळें आठवत होतें आणि बोलावेंसें वाटत होतें. पण हें सारें बोलायचें तरी कसें ? त्यांना विलक्षण थकवा आला होता. त्यांच्या नाका-तोंडांतून परत पाणी ओघळलें आणि त्यांनीं तोंड भिंतीकडे फिरविलें. बाबूराव त्यांना थोपटीत बसले होते. आणि त्या थोपटण्याच्या गुंगींतच आजींना झोप लागली.

तें पाहून बाबूराव हलक्या स्वरांत बायकोला म्हणाले, " चांगली झोंप लागली आहे ग आईला. मला वाटतं ती उगीच घाबरली होती. "

बायको म्हणाली, " तसें कांहीं होत नाहीं आहे त्यानां. फक्त अशक्तपणा फार आलाय्. "

हलक्या मनानें गाणें गुणगुणत बाबूराव बाहेर गेले. मग रात्र झाली. सारें सामसूम झालें. मध्येंच आजींना जाग आली. कोणीतरी त्यांच्या बरगड्या आंवळल्या होत्या, आणि घसा दाबला होता. त्यांचे पाय बधिर झाले होते. आंतडीं एकदम ढिलीं पडलीं होतीं. त्यांनीं डोळे उघडण्याचा प्रयत्न केला. " बाबू " म्हणून अस्फुट हांक मारली.

आणि मग डोंगराची उशी करून व समुद्राची चौघडी पांघरायला घेऊन त्या गाढ झोंपीं गेल्या.








# बहुभाषी बहुधर्मी खंडराष्ट्र

आचार्य शं. द. जावडेकर

हिंदुस्थान[1] हें एक–राष्ट्र आहे किंवा तो एक राष्ट्रसमूह अथवा राष्ट्रसंघ आहे हा वाद आपल्या देशांत अनेक वर्षें अनेक रूपांनीं चालू आहे. मुस्लीमलीगनें द्विराष्ट्रवादाची उपपत्ति पुढें मांडून हिंदुस्थानांत हिंदु व मुसलमान अशीं दोन राष्ट्रें नांदत आहेत असा अविवेकी प्रचार अत्याचारी मार्गानें केला. ब्रिटिश सत्ताधाऱ्यांना हा वाद फायदेशीर वाटल्यामुळें त्यानीं तो आपल्या येथून जाण्याच्या क्षणापर्यंत एकसारखा पेटूं दिला. समाजांत निर्माण होणारे वाद सारखे धुमसत न ठेवतां त्यांचा न्यायनिवाडा अधिकृत सत्तेनें तावडतोब देऊन त्या निवाड्याची अंमलबजावणी त्वरित केली पाहिजे. जी सत्ता ही अंमलबजावणी करीत नाहीं अथवा समाजांत माजलेल्या वादाचा न्यायनिवाडा देण्याचेंहि कर्तव्य पार पाडीत नाहीं, ती सत्ता समाजावर राज्य करण्यास नालायक आहे, असें समजून जनतेनें तिला उलथून पाडलें पाहिजे. परंतु ज्या सत्तेला एकाद्या समाजावर राज्य करण्याचा कोणताही नैतिक हक्क उरलेला नसतो आणि तिच्या प्रजेला तिला उलथून पाडण्याची ताकद नसते अशा काळांत, ती सत्ता, समाजानें आपल्या विरुद्ध बंड करून उठूं नये अथवा असे बंडाचे प्रयत्न जे करतील त्यांच्या मागें जाणारी समाजाची संघटना बनूं नये, असे प्रयत्न करीत असते. ब्रिटिश लोकांना जोंपर्यंत हिंदुस्थानांत आधुनिक राष्ट्रीय भावना निर्माण होऊन त्रास देऊं लागली नव्हती तोंपर्यंत हिंदुस्थानास आधुनिक राष्ट्रवाद शिकविण्यासाठींच आम्हीं या देशांत आलों आणि हें आधुनिक राष्ट्रीयत्व निर्माण झाल्यानंतर आम्ही या देशांतून चालते होऊं, असें येथील ब्रिटिश राज्यकर्ते म्हणत असत. अर्थात् आपला देश स्वतंत्र करण्यासाठीं झटणारे लोक या देशांतील अनेक भाषा बोलणाऱ्या अनेक धर्मांच्या व अनेक जातींच्या लोकांत एकराष्ट्रीयत्व निर्माण करण्याचा झटून प्रयत्न करीत होते.

## ब्रिटिशांचें पालटलेलें धोरण

हे प्रयत्न सफल होऊन राष्ट्रसभेचा प्रभाव सर्व प्रांतांतील व सर्व धर्मांतील लोकांवर पडूं लागल्याचें पहातांच ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं मुसलमान लोकांना, ब्राह्मणेतर जातींना राष्ट्रसभेंतून दूर ठेवण्यासाठीं अनेक कारस्थानें रचण्यास सुरवात केली. १९०९ सालीं मुसलमानांना विभक्त मतदारसंघ देण्यांत

[1] या लेखांत श्री. बेडेकर यांच्या 'संयुक्त महाराष्ट्र' या पुस्तकांतील फक्त एका सिद्धांताची चर्चा करण्यांत आली आहे. हा लेख म्हणजे त्या पुस्तकावरील अभिप्राय असें कोणी समजूं नये. त्यांचें एकंदर पुस्तक मला बरेंच आवडलें. त्यांतील विवेचन सूक्ष्म, तत्त्वदर्शी आणि संशोधनपूर्व केलेलें असें आहे. त्या संबंधीचा माझा अभिप्राय मी पुनः एखादे वेळीं सवडीप्रमाणें प्रसिद्ध करणार आहे. या लेखांत चर्चिलेल्या त्यांच्या 'हिंदुस्थान हें बहुराष्ट्री संघराज्य बनावें' या सिद्धांताचा संबंध प्रचलित एका चळवळीशीं येत असल्यानें व त्या चळवळीस हा सिद्धांत आधारभूत धरला गेल्यास अनेक घोटाळे निर्माण होण्याचा धोका असल्यानें मी हा स्वतंत्र लेख लिहिला आहे. —शं. द. जा.








आले. १९१९ सालीं ब्राह्मणेतर पक्षाला राष्ट्रसभे-विरुद्ध लढण्यास प्रोत्साहन देण्यांत आलें व १९३३ सालीं हरिजनांनाहि विभक्त मतदारसंघ देऊं करून त्यांच्यांतहि एक स्वतंत्र राष्ट्रीयत्व निर्माण करण्याचें कपटकारस्थान रचण्यांत आलें होतें. पण महात्मा गांधींच्या सत्याग्रहाच्या चळवळीमुळें ब्राह्मणेतर पक्ष राष्ट्रीय बनला आणि त्यांनीं १९३३ सालीं येरवडा तुरुंगांत उपोषण करण्याची प्रतिज्ञा करून हरिजनांना देऊं केलेले विभक्त मतदारसंघ रद्द करावयास लावले. अशा प्रकारें ब्राह्मणेतर हिंदु जनता आणि हरिजन यांच्यांत राष्ट्रीय भावना निर्माण केली. तसाच एक मुसलमान समाजांतही मोठा राष्ट्रीय पक्ष महात्मा गांधींनीं निर्माण केला. परंतु विभक्त मतदारसंघाच्या कायद्यामुळें या राष्ट्रीय पक्षाला अराष्ट्रीय मुस्लिम लीगपक्षाचा निवडणुकींत पाडाव करतां आला नाहीं. यामुळें ज्या विभागांत मुसलमान जनता बहुसंख्य आहे, त्या विभागांत पाकिस्तान नांवाचें एक स्वतंत्र राज्य स्थापन करण्यास मुस्लिम लीगला संधि मिळाली.

अशा प्रकारें हिन्दुस्थानांत हिन्दी-संघराज्य व पाकिस्तान अशीं दोन सार्वभौम राज्यें आज निर्माण झालीं आहेत. यांपैकीं कोणतेंहि राज्य कायदेशीर दृष्टीनें धर्मवार राष्ट्रभावनेच्या तत्त्वानुसार स्थापण्यांत आलें नसून तीं दोन्हींहि प्रादेशिक स्वयंनिर्णयाच्या व लोकशाही–राष्ट्राच्या तत्त्वावरच स्थापन करण्यांत येत आहेत, असें मुस्लिम लीगनेंहि मान्य केलें. याच वेळीं वस्तुतः लीगचा द्विराष्ट्रवाद नष्ट झाला. असें असलें तरी मुस्लिम लीग पाकिस्तानांत वाटेल तो गोंधळ घालीत आहे. त्यांत पाकिस्तान हें मुसलमानांचेंच राज्य आहे, असाही अत्याचारी प्रचार अनेक लोक करीत आहेत. तथापि तेथील सरकारला ही भूमिका अधिकृत रीतीनें घेतां येत नाहीं आणि त्यामुळें राज्यांत माजणाऱ्या गोंधळाचीं फळें तेथील सरकारासही भोगावीं लागतील. हिंदी संघराज्यांत जे मुसलमान आहेत ते भराभर मुस्लिम लीग संस्था सोडून एक-राष्ट्रवाद स्वीकारीत आहेत. यामुळें हिंदी संघराज्य हें आतां एकराष्ट्रीयत्वाच्या खंबीर पायावर उभारलें जाण्यास कोणताहि अडथळा उरलेला नाहीं. नव्या भारताचें स्वरूप अनेक धर्मांचे लोक आणि अनेक भाषा बोलणारे लोक ज्यांत समाविष्ट झालेले आहेत, असें भरतखंड हें एक नवीनच आधुनिक राष्ट्र निर्माण होत आहे. युरोपखंडांतील एकभाषी व प्रायः एक-धर्मी राष्ट्राशीं या खंड–राष्ट्राची तुलना होऊं शकत नाहीं आणि म्हणूनच धर्मवार राष्ट्रभेदाचा वाद एकीकडे मिटूं लागला असतांना भाषावार राष्ट्रीयत्व असलें पाहिजे आणि त्या दृष्टीनें भरतखंड हें एक राष्ट्र नसून तो एक बहुराष्ट्रसंघ आहे असें मत कांहीं लोक प्रतिपादूं लागले आहेत. उदाहरणार्थ, महाराष्ट्र, कर्नाटक, आंध्र, गुजराथ, बंगाल, पंजाब, बिहार हे केवळ प्रांत नसून राष्ट्रेंच आहेत व हिन्दी संघराज्य हा सर्व राष्ट्रांचा एक संघ आहे असें हें मत आहे. या मतास आधुनिक युरोपांत निर्माण झालेल्या एकभाषी देश-राष्ट्रांचा दाखला म्हणून आधार घेण्यांत येत असतो. तसेंच रशियाच्या राज्यघटनेचाहि आधार घेऊन रशियाचें सोव्हिएट संघराज्य जसें अनेक राष्ट्रांच्या संघाचें बनलेलें आहे, तसेंच हिन्दी राष्ट्र हें अनेक भाषावार राष्ट्रांचें एक सहकारी संघराज्य मानावें व बनवावें अशी ही विचारसरणि आहे. श्री. दि. के. बेडेकर यांनीं नुकतेंच " संयुक्त महाराष्ट्र " नांवाचें पुस्तक लिहून प्रसिद्ध केलें आहे. त्यांत ही भूमिका स्वीकारली असून त्या पुस्तकाचा पुरस्कार करतांना श्री. शंकरराव देव यांनीं " भारत हा एक बहुराष्ट्र देश आहे व भारताचें राज्य हें अनेक राष्ट्रांचें एक संघराज्य आहे, अगर होणें जरूर आहे, हा आपला मुद्दा संयुक्त महाराष्ट्राचा पाया मजबूत करण्याला पोषक आहे " असें म्हटलें आहे. मला ही विचारसरणि तत्त्वतः व मूलतःच पसंत नाहीं. म्हणून या संबंधींचें माझें मत मी थोडक्यांत या लेखांत महाराष्ट्रापुढें मांडीत आहे.

## राष्ट्रभावनेची वाढती व्याप्ति

राष्ट्रभावना ही इतिहासांत अधिकाधिक व्यापक क्षेत्रास लाभलेली आपणांस आढळून येईल. अगदीं प्राचीन काळीं युरोपांत हेलेनिक लोकांनीं ग्रीस देशांत नगर–राष्ट्रें निर्माण केलीं. यांची व्याप्ति एका शहरापुरती व त्याच्या आसपासच्या लहानशा








वाड्या यांपुरती होती. आपल्या हिंदुस्थानांतहि फार प्राचीनकाळीं अगदीं छोटीं म्हणजे अलिकडच्या तालुक्यायेवढीं राष्ट्रें असल्याचें इतिहासांत आढळून येतें. हळूहळू या छोट्या राष्ट्रीय राज्यांना आपलें रक्षण करणें अशक्य होऊन आपल्या देशांत मोठ-मोठीं राज्यें व साम्राज्यें अस्तित्वांत आलीं. असाच प्रकार युरोपांतही घडून आला. आणि छोटीं राष्ट्रीय राज्यें मोठ्या राज्यांत व साम्राज्यांत विलीन झालीं. या मोठ्या राज्यांच्या व साम्राज्यांच्या कालांत हळूहळू लोकांची रुत्ता आणि लोकांतील राष्ट्रभावना अथवा राजकीय आपुलकी हा राज्यसंस्थेचा आधार नष्ट झाला आणि अनियंत्रित-राजसत्ताक अनेक राज्यें अस्तित्वांत येऊं लागलीं. हीं अनियंत्रित-राजसत्ताक राज्यें एकमेकांत भांडून एकसारखी अशांतता माजवूं लागलीं. तेव्हां या अनियंत्रित राजांना पायबंद घालणाऱ्या एखाद्या संस्थेची आवश्यकता समाजाला भासूं लागली. समाजाची गरज कांहीं अंशीं सार्वभौम राजे किंवा सम्राट् भागवीत असत, आणि अनियन्त्रित राजांना आपले मांडलिक बनवून त्यांच्यांत सतत चालूं असणारीं युद्धें कांहीं काळ थांबवीत. त्यामुळें बऱ्याच मोठ्या प्रदेशांवर, अंदाधुंदी बंद पडून, शांतता नांदूं लागे. यासाठीं आपल्या देशांत म्हणजे भरतखंडांत एखादी सार्वभौम सत्ता असावी, हें ध्येय लोकप्रिय होऊं लागलें. युरोपखंडांतहि प्राचीनकाळीं रोमन साम्राज्य व मध्ययुगांत पवित्र रोमन-साम्राज्य या संस्थांनीं अशासारखें कार्य केलेलें आहे. युरोपांतील सर्व राज्यें प्रायः खिस्तधर्मी असल्यामुळें त्या धर्मसंस्थेनें पवित्र रोमनसाम्राज्य या मध्ययुगीन युरोपीय संस्थेच्या साहाय्यानें मध्ययुगांत राजांना नियंत्रित करण्याचें व युद्धें थांबविण्याचें कार्य थोड्याबहुत प्रमाणांत केलें. या काळांत इंग्लंड, फ्रान्स, स्पेन, इटली, जर्मनी इत्यादि आधुनिक युरोपीय राज्यांचें ध्येय कोणासही मान्य नव्हतें किंबहुना तें कोणासहि सुचलें नव्हतें. खिस्ती धर्मसंस्था हिंदु धर्मसंस्थेहून अधिक संघटित व राजकीय दृष्टीनें अधिक प्रभावी असल्यामुळें तिच्या हातून इतिहासांत जसें महत्त्वाचें कार्य घडलेलें आहे तसें हिंदु धर्मसंस्थेच्या हातून घडलेलें दिसत नाहीं. पुढें सोळाव्या शतकापासून युरोपांत भ्रष्ट बनलेल्या खिस्ती धर्मसंस्थेविरुद्ध व पवित्र रोमन साम्राज्याविरुद्ध बंडाची प्रवृत्ति वाढली. या बंडांत ब्रिटन व फ्रान्स हीं आधुनिक राष्ट्रें संघटित स्वरूपांत उदयास आलीं व त्यांतच आधुनिक राष्ट्रभावना प्रथमच निर्माण झाली. ही भावना ब्रिटन व फ्रान्स या देशांत प्रथमतः लोकशाहीशीं निगडित होती. आणि एकभाषी देश हें तिचें अधिष्ठान होतें. फ्रेंच राज्यक्रांतीनंतर नेपोलियननें स्पेनपासून रशियापर्यंत पसरलेलीं सर्व जुनाट सरंजामशाही राज्यें पादाक्रांत केलीं. आणि तो स्वतः युरोपचा सम्राट् बनून हिंदुस्थान सुद्धां ब्रिटिशांच्या हातून हिरावून घ्यावा आणि सर्व जगांत एकच सार्वभौम साम्राज्य स्थापन करावें अशी महत्त्वाकांक्षा धरून होता. या वेळेपासून राष्ट्रवादाला साम्राज्यशाही स्वरूप प्राप्त झालें. फ्रेंच राज्यक्रांतीच्या काळांत ब्रिटनमध्यें औद्योगिक क्रांति झाली आणि तिच्याच जोरावर ब्रिटननें नेपोलियनविरुद्ध अखेरपर्यंत तग धरला आणि अखेरीस त्याचा पाडाव केला.

## साम्राज्यवादी भांडवलशाही राज्यें

एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभापासून अखेरपर्यंत युरोपांत अनेक एकभाषी देशराष्ट्रें निर्माण झालीं, आणि भांडवलशाहीचा आधार घेऊन आपापलीं साम्राज्यें जगांतील मागासलेल्या खंडांत निर्माण करूं लागलीं. भांडवलशाही उत्पादनपद्धतीचा विचार केल्यास त्यांना ब्रिटिश व फ्रेंच लोकांप्रमाणें प्रत्येकास एक एक साम्राज्य असावें असें कां वाटूं लागलें, त्याचा उलगडा होतो. अशाप्रकारें विसाव्या शतकाच्या प्रारंभापर्यंत युरोपांतील एकभाषी देश-राष्ट्रांनीं आपल्या साम्राज्यांनीं सर्व जग व्यापून टाकलें आणि आतां एकमेकांविरुद्ध प्रचंड युद्धें केल्याखेरीज आपल्या साम्राज्याचा विस्तार होऊं शकत नाहीं असा त्यांना पदोपदीं अनुभव येऊं लागला. या काळपर्यंत ब्रिटिश व फ्रेंच राष्ट्रांत उदय पावलेली लोकशाहीची भावना भांडवलशाहीनें पचवून टाकून विकृत बनविली होती. या विकृत बनलेल्या भांडवल-प्रधान लोकशाहीचें व राष्ट्रीयत्वाचें अनुकरण करून आमचा उद्धार आपण करावा असा विचार आम्ही








१८८५ नंतर करूं लागलों. परंतु एकोणिसाव्या शतकाच्या आरंभापासून जर्मनीमध्यें एक नवा वेदान्त निर्माण झाला. आणि या वेदांताचें पर्यवसान हळुहळु लोकशाहीविरोधी साम्राज्यवादी राष्ट्रभक्तींत होऊं लागलें. हा धोका ओळखून कार्लमार्क्सनें त्या वेदांताचा त्याग करुन आपलें समाजवादी तत्त्वज्ञान जगापुढें मांडलें. आम्हीं जर खरे वेदांती असतों तर आम्हांस कार्लमार्क्सच्या समाजवादाचें स्वागत व अभिनंदन करावें असें त्याचवेळीं वाटलें असतें. स्वामी विवेकानंद, स्वामी रामतीर्थ किंवा आजचे महात्मा गांधी यांच्यासारखे खऱ्या वेदांती वृत्तीचे लोक समाजवादाचें स्वागत करतात. महाराष्ट्रांतहि एकोणिसाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास होऊन गेलेले विष्णुबुवा ब्रह्मचारी यांनीं वेदांती दृष्टीनें अनेक समाजवादी तत्त्वांचा अथवा ध्येयांचा पुरस्कार केल्याचें आढळतें. परंतु आमचे बहुतेक विद्वान् जर्मनींतील विकृत आणि प्रतिगामी वेदांताला भुलून गेले होते. आमच्या पूर्वजांची भरमसाट स्तुति करणाऱ्या या जर्मन आधुनिक वेदांत्यांचें त्यांना फार महत्त्व वाटूं लागलें. ब्रिटिशांच्या द्वेषामुळें आमच्या-- पैकीं कांहींना जर्मनांचा हा वेदांती राष्ट्रवाद अधिक प्रिय वाटूं लागला आणि ब्रिटिश, फ्रेंच व अमेरिकन राष्ट्रांतहि ज्या मानानें साम्राज्यवादी आकांक्षा व भांडवलवादी लोकशाही यांची वाढ होऊं लागली, त्या मानानें जर्मन वेदांत पसरूं लागला. मग ब्रिटिशांची गुलामगिरी पत्करलेल्या आमच्या विद्वानांत जर्मन वेदांताची प्रतिष्ठा वाढावी यांत नवल काय? अशा रीतीनें १९१४ सालचें अँग्लो- जर्मन महायुद्ध सुरू होईपर्यंतच्या काळांत आमचे कांहीं विद्वान् देशभक्त जर्मनींतील तत्त्वज्ञानाचे इतके भक्त बनले कीं त्याच जर्मनींत वेदांतांतील अध्यात्माचें पूर्णपणें खंडन करणारा परंतु आमच्या चातुर्वर्ण्यसंस्थेचें आधुनिक शास्त्रीय दृष्टीनें समर्थन करणारा नीत्शे नांवाचा जो एक विख्यात पंडित निर्माण झाला, त्याचे ते भक्त बनले. कारण आमचें खरें प्रेम वेदांतांतील अध्यात्मावर नसून तें वस्तुतः आमच्या हाडीं-मासीं खिळलेली व आम्हांस शेंकडो वर्षें गुलामगिरींत ठेवणारी जी विषमतामूलक जातिसंस्था तिच्यावरच होतें. या जातिसंस्थेलाच आम्हीं चातुर्वर्ण्य समजत होतों. मग त्या चातुर्वर्ण्याचें समर्थन करणारा एक आधुनिक पंडित जर्मनींत उदयास आल्याचें पाहून आम्हास हर्ष कां होऊं नये? अशा रीतीनें जर्मनीप्रमाणें आमच्या राष्ट्रीय भावनेसहि एक साम्राज्यवादी स्वरूप येऊं लागलें आणि भरतखंडांतील आधुनिक राष्ट्रवादांत ज्यांनीं आघाडीचें काम केलें, त्या आमच्या महाराष्ट्रांत नीत्शेच्या भक्तमंडळाचा प्रथम फैलाव झाल्यास त्यांतहि आश्चर्यकारक असें कांहीं नव्हतें. कै. इतिहासाचार्य राजवाडे यांच्या मनावर नीत्शेच्या तत्त्वज्ञानाची केवढी छाप बसलेली होती, हें त्यांच्या परिचितांस आणि अभ्यासकांस माहीत आहे व असावें. हें माहीत नसल्यास त्यांच्या विद्वत्तेच्या प्रकाशानें दृष्टि दिपून जाऊन आपण नकळत महाराष्ट्राला स्वतंत्र राष्ट्र बनवून त्याचें साम्राज्य भरतखंडांतील इतर भागांवर करण्याच्या प्रवृत्तीसही बळी पडूं अथवा आपणांस आज अव्यवहार्य व हास्यास्पद वाटणारी ही प्रवृत्ति ज्यांच्या अंतःकरणांत उदय पावत आहे, त्यांच्या जाळ्यांतहि आम्ही अडकूं शकूं. आधुनिक महाराष्ट्रांतील या विचारप्रवृत्तीचें विवेचन पुढील परिच्छेदांत थोडें अधिक करणार आहे. येथें युरोपांतील जर्मन राष्ट्रवादाला उघड लोकशाहीविरोधी व साम्राज्यशाही स्वरूप कसें प्राप्त होत गेलें व त्याचे परिणाम आमच्या विचारापर्यंत कसे पोहोंचत गेले, तेवढा धागा दाखविला. युरोपखंडांत सतराव्या शतकापासून एकोणिसाव्या शतकापर्यंत जी एकभाषी देशराष्ट्रें निर्माण झालीं, त्यांना भांडवलशाहीनें साम्राज्यवादी बनविलें आणि त्यांना विसाव्या शतकांत एकमेकांशीं लढून जागतिक महायुद्धें निर्माण करण्यावांचून आपल्या साम्राज्यवृद्धीचा दुसरा मार्ग उरला नाहीं, हें दाखविलें. हीं भांडवलप्रधान देशराष्ट्रें हिंदुस्थान, चीन व रशिया यांसारख्या प्रचंड राष्ट्रांच्या मानानें अगदीं छोटीं असलीं, तरी त्यांनीं आफ्रिका, आशिया, अमेरिका व आस्ट्रेलिया या खंडांत प्रचंड साम्राज्यें स्थापन केलीं होतीं. भांडवलशाहीच्या आधारानें त्यांची संपत्तिमत्ता पराकोटीस पोहोंचली होती. त्या मानानें हिंदुस्थान--चीनसारखे प्रचंड देश दीन, दुबळे आणि दरिद्री बनले होते. वस्तुतः भौतिक विद्या आणि यंत्रकला यांची वाढ होऊन मनुष्याचें उत्पादन--








## बहुभाषी बहुधर्मी खंडराष्ट्र

सामर्थ्य व दळणवळणांचीं साधनें इतकीं वाढलीं असतां युरोपांतील छोट्या राष्ट्रांचा काळ आतां संपून गेला होता. सर्व युरोपखंडाचें एक संयुक्तराष्ट्र बनवून एक सुसंस्कृत स्वयंपूर्ण खंडराष्ट्र त्यांना स्थापन करतां आलें असतें; लोकशाहीचा विकास करून तिला समाजवादी स्वरूप देता आलें असतें आणि इतर खंडांतील लोकांनाही अशीं खंडराष्ट्रें निर्माण करून जगांत शांततेचें युग स्थापन करण्याचा मार्ग इतरांना दाखवून देतां आला असता. परंतु भांडवलशाहीनें पछाडलेल्या या राष्ट्रांकडून अशी अपेक्षा करणें म्हणजे बाभळीच्या झाडास कलमी आंब्यांचीं फळें लागावींत अशी अपेक्षा करण्या-सारखेंच आहे. त्यांनीं हा जगत्-शांतीचा मार्ग सोडून दिला आणि १९१४ पासून जगद्विध्वंसाचा मार्ग अनुसरून एका पिढींत दोन महायुद्धें घडवून आणलीं आणि तिसऱ्याची तयारी सुरू ठेवली आहे. पण दुसऱ्या जागतिक महायुद्धांत युरोपखंडांतील बहुतेक सर्व एकभाषी सुसंस्कृत गणलेलीं देशराष्ट्रें भरडलीं गेलीं असून उरलेल्यांचीहि गति तीच होणार आहे. तिसऱ्या महायुद्धाच्या वेळीं जात्यांत घातलेले धान्याचे दाणे भरडून निघतात त्याप्रमाणें रशिया आणि अमेरिका या दोन प्रचंड शक्तींच्या चक्कींत हीं युरोपांतलि छोटीं राष्ट्रें पूर्णपणें चुरडून जाण्याचा संभव आहे. पहिल्या महायुद्धानंतर राष्ट्रसंघ नांवाची एक संरक्षक संस्था स्थापून, लोकशाहीच्या आधारा-वर परंतु भांडवलशाही व साम्राज्यशाही यांचा या राष्ट्रांना चिरंजीव करण्याचा प्रयत्न ब्रिटिश व फ्रेंच मुत्सद्यांनीं केला. हिटलर व मुसोलिनी यांनीं ब्रिटिश, फ्रेंच साम्राज्यवाद्यांचा हा ढोंगी प्रयत्न उलथून पाडला आणि त्यानंतर आपापल्या राष्ट्रासह ते निजधामास गेले. या सर्व इतिहासावरून एकभाषी देशराष्ट्राचा काळ संपून आतां बहुभाषी खंडराष्ट्रांचा काळ आलेला आहे असा बोध आपण घेतला पाहिजे आणि आपल्या भारतास बहुभाषी, बहुधर्मी तथापि एकात्म खंडराष्ट्र बनविण्याचा अविचल दृढ निर्धार आपण केला पाहिजे.

### महाराष्ट्र हा प्रांत, राष्ट्र नव्हे.

आखिल महाराष्ट्र संयुक्त करण्याच्या चळवळीस जोर आला आहे. भाषावार प्रांतरचनेच्या दृष्टीनें मला ती इष्टच वाटते व त्या दृष्टीनें तिला माझा पाठिंबा आहे. परंतु आखिल महाराष्ट्र संयुक्त होण्याला संस्थानें प्रांतांत विलीन झालीं पाहिजेत, सरंजामशाही नामशेष झाली पाहिजे, पोर्तुगिजांचें साम्राज्य हिंदुस्थानांतून नष्ट झालें पाहिजे, तसेंच महाराष्ट्रांत ज्या गिरण्या व कारखाने आहेत त्यांच्यावर समाजाची मालकी प्रस्थापित झाली पाहिजे. आमच्यापैकीं अनेक विद्वानांना अद्यापि सरंजामशाही व भांडवल-शाही यांच्या विनाशाचा आणि महाराष्ट्राच्या एकी-करणाचा संबंध तितकासा जिव्हाळ्याचा वाटत नाहीं. आमच्यापैकीं कांहींच्या अर्थशास्त्रीय व राज्यशास्त्रीय विचारांवर जमातवाद व प्रांतवाद यांचा फार मोठा लेप चढला आहे. व हे लोक महाराष्ट्राच्या राष्ट्र-वादाचा पुरस्कार करण्यांतहि अग्रेसर असतात. याचें एक मजेदार उदाहरण नुकतेंच माझ्या वाचनांत आलें. किर्लोस्कर मासिकाच्या संपादकांनीं एक प्रचलित महत्त्वाच्या प्रश्नावर प्रश्नपत्रिका तयार करून महाराष्ट्रांतील निरनिराळ्या विद्वानांकडे पाठविली. या प्रश्नपत्रिकेस आलेलीं उत्तरें किर्लोस्कर मासि-काच्या जानेवारीच्या अंकांत प्रसिद्ध केलीं आहेत. या प्रश्नांत आजचीं व्यापार–नियंत्रणें व भाव-नियंत्रणें काढावींत किंवा नाहीं असा एक प्रश्न आहे. या प्रश्नास उत्तर देतांना डॉ. मुकुंदराव जयकर म्हणतात, "(५) नियंत्रणें काढावींत कीं नाहीं हें सांगण्याइतकें माझें अर्थशास्त्र तयार नाहीं; म्हणून मला या बाबतींत निश्चित सांगतां येत नाहीं. तथापि मला वाटतें, जोंपर्यंत आपल्या देशांत समाजहितविरोधी गोष्टी चालत आहेत आणि कांहीं जमातीं आपल्या स्वार्थाकरितां टपल्या असून त्यांच्या हातांत देशाची आर्थिक आणि व्यापारी सूत्रें आहेत तोंपर्यंत नियंत्रणें दूर करणें योग्य होणार नाहीं." या उताऱ्यांत डॉक्टर-साहेबांनीं जें मत व्यक्त केलें आहे त्यांत एका जमातवादी नव्या अर्थशास्त्राचीं बीजें आहेत, असें मला वाटतें. आमच्या राष्ट्रांत कांहीं जमाती स्वार्थी आहेत म्हणून जोंपर्यंत त्यांचें वर्चस्व आर्थिक व्यवहारांवर आहे तोंपर्यंत आर्थिक नियंत्रणांची आवश्यकता आहे! या युक्तिवादांतून असा निष्कर्ष निघूं शकतो कीं या स्वार्थी जमातींचें वर्चस्व दुसऱ्या







निःस्वार्थी जमातींच्या हातीं गेलें म्हणजे नियंत्रित अर्थपद्धतीची आवश्यकता नाहीं ! आतां आपल्या देशांतील अशा विशिष्ट स्वार्थी जमाती कोणत्या ? हा प्रश्न मुंबईतील महाराष्ट्रीयांस विचारल्यास तो त्याचें उत्तर ' गुजराथी ' असें स्पष्ट देईल. महाराष्ट्रांतील खेड्यांत जाऊन हा प्रश्न एखाद्या ब्राह्मणास विचारला, तर तो त्याचें उत्तर ' मराठे ' असें देईल. तोच प्रश्न मराठ्यास विचारल्यास ' ब्राह्मण ' असें उत्तर येईल आणि महार—वाड्यांत जाऊन महारास विचारल्यास, मराठे व ब्राह्मण ह्या दोन्ही जमाती महाठक आहेत, असें तेथील लोकांचें निश्चित मत असल्याचें आढळून येईल. हिन्दुस्थान हा हिंदूंचा, इतर कोणाचाहि नव्हे, असें अगदीं सोपें राज्यशास्त्र आपल्याकडे निर्माण होत आहे. त्याच धर्तीवर महाराष्ट्र हें केवळ मराठ्यांचेंच राज्य आहे, असें ठोकळ राज्यशास्त्र आपल्याकडे पंचवीस-तीस वर्षें उदय पावत आहे. २५ वर्षांपूर्वी आपल्या महाराष्ट्रांत सत्यशोधक मतांचा प्रचार करणारे जलसे होत असत. त्यांत महाराष्ट्र हा मराठ्यांचाच देश आहे हें सिद्ध करण्यास पुरावा म्हणून पुण्यापासून बेळगांवपर्यंत जाणाऱ्या आगगाडीस सदर्न मराठा रेल्वे असें नांव देण्यांत आलें आहे, असा अमोघ युक्तिवाद करण्यांत येत असे. हिंदुस्थान या शब्दावरुन ते हिन्दुराष्ट्रच आहे व असलें पाहिजे असें सिद्ध करण्याच्या तर्कशास्त्रापेक्षां हें तर्कशास्त्र फारसें अधिक चुकीचें दिसत नाहीं. असाच व्युत्पत्तिशास्त्राचा आधार घेऊन महाराष्ट्र हें वस्तुतः ब्राम्हणांचें किंवा मराठ्यांचेंहि राज्य नसून तें केवळ महारांचें राष्ट्र आहे व महाराष्ट्र या शब्दाचें मूळ स्वरुप महारराष्ट्र असेंच होतें, असें सांगणाऱ्यांचाहि युक्तिवाद मी ऐकला आहे. महार हे नागवंशी क्षत्रिय असून त्यांनींच प्रथमतः महाराष्ट्रांत वसाहती केल्या व तो त्यांचा देश त्यांच्यापासून ब्राम्हण--मराठा जमातींनीं हस्तगत केला व त्यांना निर्वासित केलें. अशीं एका महाराष्ट्रांत अनेक जमात—राष्ट्रें नांदत आहेत, असाहि युक्तिवाद पुढेंमागें पुढें आल्यास मला आश्चर्य वाटणार नाहीं. या सर्व गोष्टी येथें मांडण्याचें कारण येवढेंच आहे कीं, महाराष्ट्र हें स्वतंत्र राष्ट्र आहे ही भावना जर या देशांत रुजली तर त्यांत एक भयंकर जमातवादी लढा निर्माण होऊन गोंधळ माजल्यावांचून रहाणार नाहीं. ही जमातवादी दृष्टि असणाऱ्या अनेकांचा पाठिंबा आज संयुक्त महाराष्ट्र हा केवळ एक प्रांत नसून तें एक—राष्ट्र आहे, या सिद्धांतास मिळूं शकेल. पण या दृष्टीनें पाठिंबा देणाऱ्या या शक्ती भांडवलवादी व साम्राज्यवादी आहेत. हिंदुस्थान हें एक-राष्ट्र आहे ही भावना गेल्या २५ वर्षांत अधिक जोरानें फैलावली. याचें कारण ती भावना येथील भांडवलशाहीला फायदेशीर होती, असें विधान श्री. वेडेकर यांनीं आपल्या " संयुक्त महाराष्ट्र " या प्रबंधांत केलें आहे. परंतु संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळी करणाऱ्या लोकांतही भांडवलशाही आणि सरंजामशाही यांचे भक्त आहेत हें विसरतां कामा नये. महाराष्ट्राला राष्ट्र बनवावें या आपल्या सिद्धांतास पोषक म्हणून त्यांनीं रशियांतील राज्यघटनेचा जो दाखला दिला आहे तो आमच्या परिस्थितीस मुळींच लागू पडत नाहीं. कारण ज्या प्रदेशांचें राष्ट्रत्व मान्य करुन त्यांना रशियानें आपल्या संघराज्यांत समाविष्ट करुन घेतलें आहे, त्या प्रदेशांतून राष्ट्राला भांडवलशाही व सरंजामशाही विकृति जडविणाऱ्या शक्ती रशियानें आधीं समूळ उपटून टाकल्या आहेत. आपल्या देशांतील कोणत्याही प्रांतांतून या शक्ती अद्यापि उच्चाटन पावलेल्या नाहींत. भांडवलशाही प्रगतींत जे प्रांत मागें पडलेले आहेत, त्या प्रांतांतील या शक्ती आपल्या प्रांतांस स्वतंत्र राष्ट्रत्व प्राप्त करुन घेऊन, त्याचें वर्चस्व आजुबाजूंच्या प्रांतांवर करण्याचा मोह धरुन आहेत. अशा प्रतिगामी शक्ती ' महाराष्ट्र हें स्वतंत्र राष्ट्र आहे ' असें म्हणून कोणी झेंडा उभारल्यास त्याच्यामागें गोळा होतील. अशा अनेक आपत्ती या अपसिद्धान्तांतून निर्माण होण्याचा धोका मला स्पष्ट दिसतो. म्हणून महाराष्ट्राच्या एकीकरणास जरी माझा पूर्ण पाठिंबा आहे, तरी देशांतील सरंजामशाहीचें, भांडवलशाहीचें उच्चाटन करणें या प्रश्नास मी आद्य स्थान देत असल्यानें मी हा संयुक्त महाराष्ट्राचा प्रश्न गौण समजतो. तथापि त्यास माझा विरोध नाहीं. थकलेल्या मुत्सद्यांनीं फुरसतीच्या वेळीं आपली शक्ति तिकडे लावावी. पण










अनुक्रमणिका

## बहुभाषी बहुधर्मी खंडराष्ट्र

महाराष्ट्राला राष्ट्र बनविण्याच्या ध्येयास मात्र माझा तीव्र विरोध आहे.

### नाहींतर आमच्या सर्व भावना बदला व्या लागतील

दादाभाई नौरोजी यांच्या काळापासून आतांपर्यंत ६० वर्षें प्रयत्न करून आपण भारताला एक बहुधर्मी, बहुभाषी असें खंड–राष्ट्र बनविण्यासाठीं झटत आहोंत. युरोपखंडाचें अनुकरण करून एकभाषी छोटीं देशराष्ट्रें संघटित करण्याचा काळ आज निघून गेला आहे. इंग्लिश–फ्रेंचांप्रमाणें जर आपण आपल्या महाराष्ट्रास सतराव्या किंवा अठराव्या शतकांत आधुनिक लोकशाही राष्ट्र बनविलें असतें आणि राज्यशास्त्र, युद्धकला आणि भौतिक विद्या, यांत प्रवीण झालों असतों, तर हिंदुस्थानला आपले गुलाम करण्यांत इंग्रजांना किंवा फ्रेंचांना यश आलें नसतें. पण आज अशा एकभाषी छोट्या राष्ट्रांचा काळ निघून गेला आहे. ६० वर्षे–तीन पिढ्या–अनेक देशभक्तांनीं आपले क्लेश आणि रक्तसिंचन यांच्या योगानें आमच्या अंतःकरणांत हिंदुस्थानसारख्या खंडतुल्य राष्ट्राबद्दल एकात्मतेची भावना जागृत केली आहे. आज महात्मा गांधी, पंडित नेहरू, साथी जयप्रकाश अथवा मौ. आझाद हे अखिल भारतीय पुढारी काश्मीरपासून त्रावणकोरपर्यंत कोणत्याहि ठिकाणीं गेले, तरी तेथलि जनता त्यांचें अंतःकरणपूर्वक स्वागत करतांना ते आपल्या राष्ट्राचे पुढारी आहेत या आपुलकीच्या भावनेनें करीत असते. जर आपण प्रत्येक निराळी भाषा बोलणारा प्रांत हें एक स्वतंत्र राष्ट्र आहे, अशी भावना फैलाविली तर हे पुढारी आपल्या व्यतिरिक्त इतर प्रांतांत गेले असतां, ते आपल्या स्वतःच्या राष्ट्राचे पुढारी अशी भावना जागृत न होतां ते आपल्या शेजारच्या अथवा आपल्या खंडांतील मित्रराष्ट्राचे पुढारी आहेत येवढीच आपुलकीची भावना शिल्लक राहील. माझ्या मतें हें घडणें अशक्यच आहे. पण जर यदाकदाचित् असें घडेल, तर ती आमची प्रगति झाली असें न म्हणतां आमची अधोगति झाली असेंच म्हणावें लागेल. म्हणून दादाभाईपासून, नेहरू-जयप्रकाशपर्यंत चार पिढ्यांच्या राष्ट्रभक्तांनीं भरतखंडाला बहुधर्मी, बहुभाषी असें एक आधुनिक लोकशाही खंडराष्ट्र बनविण्याचा जो प्रयत्न चालविला आहे तोच आपण अखेरपर्यंत सिद्धीस नेला पाहिजे आणि युरोपखंडाला जें साधलें नाहीं व रशियालाहि जें करतां आलें नाहीं तें करून दाखविण्याची ईर्षा आपण धरली पाहिजे. इतिहासाचा उपयोग आपल्या राजकारणास करून घेण्यास हरकत नाहीं. पण आमचीं आजचीं राजकीय ध्येयें इतिहास आपणास शिकवूं शकणार नाहीं. तीं आपलीं च आपण स्वयंप्रज्ञेनें निर्माण केलीं पाहिजेत आणि स्वयंप्रेरित प्रयत्नांनीं आमचा इतिहास घडविला पाहिजे.

---

### महापुरुषाचा अवतार

" महापुरुष केव्हां अवतरेल ? आपण स्वतःस सामान्य यःकश्चित् समजत असूं तेव्हां नव्हे, तर जेव्हां आपण स्वतःस मोठें मानायला लागूं त्यावेळीं. ज्याक्षणीं आपलें त्याच्याशिवाय चालूं शकेल, त्या मंगल क्षणीं तो महापुरुष प्रगट होईल. "

जी. के. चेस्टर्टन








श्री. दि. के. बेडेकरकृत

# संयुक्त महाराष्ट्र : दोन समीक्षणें

१

## राष्ट्र व राज्य

प्रा. श्री. व्यं. पुणतांबेकर

श्री. दि. के. बेडेकर यांनीं 'संयुक्त महाराष्ट्र' नांवाचा एक साधार ग्रंथ नुकताच प्रसिद्ध केला आहे. त्यामध्यें त्यांनीं अनेक प्रश्नांचा उहापोह करून कांहीं 'राष्ट्र' व 'राज्य' याबद्दल विधानें निश्चित रूपानें मांडलीं आहेत. महाराष्ट्र हें राष्ट्र कां प्रान्त, हिंदुस्थान हें राष्ट्र का राज्य, तसेंच हिंदुस्थान हें एकात्म राष्ट्र का बहुराष्ट्र का धर्मराष्ट्र, असे अनेक प्रश्न त्यांनीं चर्चिले आहेत. त्यांच्या मतें अखंड महाराष्ट्र हेंच एकात्म राष्ट्र आहे आणि हिंदुस्थान हें बहुराष्ट्रसंघाचें संयुक्तराज्य आहे; महाराष्ट्र हा केवळ प्रान्त नव्हे, आणि हिंदुस्थान हें एकात्म राष्ट्र नव्हें.

त्यांच्या मतें "प्रदेश, भाषा, आर्थिक सहजीवन राष्ट्रीय संस्कृति, राष्ट्राभिमान, या सर्व घटकांची राष्ट्रीयत्वाला आवश्यकता असून, त्यांपैकीं कोणत्याहि एका बाबीचा अभाव असेल तर तो लोकसमूह राष्ट्र या दर्जाला पोंचूं शकत नाहीं." त्याबरोबर ते म्हणतात, "प्रदेश, भाषा व आर्थिक जविन यांच्या एकात्मतेमुळें व ही एकात्मता कांहीं शतकें टिकल्यामुळें राष्ट्रीय अशी एक संस्कृति निर्माण होते." पानें (६३ व ६४). ही त्यांची राष्ट्रीयत्वाची आधुनिक कल्पना आहे. यांमध्यें धर्माला स्थान नाहीं. त्यांच्या मतें राष्ट्रीयत्वाची आधुनिक कल्पना धर्मनिगडित नाहीं पण धर्मनिरपेक्ष आहे. त्यांना कॉंग्रेसवाल्यांची हिन्दुस्थानाची धर्मनिरपेक्ष एकात्म राष्ट्राची कल्पना व त्यांतील घटकांची 'प्रांत'–कल्पना मान्य नाहीं. तसेंच हिंदुसभावाल्यांची हिंदुसंस्कृति–सापेक्ष हिंदुस्थानची एकात्म राष्ट्राचीहि कल्पना मान्य नाहीं. त्याबरोबरच कोणाचीहि धर्मराष्ट्राची कल्पना पसंत नाहीं. ही समाजवादी विचारसरणि आहे.

त्यांनीं आपल्या ग्रंथांत राष्ट्रकल्पनेचें ऐतिहासिक दृष्ट्या व राष्ट्रव्याख्येचें व्याप्ति-अव्याप्ति दृष्ट्या जें सांगोपांग व काटेकोर विवेचन केलें आहे, तें बरेंचसें अपुरें व एकांगी आहे. त्यांनीं 'राष्ट्र' याच्या लक्षणाबरोबर 'राज्य' 'धर्म' व 'संस्कृति' या आधुनिक कल्पनांचें विशदीकरण करावयास पाहिजे होतें, व त्यांचीं निश्चयात्मक लक्षणें सांगावयास पाहिजे होतीं. तसें त्यांच्या ग्रंथांत केलेलें दिसत नाहीं. ग्रंथाच्या परिपूर्णतेकरितां व वरील कल्पनांविषयीं त्यांचें मत समजण्याकरितां तें अवश्य आहे. त्यांचें ठाम मत असें दिसतें कीं, अर्वाचीन राष्ट्रें भांडवलदारी युगांत निर्माण झालीं आहेत (पान ६२) व त्यांच्यामध्यें संघटित झालेला लोकसमूह आर्थिक दृष्टीनें स्वयंपूर्ण व तुटक ग्रामसंस्थांचा राहिलेला नसून परस्परावलंबी झालेला आहे, ही गोष्ट अत्यंत महत्त्वाची आहे (पान ६२). माझ्या मतें हें विधान फारच आग्र-

१ प्रकाशक—के. एस्. गुप्ते, ६९१ बुधवार, पुणें २. (१९४७) पृष्ठें २२०, किं. ५ रु.








हात्मक व आत्यंतिक आहे. ते अर्थवादी **समाज-पंथीयांचें** आहे, हें मी जाणतों. म्हणूनच मी असें म्हणतों. भांडवलदारी ही राष्ट्रकल्पनेच्या पुढें जाऊन साम्राज्यें व संयुक्तराज्यें निर्माण करूं शकते व तिचा आर्थिक व राजनैतिक ओघ पुढें वाढूं शकतो. तेव्हां राष्ट्रकल्पनेचें मुख्य बीज अथवा प्रथम आधार केवळ भांडवलदारीच होऊं शकत नाहीं. हें केवळ economic interpretation of history आहे.

आधुनिक राष्ट्रकल्पना समजण्यास बरेंच मागें गेलें पाहिजे. धर्माचें अधिष्ठान व संस्कृतीचा अभिमान यांचाहि प्रभाव भाषेच्या व प्रदेशांच्या परिणामाबरोबर धरला पाहिजे. राज्य जरी धर्मनिरपेक्ष असलें तरी संस्कृति ही धर्मसापेक्ष आहे, नीतिनिगडित आहे. धर्म व नीति यांना सोडून चालणार नाहीं. जेव्हां श्री. वेडेकर **राष्ट्रीय संस्कृति** व **राष्ट्राभिमान** म्हणतात तेव्हां त्यांच्या त्यांबद्दलच्या कल्पना काय आहेत, हें समजत नाहीं. राष्ट्राच्या व्याख्येंत अथवा स्वरूप-लक्षणांत राष्ट्रच शब्द वापरणें हें अशास्त्रीय आहे. त्यामुळें राष्ट्राचाहि बोध होत नाहीं व संस्कृतीचाहि नाहीं. समाजवादी यांना 'धर्म' हा शब्द वावडा आहे हें मी जाणतों. पण इतिहासाच्या, समाजाच्या व संस्थांच्या घडणींत त्याचें मोठें स्थान आहे. त्याला आमचा इलाज नाहीं.

डॉ. अर्नेस्ट बार्कर यानें आपल्या Reflections on Government (1942) या ग्रंथांत Nation (राष्ट्र) या आधुनिक कल्पनेची व्याख्या अशी केली आहे.—

A nation is a society or community of persons, whose unity is based (1) primarily on space or neighbourhood, issuing in the feeling of neighbourliness, and in that common love of the natal soil (or patria) which is called patriotism; (2) secondly on time, or the common tradition of centuries, issuing in the sense of a common participation in an inherited way of life, and in that common love for the inheritance which is called nationalism. Physiologically, and in respect of the blood of their veins, the members of a nation are generally drawn from different races or stocks which have wandered into a contiguous territory during the course of human migrations. Psychologically and in respect of the content of their minds, the members of a nation have been led by a life of contiguity and common historical experience to accumulate a common mental capital and to develop a common mental purpose for its maintenance and extension."

तसेंच डॉ. बार्करची आधुनिक राज्याची (State ची) कल्पना पुढीलप्रमाणें आहे—" A modern state is generally a territorial nation, organised as a legal association by its one action in creating a constitution and permanently acting as such an association, under that constitution, for the purpose of maintaining a scheme of legal rules defining and securing the rights and duties of its members."

या दृष्टीनें पाहिलें तर श्री. वेडेकर यांची राष्ट्राची व राज्याची आधुनिक कल्पना ही फार निराळी वाटते. त्यांनीं राज्या-(state)-चीं कोठेंच व्याख्या मांडलेली दिसत नाहीं. त्यांनीं 'राष्ट्र' व 'राज्य' या कल्पनांची बरीचशी फारकत केलेली दिसते. माझें मत तर असें आहे कीं, 'राष्ट्र'-कल्पनेची 'राज्य' या व्यवस्थेपासून फारकत करावी; म्हणजे राष्ट्राराष्ट्रांमधील स्पर्धा कमी होतील. पण तशी कल्पना आधुनिक राष्ट्राची व राज्याची नाहीं. ज्याप्रमाणें राज्य हें धर्मनिरपेक्ष असावें असें वाटतें, तसेंच तें राष्ट्रीयत्व-निरपेक्ष असावें, असें मला वाटतें. राजकीय व आर्थिक सहजीवन हें आज जागतिक पाहिजे, केवळ राष्ट्रीय स्वरूपाचें नको. त्यांचा आत्मा, संबंध व व्यवहार जागतिक झाले पाहिजेत. आणि भाषा, संस्कृति व धर्म हे प्रादेशिक अथवा प्रान्तिय राहावेत. त्यांना राष्ट्रीय व राज्यीय लक्षणें मानण्याचें कारण नाहीं. आज राष्ट्र (nation)








म्हटलें कीं तें स्वतंत्र राज्य ( state ) आहे हें ओघानें आलेंच; नाहीं तर राष्ट्राच्या स्वातंत्र्याला अर्थच उरत नाहीं.

माझ्या मतें श्री. बेडेकरांनीं राष्ट्र( nation state) व राष्ट्रजाति ( nationality ) यांची उत्तम छाननी केलेली नाहीं. महाराष्ट्राला एकात्म राष्ट्र संबोधिलें तर त्याचें पूर्ण राजकीय स्वातंत्र्य ( statehood ) मानावें लागेल, व हिंदुस्थानला संयुक्तराज्य न मानतां संयुक्तराष्ट्रांचा एक प्रादेशिक संघ united nations' organization मानावा लागेल. असें मानण्यास मी तयार नाहीं. श्री. बेडेकरांच्या विचाराचें पर्यवसान हिंदुस्थानच्या संयुक्त राज्यांत न होतां ते एका प्रादेशिक राष्ट्रसंघाच्या रूपांत होण्याचा संभव अधिक आहे. त्यांमध्यें त्याच्या अस्तित्वाला धोका आहे.

रॉयल इन्स्टिट्यूट आफ इंटरनॅशनल अफेअर्सच्या ' Nationalism ' या अनेक तज्ज्ञांनीं सहकारी पद्धतीनें लिहिलेल्या ग्रंथांत ( १९३९ ) ' राष्ट्र ' या शब्दाची व्याख्या अशी दिली आहे. " In the present report the term nation has been used to denote a human group with the following characteristics—

( a ) the idea of a common government whether as a reality in the present or past or as an aspiration of the future.

( b ) a certain size and closeness of contact between all the individual members.

( c ) a more or less defined territory.

( d ) certain characteristics [ of which the most frequent is language ] clearly distinguishing the nation from other nations and non-national groups.

( e ) certain interests common to the individual members.

( f ) a certain degree of common feeling or will, associated with a picture of the nation in the minds of the individual members.

श्री. बेडेकरांनीं ' राष्ट्र ' हा शब्द ' Nation ' ह्या अर्थी वापरला नसून ' Nationality ' ह्या अर्थीं वापरला आहे. आणि त्यामुळें त्यांना ' राष्ट्र ' व ' राज्य ' यांचा घनिष्ठ संबंध ओळखतां आला नाहीं किंवा त्यांनीं विशद केला नाहीं असें मला वाटतें.

माझ्या मतें ' राज्य ' ( State ) हा शब्द सध्यां सुसंघटित समाजाच्या राजकीय स्वरूपाला लावतात. राज्य म्हणजे राजकीय हेतूसाठीं एकत्रित व संघटित झालेला व विशिष्ट प्रदेशांत सामावलेला लोकसमाज होय. ' राजकीय हेतु ' याचा अर्थ मुख्यतः लोकांचें व प्रदेशाचें रक्षण करणें व त्यांची स्वस्थता व स्वातंत्र्य राखणें, हा होय. त्या दृष्टीनें राज्याची घटना व शासनव्यवस्था केलेली असते. तें आपल्या लोकांच्या सर्वसाधारण व सार्वत्रिक हितसंबंधांना जपतें. सामान्यतः आपल्या प्रदेशांत वस्ती करणाऱ्या प्रत्येक व्यक्तीवर नियंत्रण घालतें आणि त्यांच्या व्यवहारांचें नियमन करतें.

तेव्हां राज्याला आधारभूत गोष्टी म्हटल्या ह्मणजे ( १ ) लोक, ( २ ) प्रदेश, ( ३ ) स्वातंत्र्य व ( ४ ) संघटना. ' राज्य ' शब्दांतील मुख्य कल्पना ही जाति, धर्म, भाषा व संस्कृति या संबंधाची नसून, ती एका विशिष्ट मनुष्यवस्ती भूमीवर अधिकार व शासन चालविणाऱ्या सत्तेसंबंधींची आहे.

राज्य ( state ) व राष्ट्र ( nation ) ह्या समानार्थक संज्ञा नाहींत. राज्य हें क्षेत्रमर्यादानिबद्ध संघटित व स्वतंत्र लोकसमाजाचें नुसतें राजकीय स्वरूप आहे. राष्ट्र हें सुसंघटित लोकसमाजाचें राजकिय, सांस्कृतिक व नैतिक स्वरूप आहे. त्याला स्वतंत्रतेच्या व समान ऐक्याच्या भावना असतात. त्याचा गत इतिहास, वर्तमान जीवन व भावी आकांक्षा ह्या विशेष प्रकारच्या असतात. राष्ट्र ही ऐतिहासिक व नैतिक ह्या दोन्ही रीतींनीं घडलेली एकात्मक संघटना आहे. ऐतिहासिक दृष्टीनें राष्ट्राची जोपासना त्यांतील आर्थिक, राजकीय व बौद्धिक घटनांच्या योगें होते. एकराष्ट्रत्वाची भावना ही मनुष्यांनीं एके ठिकाणीं राहून समाधिकपणानें केलेलें श्रमसाहस, भोगलेल्या आशा–आकांक्षा, सोसलेलीं सुखदुःखें व पाहिलेले परीक्षा–प्रसंग, ह्यांच्या योगें दृढ होते. त्यांच्या गत इतिहासामुळें त्यांच्यामध्यें उत्पन्न झालेली आत्मीय भावना हीच त्यांचें








खरें नैतिक बंधन व बल होय. नुसत्या वंशाच्या, धर्माच्या, भाषेच्या, देशाच्या किंवा सत्तेच्या एकत्वावर अथवा सारखेपणावर संघटित राष्ट्राची उभारणी होत नाहीं. त्याचें त्याला मोठें साहाय्य होतें. पण तीं मुख्य अथवा मूळ लक्षणें होऊं शकत नाहींत. तीं असून सुद्धा जर त्या लोकांमध्यें ऐक्याच्या समान भावना व नीति, आणि एकत्र सहवासाच्या व सहकाराच्या गत गोष्टी, वर्तमान प्रसंग व नवीन आकांक्षा नसतील, तर त्यांच्यामध्यें राष्ट्रीय भावना व संस्था उत्पन्न होणार नाहींत. अशीं नैतिक व मानसिक बंधनें स्थलाच्या सान्निध्यानें, ऐतिहासिक घडामोडींनें व ध्येयाच्या एकरूपतेनें उत्पन्न होतात. खरें राष्ट्रबंधन व राष्ट्रबल हीं राष्ट्रामध्यें असणारी समान हिताची भावना, त्यानें एकत्र भोगलेलीं समान सुखदुःखें, आणि त्याच्यावर येणारे समान प्रसंग व परिस्थिति यांच्या योगानें प्राप्त होतात. त्यांतील लोकांमध्यें आपण एकच होतों व आहों आणि राहूं अशी बळकट भावना पाहिजे.

सांप्रत ' राष्ट्र ' हा प्रादेशिक राजकीय ऐक्याची जाणीव झालेल्या आणि एकत्र राहण्याची समान आवड व एकत्र प्रगतीविषयी समान इच्छा व निष्ठा बाळगणाऱ्या लोकांचा समाज समजला जातो. राष्ट्राचीं मुख्य लक्षणें म्हटलीं म्हणजे ( १ ) एक प्रदेश, ( २ ) एक राज्यतंत्र, ( ३ ) एकतेची भावना, ( ४ ) स्वतंत्र राज्य, ( ५ ) समानतेची नीति, ( ६ ) देशप्रेम, व ( ७ ) विशिष्ट दृष्टि व ध्येयें यांनीं प्रेरित असलेले लोक. राष्ट्रांतील अथवा राज्यांतील जनता म्हणजे एका जातीचे अथवा धर्माचे अथवा भाषेचे लोक नव्हेत. विशिष्ट क्षेत्र-मर्यादेंत ऐक्याच्या अथवा आपलेपणाच्या भावनेनें राहणारे सर्व लोक जनतेमध्यें येतात. nationality ( राष्ट्र–जाति ) मध्यें भाषा, धर्म, संस्कृति अथवा वंश किंवा जाति यांचें विशिष्टत्व अथवा प्रभुत्व दिसून येईल, पण त्याला राष्ट्र म्हणतां येणार नाहीं.

या दृष्टीनें संयुक्त महाराष्ट्राला राष्ट्र म्हणणें युक्त नाहीं. त्याला जोंपर्यंत राजकीय स्वातंत्र्य व प्रभुत्व नाहीं, तोंपर्यंत तो राष्ट्रघटक राहील, राज्य व राष्ट्र होणार नाहीं. तसेंच हिंदुस्थान हें जरी एकभाषी नसलें तरी त्याला एकात्म राष्ट्र म्हणावयाला कमी अडचणी आहेत. कारण त्यांतील शेंकडा नव्वद जनता समान संस्कृतीनें, समान धर्मानें, समान स्वातंत्र्यानें, समान आकांक्षांनीं, समान इतिहासानें, समान आचार-विचारानें, समान देशप्रेमानें व एका राज्यतंत्रानें बांधलेली आहे. तिला हिंदुस्थान अथवा हिंद म्हणा अगर म्हणूं नका; तिच्यामधील पूर्वीचा राजकीय असंघटितपणा जाऊन तिची राज्यशक्ति केंद्रित झाली आहे. तिचे घटकच अजून सुसंघटित नाहींत, त्यांच्या सीमा अनिश्चित आहेत.

श्री. वेडेकर हिंदुस्थानचें एकात्म राष्ट्र व राज्य हीं दोन्हीं मानीत नाहींत. ते त्याला बहुराष्ट्रीय संघ मानून संयुक्त राज्य मानावयाला तयार आहेत. ते आज हिंदुस्थानच्या दृष्टीनें त्यांतील भिन्न राष्ट्रांचा प्रदेश सीमित व निश्चित करीत आहेत. तो अनेक राष्ट्रांचा देश आहे असें ते मानतात. त्यांना ' राष्ट्र ' ही कल्पना ' जाती ' सारखीच बद्ध आणि नूतन लोक, भाषा व प्रदेश न सामावणारी व आत्मसात् न करणारी संस्था दिसते. त्यांच्या दृष्टीप्रमाणें बहुराष्ट्रीय प्रदेश एकराष्ट्रीय देश होऊं शकत नाहींत. त्यांच्या विचारसरणीमध्यें ह्या मताचा कां अवलंब केला आहे, हें विचारवंतीं सहज समजण्यासारखें आहे. समाजवादी विचारसरणीचे स्थलानुकालानुरूप कांहीं विशिष्ट सिद्धान्त असतात. त्यायोगें त्यांच्या कार्याला मदत होते. माझ्या मतें ' राष्ट्र ' ही कल्पना संकुचित नाहीं. तिच्यामध्यें मोठेमोठे समाज व्यापूं शकणारी शक्ति आहे. तिचें क्षेत्र चढतें वाढतें आहे. शेवटीं ती विश्व–राष्ट्रामध्यें परिणत पावेल, पण ती वर्ग कलहानें नव्हे, व वर्गविशिष्ट रचनेनें नव्हे. राष्ट्रकल्पनेच्या वाढत्या संबंधांत व ओघांत मोठे देश, खंडें व जग हीं सर्व सामावूं शकतील. कारण राष्ट्रसमाज हा सुद्धां विविध स्वरूपाचा, खुल्या संबंधांचा आणि नाना जातींचा, धर्मांचा, भाषांचा व प्रदेशांचा असूं शकतो. तो येत्या विश्वसमाजाचें लहान स्वरूप आहे. लोकसत्तेच्या सिद्धांतानें तो पुढें जाईल.








श्री. वेडेकरांचा हिंदुधर्म व हिन्दु संस्कृति या बद्दल रोष दिसतो. त्यांनीं धर्माची व संस्कृतीची व्याख्या व त्याबद्दलची आपली भूमिका विशद न केल्यामुळें त्यासंबंधीं कांहींच विशेषरूपानें लिहितां येत नाहीं. ते जर हिंदुधर्म हा एक केवळ उपासना-पंथ अथवा संप्रदाय मानीत असतील व हिंदु संस्कृति त्याच उपासनेचें एक फळ धरीत असतील तर आमचें कांहींच म्हणणें नाहीं. धर्म व संस्कृति हे शब्द मुळींच वावडे नाहींत, व हिंदु अथवा हिंदी हे तर मुळींच तसे नाहींत. त्यांतील आध्यात्मिक विचार, नैतिक उपदेश, करुणा, मैत्रीभाव, भूतदया, सहिष्णुता यांच्या योगानें एवढा मोठा हिंदु समाज तयार झाला व बांधला गेला आहे व तसाच जागतिक समाज पुढें बांधला जाईल. हिंदुधर्म व संस्कृति ही ६००० वर्षांच्या आपल्या देशाच्या मोठ्या लोकांच्या विचारांचें, संपर्काचें व अनुभवांचें भांडार व धन आहे. कोणत्याहि राष्ट्र–समाजाचें राष्ट्रीयत्व व समाजत्व त्यांतील तत्त्वांवरच प्राधान्येंकरून अवलंबून आहे. हिंदुधर्म, व संस्कृति हीं बंद स्वरूपाचीं नसून खुल्या स्वरूपाचीं आहेत. हिंदूंची " धर्म–राष्ट्र " अशी खिस्ती व महंमदी स्वरूपाची कल्पना नव्हती. ते तशी कल्पना करीत नाहींत. मात्र राष्ट्राला, राज्याला, संस्कृतीला व समाजाला सर्वसाधारण धर्म व सर्वसामान्य नीति यांचा आधार व प्रेरणा पाहिजे, असें ते मानतात.

हिंदु हा शब्द मूळचा प्रादेशिक आहे. तो विशिष्ट उपासना, पंथ अथवा संप्रदायवाचक नाहीं. मुसलमानांचा सर्वच देश व धर्म, स्वतःचे देश सोडून, द्वेष व आक्रमणाचें स्थान आहेत असें वाटतें, व त्याप्रमाणें ते वागतात. हिंदूंचें तसें नाहीं. त्यांच्या राष्ट्राच्या व राज्याच्या कल्पनेंत इतरांचा समावेश आहे. पण त्यांना विशिष्ट महत्त्व व अधिकार नाहींत, तसेंच विशिष्ट स्थान व कर्तव्यें नाहींत. सामाजिक व्यवहारांत मात्र त्यांच्या कल्पना, आचार व व्यवहार समानतेचे नाहींत. त्या विभागणीच्या पण सहिष्णुतेच्या आहेत. श्री. वेडेकरांच्या मतें, राष्ट्रीयत्वाची भावना ही मानवाच्या मनांत उद्भवणारी स्नेहभावना नव्हे; तसेंच मानवसेवाधर्माची भावना किंवा तशी कोणतीहि नैतिक भावना राष्ट्रीयत्वाचें अधिष्ठान किंवा उगमस्थान होऊं शकत नाहीं. पुढें ते म्हणतात, " हिंदु, हिंदी किंवा अशा इतर संस्कृतीच्या आधारानें ' राष्ट्र ' या संस्थेची व्याख्या करणें बरोबर नाहीं. जसे एका धर्माचे लोक एका राष्ट्राचे ठरत नाहींत त्या प्रमाणेंच एका संस्कृतिचे लोकहि एका राष्ट्राचे होत नाहींत " ( पान ५१ ). माझ्या मतें अशी ठोकळ व ठाम विधानें अपुरीं व चुकीचीं आहेत. प्रथम श्री. वेडेकरांनीं आपली धर्माची, नीतीची व संस्कृतीची व्याख्या अथवा विवरण केलें पाहिजे. मग ठरविलें पाहिजे कीं, कोणत्येंहि राष्ट्रीयत्व अथवा आधुनिक राष्ट्रीयत्व व राष्ट्र हें धर्मनिरपेक्ष, नीतिनिरपेक्ष व संस्कृतिनिरपेक्ष असतें आणि तें केवळ अर्थसापेक्ष व भाषासापेक्ष असतें. त्यांची टीका उपयुक्त होण्यास नुसतें राष्ट्र एका धर्माचें अथवा एका संस्कृतीचें अथवा एका नीतीचें नसतें असें म्हणून चालणार नाहीं. एका धर्माचीं संस्कृतीचीं व नीतीचीं अनेक राष्ट्रें व राज्यें असूं शकतील. तसेंच एका राज्यांत अथवा राष्ट्रांत अनेक धर्म, संस्कृती व नीतिभावना नांदत असतील. पण त्यांचें असें म्हणणें आहे काय कीं, कोणत्याहि राज्याला अथवा राष्ट्राला सामान्य संस्कृतीचें, सर्वसाधारण धर्माचें व मूलभूत नीतीचें अधिष्ठान अथवा आधार अथवा बंधन नको ? असें झालें तर कायद्यांची, विधिनिषेधाची, कर्तव्याकर्तव्याची जरूरीच राहणार नाहीं. केवळ अर्थसापेक्ष अथवा अर्थसंबंधावर राष्ट्र अथवा राष्ट्रीयत्व रचणें हें किती चुकीचें आहे, याची साक्ष सर्व मानव--इतिहासच देत आहे. त्यांचें पुढील ठाम पण ठोकळ मत– "तूर्त एवढेंच सांगणें शक्य आहे कीं, भाषा, ऐतिहासिक परंपरा व राष्ट्रीय अभिमान इत्यादि महत्त्वाच्या बाबतींत बहुजिनसी असलेल्या हिंदी समाजास केवळ समान संस्कृतीच्या बंधनामुळें एकराष्ट्रीय मानणें बरोबर ठरणार नाहीं "– कोणालाहि हा विचार पटणार नाहीं, असें मला वाटतें. त्यांचें म्हणणें "एकराष्ट्रीय मानणें बरोबर ठरणार नाहीं ". पण मी विचारतों एकराष्ट्रीय होणें शक्य नाहीं काय ? हिंदी ' राष्ट्र ' व ' राष्ट्रीयत्व ' हीं आज नसलीं तरी पुढें होऊं








घातलेली व होणारी घटना आहे. त्याच्यामध्यें आज जरी अपुरा केंद्रितपणा व संघटितपणा असला तरी हरकत नाहीं. केवळ महाराष्ट्राला 'राष्ट्र' मानून, त्याचें राष्ट्रीयत्व कबूल करून तेथेंच थांबणें आजच्या जागतिक कालौघाच्या व हिन्दी राष्ट्र—भावनेच्या दृष्टीनें शक्य नाहीं, आणि घातकहि आहे. श्री. वेडेकरांची केवळ आर्थिक जीवनाची व वर्गीय संबंधाची विचारसरणि या विचाराला कारण आहे. त्यांनीं ती बळकट करण्याच्या उद्देशानें एकभाषित्वाचें व प्रान्तीय राष्ट्रभावनेचें पाठबळ घेतलें आहे. परंतु त्याचा मूळ आधार शेतकरी व कामकरी वर्गाचें आर्थिक जीवन हाच दिसतो. एकभाषित्वाच्या मागें व राष्ट्रीय अभिमानाच्या मागें केवळ समान अर्थाचें बळ नसून, समान आचारविचार व व्यवहार--व्यापार, समान संस्कृति, नीति व धर्म यांची प्रेरणा व प्रभाव आहेत. तीं टाकून चालणार नाहींत. तीं केवळ परिणाम नसून कारणीभूत आहेत. मानवी जीवन अन्योन्याश्रयी असून अनेक कार्यकारणभावांचें जाळें आहे. त्याच्यामध्यें एकाच कारणाला निर्णायक अथवा प्रेरक मानणें हें चुकीचें व अशास्त्रीय आहे.

प्रत्येक राज्य ( State ) हें राष्ट्र नसलें तरी, प्रत्येक राष्ट्र ( nation ) हें राज्य असलें पाहिजे. nationality मात्र राज्य नसूं शकेल. तें राज्य झालें कीं, राष्ट्र होतेंच. पूर्वी पुष्कळ राष्ट्रें राज्यसत्तेनें निर्माण केलीं. आज nationalities स्वतंत्र राज्यें निमार्ण करूं पहात आहेत. व त्या योगें राष्ट्रें बनत आहेत. पाश्चात्य युरोपामध्यें राज्यांनीं राष्ट्रें निर्माण केलीं. पौर्वात्य युरोपामध्यें nationalities नीं राज्यें निर्माण केल्यावर तीं राष्ट्रें झालीं. 'राज्य' संस्था बलरूपानें, कायद्यानें, समानता आणते व समान भाषा आचारविचार व बंधनें तयार करूं शकते. आणि मग ती राष्ट्र बनते. nationality ही द्वेषानें, विरोधानें, बलानें 'राज्य' स्थापते व त्या प्रक्रियेंतच 'राष्ट्र बनते, व आपली भाषा, संस्कृति इत्यादि टिकविते, असें इतिहास दाखवितो. श्री. वेडेकरांनीं ठरविलेलीं राष्ट्रलक्षणें अशीं आहेत. "सलंग मायभूमि, एक लोकभाषा, आर्थिक सहजीवन व एकराष्ट्रीय संस्कृतीच्या आधारानें नांदणारी राष्ट्रीयत्वाची भावना या चार बाबतींत विकास होत जाऊन ज्या लोक—समूहाला राष्ट्रीय लोकसमूहाचें स्वरूप आलें त्यांनीं आजचीं 'राष्ट्रें' बनविलीं आहेत, अशी व्याख्या केली पाहिजे." या व्याख्येंत मायभूमि, एकभाषा, संस्कृति हे शब्द आल्यावर त्यामागील त्यांचें एकीकरण, स्थिरकिरण, विशिष्टीकरण व शुद्धीकरण करणारी कोणची शक्ति प्रेरणा व प्रभाव होता? तो आर्थिक नसून मानसिकच होता असें मला वाटतें. त्यांची स्फूर्ति कोठून झाली? त्यांना विशिष्ट वळण, मर्यादा कोणी घातल्या? त्यांच्या एकत्वाचीं बंधनें व विशिष्टत्वाच्या सीमा कशा निर्माण झाल्या? त्या राज्यशक्तीनें का धर्मशक्तीनें का समान संस्कृतीनें का समान आचार—व्यवहारविषयक नीतीनें ठरविल्या? या प्रश्नांचीं उत्तरें इतिहासदृष्ट्या समर्पक मिळालीं पाहिजेत. केवळ तर्कानें तीं रहस्यें उलगडणार नाहींत.

श्री. वेडेकर आपली दृष्टि व तर्कपद्धति महाराष्ट्र व तत्सम इतर प्रदेशांपुरतीच कां लावतात व त्यांना पुढें कां नेत नाहींत, हें समजत नाहीं. भांडवलदारी युगानें सर्व हिंदुस्थानदेशाला व्यापिलें आहे. आर्थिकदृष्ट्या त्याचें सहजीवन आहे. तें युग सर्व देश व्यापून आहे. केवळ आज एक भाषा नाहीं म्हणून तें जीवन राष्ट्रीय होऊं शकत नाहीं काय? त्याला राष्ट्रीय अभिमान उत्पन्न झाला आहे. त्याची राष्ट्रीय संस्कृति आहे. मग तो देश राष्ट्र कां होणार नाहीं, हाच आमचा प्रश्न आहे. महाराष्ट्र अखंड व्हावें, एकवटावें हें आम्हाला पाहिजे. पण स्वतंत्र असें तें राज्य नसावें, कारण राष्ट्र या कल्पनेंत तीच भावना प्रमुख आहे. तो 'राष्ट्रक' (nationality) रूपी प्रान्त झाला म्हणजे उत्तम होईल.

श्री. वेडेकरांनीं 'आपल्या संयुक्त महाराष्ट्र' पुस्तकांत 'महाराष्ट्रामध्यें राष्ट्रवादाचा विकास' 'मराठ्यांचा इतिहास व राष्ट्रीयत्व' अशी आणखी दोन तीन प्रकरणें लिहिलीं आहेत. त्यासंबंधीं मी येथें विचार केलेला नाहीं. मुख्यत: मी त्यांच्या "राष्ट्रीयत्वाची आधुनिक कल्पना" व "एकात्म महाराष्ट्र व संयुक्त भारत" यांतील थोड्या प्रश्नांचा








व मतांचा विचार केला आहे. त्यांचें पुस्तक वाचनीय झालेलें आहे. त्याच्यामध्यें प्रौढपणा व विश्लेषण चांगलें आहे. माझीं मतें मी वर मांडलीं आहेत.

शेवटीं आधार म्हणून हान्स कोहेनच्या नव्या 'राष्ट्रवादाची कल्पना ( Idea of Nationalism 1943 ) या पुस्तकांतलि कांहीं विचार मांडून हा लांबलेला लेख पुरा करतों.

" Nationalism, therefore, presupposes the existence, in fact or as an ideal, of a centralised form of government over a large and distinct territory. "

" Nationalism is first and foremost a state of mind, an act of consciousness. "

" Even if a nationality arises, it may disappear again, absorbed into a larger or new nationality. Nationalities are products of the living forces of history, and therefore always fluctuating, never rigid. "

" A nationality generally has several of these attributes, very few have all of them. The most usual of them are common descent, language, territory, political entity, customs and traditions and religion. But none of them is essential to the existence or definition of nationality."

"The most important outward factor in the formation of nationalities is a common territory or rather the State. Political frontiers tend to establish nationalities. Many new nationalities like the Canadian developed entirely because they formed a political and geographic entity.

Although some of these objective factors are of great importance for the formation of nationalities, the most essential element is a living and active corporate will. Nationality is formed by the decision to form a nationality. "

---

# २

# शिवशाहीचें अधिष्ठान काय होतें?

प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर

पुण्याचे साम्यवादी कार्यकर्ते व लेखक श्री. दि. के. बेडेकर यांचा हा प्रचलित राजकारणोपयोगी ग्रंथ योग्य वेळीं महाराष्ट्रीयांपुढें येत आहे. यांतील प्रमेयांची छाननी करण्यापूर्वी ग्रंथाचे गुण आरंभींच सांगणें उचित. ग्रंथ बुद्धिवादी भूमिका घेऊन लिहिला आहे. अशा विषयाला आवश्यक ती ऐतिहासिक पद्धति सर्वत्र अवलंबिलेली आहे. स्वतःच्या ज्ञानाच्या मर्यादांची जाणीव प्रत्येक ठिकाणीं सूचित केली आहे, व याहून दुर्मिळ गोष्ट म्हणजे विवेचनांतलि उणिवांचा पाढा स्वतःच वाचून दाखविला आहे. अर्थात् टीकाकाराला शस्त्र उपसावयाचें कारणच उरलेलें नाहीं. ग्रंथकाराच्यां बुद्धीची तरलता, जिज्ञासा, साक्षेप, मेहनत सर्व रचनेंत दृग्गोचर होतात. एवढें सांगितल्यावर ग्रंथ प्रत्येक जिज्ञासूनें एकवार नजरेखालीं घातल्यावांचून राहूं नये हें सांगणें न लगे. ग्रंथ उत्तम न म्हटला तरी चांगला ठरावा इतपत उतरला आहे व अशा वादग्रस्त विषयांत एवढें यश संपादणें ही गोष्टहि भूषणावह म्हटली पाहिजे.

ग्रंथाचे दोषहि ग्रंथकाराच्या गुणांतूनच निर्माण झालेले आहेत. मार्क्सवादी हा बुद्धीचा कर्कश, निर्भीड, स्पष्ट व ऐतिहासिक विचारसरणीचा मुळांतच असतो. पण त्याच्या विचारांची बैठक आधींच ठरलेली, विवेचनाची मूस आधींच तयार केलेली असते. त्यामुळें विवाद्य विषयाच्या चौकशीला जरूर असलेली बुद्धीची निर्लेपता इच्छित असूनहि त्याला राखतां येणें अशक्य होतें, विवेचनाला आपोआपच ठोकळेबाजपणाचा दोष चिकटतो व अखेर निर्णय प्रचारकी थाटाचा ठरतो. मात्र आजच्या राजकारणांत एकटा साम्यवादीच या दोषांनीं लिप्त, व म्हणून दोषार्ह, उरलेला नाहीं. सारेच राजकीय पक्ष कमी अधिक प्रमाणांत असेच झाले आहेत. त्यामुळें कै. वामनराव जोश्यांसारख्या








एखाद्या विचक्षणाला कोणत्याहि विषयावरील सर्व पक्षांचीं मतें आपणच लिहून काढतां येणें शक्य आहे. पक्षविरहित मताला समाजांत स्थान उरलेलें नाहीं असा याचा अर्थ होतो.

ग्रंथाची रचना पद्धतशीर, किंबहुना यंत्रबद्ध आहे तरी लेखणी ओघवती नाहीं. ग्रंथाच्या स्वरूपामुळेंच रूक्षता पूर्णपणें टाळणें अशक्यप्राय असलें तरी विचार पूर्ण पचविलेले नसल्यामुळेंच हा दोष प्रायः संभवतो. त्यामुळें विवेचन त्रुटित भासतें. विचारांचें ओझें झेपण्यासारखी भाषा बेडेकरांनीं कमावलेली नाहीं. व्याकरणदोषहि मधूनमधून डोकावतात. पुस्तकाच्या प्रसाराला हा मोठाच खोडा ठरण्याची भीति वाटते. तसेंच मेहनत घेतली असूनहि पुस्तकांत बिनचूकपणा साधलेला नाहीं.

ग्रंथाची मांडणी विद्यालयांतून लिहिल्या जाणाऱ्या प्रबंधासारखी झाली आहे. हा त्याचा प्रधान दोष वाचकाला अडखळवितो, जेथें जो मुद्दा उपस्थित झाला तो तेथेंच संपविला पाहिजे. दुसऱ्या भागाचा हवाला देणें रचनादृष्ट्या योग्य नसतें. याहून मोठा दोष म्हणजे लेखकाला महाराष्ट्राची संपूर्ण माहिती नाहीं, त्यांचें ज्ञान त्रोटक आहे. ग्रंथ लिहिण्याचें योजून विद्यार्थ्याप्रमाणें माहिती मिळवणें निराळें व अनेक वर्षें सर्वांगिण वाचन चालू असून त्यांतून ग्रंथ सहज निर्माण होणें निराळें. दुसऱ्यांना विचारून मिळवलेल्या ज्ञानांत अचूकपणा, संपूर्णपणा, गाठतां येणें अशक्य. तीच गोष्ट नेमकी या ग्रंथांत घडली आहे. साम्यवादी हा इतिहासवादी असूनहि इतिहासज्ञाता बहुधा नसतो. दुसऱ्यांच्या विधानांवर त्याची इमारत उठवावयाची असते. हा दोष मार्क्स, लेनिन, यांसारख्या जगद्गुरु झालेल्या आचार्यांच्या विधानांतहि आढळतो. मग इतरांचा पाड काय! इतिहास-संशोधक इतिहासवादी बनून समाजधारणा, समाजविकास, समाजपरिवर्तन यांबद्दलचे सिद्धान्त मांडतील तेव्हांच आज सामाजिक शास्त्रांत माजलेली बजबजपुरी, संदिग्धता, अवास्तविकता, असत्य यांचा नायनाट होईल.

महाराष्ट्रापुरतें बोलावयाचें तर कम्यूनिस्टांची महाराष्ट्रेतिहासाशीं लगट डांग्यांनीं आपल्या 'सोशिआलिस्ट' मासिकांत राजवाड्यांचे लेख भाषांतरित केले तेव्हांपासूनची म्हणजे १९२३ पासून आहे. असा मान देऊन डांग्यांनीं लेनिनप्रमाणें राजवाडे घडून ठोकून 'आपणासारखे' केले. राजवाड्यांचें हें साम्यवादी रूप त्यांच्या १९२४ सालीं लिहिलेल्या 'महिकावतीच्या बखरी'च्या प्रदीर्घ प्रस्तावनेंत दृष्टीस पडतें. या प्रस्तावनेनें अनेक लेखकांची दिशाभूल केली आहे. राजवाड्यांचें सर्वच लिखाण त्यांच्या त्या त्या वेळच्या वाचनाचें प्रतिबिंब असतें. जर त्यांनीं डायरी लिहिली असती तर कोणतीं साम्यवादावरील पुस्तकें त्यांच्या वाचनांत आलीं होतीं हें अचूक समजतें व त्यांचें छायाचित्र ताडून पहातां आलें असतें. गांधींच्या लिखाणाचा त्यांवरील परिणाम 'चित्रमय जगतां'त 'संबंध—ढालनाच्या' रूपानें प्रगटला होता. त्याच्याच पुढची पायरी महिकावती. तिच्या प्रस्तावनेंत बखरीचा अभ्यास साम्यवादी मुशींत ओतलेला आढळेल. तीवरून महाराष्ट्राचा जुनाट इतिहास पडताळूं म्हटल्यास ठोकरच लागावयाची. जावडेकरांची तिनें दिशाभूल केली, तेथें बेडेकर चकावे हें ओघानेंच आलें. राजवाड्यांच्या राधामाधवविलासचंपूच्या प्रस्तावनेच्या चिंधड्या टीकाकारांनीं उडविल्या तसें दुर्दैवानें महिकावतीचें न झाल्यामुळें ती आतां प्रमाण मानिली जात आहे. बेडेकरांनीं राजवाड्यांच्या पानावरून अस्सल बखरीचें पान उतरलें. त्यापेक्षां स्वतःच पान साठ उघडून अभ्यास केला असता तर त्यांस तें लिखाण १४४९ (४८ नव्हे) सालचें नसून १६४९ सालचें आहे, हें उमगलें असतें! राजवाड्यांच्या आधाराची ही अवस्था, तर इतर लुंग्यासुंग्यांचा आधार बेडेकरांनीं घेतला, त्यांत ते किती चुकले असतील? एखाद्या विषयांवर लिहिण्याचें धाडस करतात ते तज्ज्ञ, अशी दुर्दैवानें आज महाराष्ट्राच्या इतिहासाबद्दल समजूत बनली आहे व तिच्या खड्ड्यांत त्या लिखाणावर अवलंबून रहाणारे सतत पडत आहेत. याचा अर्थ त्या त्या लिखाणांत ग्राह्यांश मुळींच नसतो असा नव्हे. पण महाराष्ट्रांतील इतिहास—लेखक आपल्या कार्यास आवश्यक त्या शिक्षणानें समर्थ झालेले नसतात असा आहे. प्रस्तुत








ग्रंथाचा सातवा भाग लिहिण्यांत आपण ' धाडस ' करीत आहोंत हें वेडेकर जाणतात. पण नुसतें जाणून काय उपयोग ? त्यांच्या साहसाचा परिणाम चुकण्यांतच होणार.

वेडेकरांच्या कांहीं ऐतिहासिक चुका येथें सांगतों. प्रथम नकाशांपासून सुरवात करूं. पोतदारांच्या सूचनांवरून महानुभावकालीन महाराष्ट्राचा नकाशा परिशिष्ट ७ मध्यें दिला आहे. त्यांत फलेठाणमंडळ फलटणच्या पूर्वेकडे व आग्नेयेकडे एवढें मोठें दाखविलें आहे कीं त्यांत नकाशाच्या परिमाणाप्रमाणें विजापूर जिल्ह्यांतील कानडी मुलूखही येईल. वस्तुतः चक्रधर सूत्रांत फलटणच्या दक्षिणेस एवढेंच स्पष्ट म्हटलें आहे व तें योग्यही आहे. नंतर त्याच्या उत्तरेस वालेघाटाचा शेवट असल्याचें व तेथपर्यंत फलेठाण खंडमंडळ असल्याचें लिहिलें आहे. हा भाग म्हणजे सातारा, पुणें, नगर, सोलापूर व बीड हे जिल्हे होत. नंतर उभयगंगातीर–खंडमंडळ हें नकाशांत फक्त पाइनगंगेच्या दक्षिणेस व निजामाच्या आदिलाबाद परगण्यांत पसरलेलें दाखविलें आहे. वस्तुतः याचा आरंभ नाशकापासून गोदावरी नदी दाखवून त्यांत नाशिक जिल्हा, औरंगाबाद जिल्हा असें गोदावरीच्या दोन्ही तीरांवरील प्रदेश समाविष्ट असल्याचें दाखवावयास पाहिजे होतें. नाशीकच्या आग्नेयेस असलेल्या सिन्नर गांवीं चक्रधराचा मुक्कामच असे. यावरून त्याकाळीं तो प्रदेश मराठीचा होता यांत संशय उरत नाहीं. तिसरें खंडमंडळ मेघकर घाट म्हणजे परभणीच्या उत्तरेकडील डोंगराळ मुलूख. हा प्रदेश नकाशांत डोंगरांची ओळ त्रुटित काढून दाखविला आहे. त्या पलीकडील वऱ्हाड फाजील तिरकें काढून दाखविलें आहे. यामुळें मोठा घोटाळा होतो असें नाहीं. पण त्याकाळचें मराठीचें क्षेत्र साधार दाखवावयाचें म्हटल्यास महानुभावांच्या उल्लेखांप्रमाणें ताम्रपट सुद्धां मराठी भाषेसाठीं धुंडाळून त्यांवरून नकाशा तयार केला पाहिजे. डेक्कन कॉलेज इन्स्टिट्यूटचे एक नामांकित विद्यार्थी डॉ. नाईक यांनीं आपल्या यादवकाळावरील प्रबंधांत असा प्रयत्न केला आहे. श्री. वेडेकरांच्या पुस्तकांत दुसरा ऐतिहासिक नकाशा १७९५ सालचें मराठी साम्राज्य दाखविण्यासाठीं काढला आहे. त्यांत सबंध पंजाब व सरहद्द प्रांत मराठी साम्राज्यांत रंगविला आहे. ही माहिती वेडेकरांस कोणी दिली न कळे. नाना फडणिशी मुत्सद्दीपणानें हा प्रदेश मराठ्यांच्या साम्राज्यास चिकटविलेला दिसतो ! वस्तुतः मराठ्यांचे घोडे पुरे दोन वर्षेंही पंजाबांत नाचले नाहींत व पानिपतानंतर पुनः केव्हां मराठ्यांच्या अंमलाखालीं तो प्रदेश आला नाहीं. तसेंच गंगेपारचा अलहाबाद, काशी, लखनौ, दरभंगा वगैरे प्रदेश या नकाशांत ओढला आहे. हाहि प्रदेश मराठ्यांच्या घोड्यांनीं कधीं तुडविलेला नाहीं, मग राज्यास जोडणें दूरच. वेडेकरांच्या नजरेतून एवढ्या मोठ्या चुका निसटल्या यावरून त्यांचें मराठी इतिहासाचें ज्ञान अगदींच तकलुपी दिसतें.

वेडेकरांचें महाराष्ट्राच्या राष्ट्रत्वाचें विवेचन असेंच इतरांच्या मतावर आधारलेलें आहे. महाराष्ट्रांत इतिहाससंशोधनाचें प्रवर्तक कारण, इंग्रजी शिक्षणामुळें आलेला एकोणिसाव्या शतकांतील आक्रमक राष्ट्राभिमान हें असल्यामुळें, संशोधनांत सांपडलेल्या ओळींचा अर्थ आपल्याला सोइस्कर असा लावण्याचा प्रघात रूढ झाला. बहुतेक इतिहाससंशोधक देशभक्त असून त्यांना राज्यघटनेच्या तंत्राचें ज्ञान बहुधा नव्हतें. रानड्यांना ज्ञान होतें, पण त्यावेळीं माहिती उपलब्ध झालेली नव्हती. दुसरी आपत्ति अशी कीं हे सर्व विवेचक ब्राह्मण होते. स्वतःच्या देशभक्तीवरून ते आपल्या अठराव्या शतकांतील पूर्वजांचा देशाभिमान गृहीत धरीत होते. वस्तुतः शाहूच्या आगमनानंतर कोंकणांतलि ब्राह्मण उदयास आले, त्यांवर महाराष्ट्रसंस्कृतीचा ठसा मुळांतच दुर्बल होता. देशस्थ ब्राह्मण हे देशावरील शेंकडो वर्षांचे वतनदार असून महाराष्ट्रीय संस्कृति त्यांचीच निर्मिति होती. त्यांना महाराष्ट्राचा किंबहुना दक्षिणापथाचा अभिमान वसाहतकाळापासून चालत आलेला होता. म्हणूनच श्रीपतराव प्रतिनिधि, नर्मदा ओलांडण्यापूर्वीं शहाजीच्या वेळेपासून व विजापूरकरांच्या राज्यापासून मराठीच्या कक्षेंत आलेली तंजावरापर्यंतची दक्षिण प्रथम एकसंधी करा, असें शाहूच्या दरबारांत प्रतिपादन करीत होता. महाराष्ट्रीय देशस्थ ब्राह्मणांचे शरीरसंबंध तेलंगे किंवा








कानडी ब्राम्हणाशींहि सुलभतेनें होतात. त्यामुळें त्यांना हा सर्व प्रदेश पुलिकेशीच्या त्रिमहाराष्ट्रांचा वारसाच वाटत होता. या उलट उपरी कोंकणांतील ब्राह्मण कोठेंहि जाण्यास तयार होते. स्थानिक देशस्थांच्या वतनदारीच्या अभिमानाशीं भांडणें पुरवत नसल्या-मुळें स्वतंत्र प्रदेशच आपल्या ताब्यांत आणून आपली नवी वतनदारी स्थापण्याच्या ते विचारांत होते. छत्रपती शाहू मोगलांच्या दरबारांत वाढल्या-मुळें मनानें दिल्लीशीं जोडलेला होता. याचाच परि-णाम, महाराष्ट्राचें एकीकरण करण्याचा शिवाजीचा प्रयत्न मागें पडून गुजरात, माळवा, बुंदेलखंड व्याप-ण्याचा बाजीरावी मुत्सद्दीपणा पुढें सरसावला व याचेंच अखेर पर्यवसान महाराष्ट्राचा भेद करणारा मोगल निजाम कायम राहाण्यांत झालें. कोंकण्या ब्राह्मणाशीं स्थानिक देशस्थांचें जें वैमत्य, त्यामुळेंच महाविदर्भांतील देशस्थ ब्राह्मण नेहमीं पेशव्यांच्या विरुद्ध व म्हणूनच निजामाच्या बाजूस राहिले. हा सर्व प्रश्न विस्तारानें सांगितला पाहिजे व येथें तो करतां येणार नाहीं. पण जेव्हां आजचे देशभक्त ब्राह्मण सांगतात कीं पेशवे हे शिवाजीच्याच पावलांवर पाऊल ठेवून चालत होते, तेव्हां ते नकळत सत्याचा अपलाप घडवून आणीत असतात—हें इतिहासाभ्यासकांनीं लक्षांत ठेविलें पाहिजे. जाधव, घोरपडे, निंबाळ-कर, खंडागळे, चव्हाण, पांढरे प्रभृति मराठे सरदार निजामाच्या बाजूला गेले व दाभाडे, गायकवाड प्रभृति उरलेले सरदार निष्प्रभ होऊन, नांवानें नसलें तरी वस्तुतः सेनापतित्व ब्राह्मण पेशव्यांच्या स्वाधीन झालें तेव्हांच शिवाजीच्या शहाणपणानें रचलेल्या घटनात्मक अष्टप्रधान मंड-ळाचे बारा वाजले. शिवाजी स्वतः राज्यनिर्माता असल्यामुळें स्वयंभूच सर्वकार्यस्वतंत्र होता, तरी राष्ट्रसंवर्धनाच्या दृष्टीनें त्यानें अष्टप्रधानमंडळाची योजना आंखली. पेशवे निर्माते नसतांनाहि त्यांनीं ही शिवाजीची निर्मिति संपुष्टांत आणून, स्वतः सर्वकार्यस्वतंत्र होण्याचा घाट घातला! हीच मराठ्यांच्या इतिहासांतील खरी शोककथा होय. यामुळेंच रामदासांचा उपदेश व शिवाजीची करणी फुकट जाऊन महाराष्ट्र सदा विभागलेलाच राहिला. दिल्लीचा मोगल पातशहा ताब्यांत घेऊनहि दक्षिणें-तील मोगलाई नष्ट होऊं शकली नाहीं. **निजाम-पेशव्यांची युद्धें हीं प्रामुख्यानें मराठ्यांमराठ्यां-तील युद्धेंच होतीं.**

उत्तरेंतील मराठ्यांच्या स्वाऱ्यांतूनही असाच प्रकार पुष्कळदां दिसतो. रघूजी भोसल्यानें दक्षिण दिग्वि-जय करून अर्काट, त्रिचनापल्ली हीं जिंकिलीं व तेथें मुरारराव घोरपडे किल्लेदार नेमला. निजामानें चंद्रसेन जाधव व जानोजी निंबाळकर बरोबर घेऊन ही दोन वर्षांची स्वारी एका वर्षांत उखडून टाकून आपला सुभेदार तेथें नेमला! नंतर रघूजी बंगाल्यांत जाऊन त्यानें तो प्रदेश आहारीं आणला, तर तेथें नानासाहेब पेशवा पाऊण लाख फौजेसहित जातो व अलीवर्दीखानाचा पाठपुरावा करून रघूजीला पिटून लावतो! होळकर आणि शिंदे यांच्या आपसांतील चुरशीमुळें मराठ्यांचें उत्तरेंतील राजकारण सतत बिघडत राहिलें व त्याचा फायदा मुसलमान, रज-पूत व बुंदेले यांनीं घेतला. येथें हें रामायण सांग-ण्याचा हेतु एवढाच कीं आज मुंबई इलाख्यांतील महाराष्ट्र व मध्यप्रांतांतील महाराष्ट्र यांची जी दुही दिसते तिचा उगम कळावा. स्वतः शिवाजी पितृवंशाकडून व मातृवंशाकडून महाविदर्भीयच होता. जाधवांचें शिंदखेड आजच्या वऱ्हाडांत आहे व मालोजीचें वेरूळ औरंगाबाद जिल्ह्यांत आहे. त्याचा हेतु तो प्रदेश महाराष्ट्रांत सामील करण्याचा नसेल असें कोण म्हणेल? याउलट श्रीवर्धनच्या देशमुखीचा वारसा सांगणाऱ्या व तरीही जंजीरा कधींही न उखडून टाकणाऱ्या पेशव्यांना महाराष्ट्राचा अभिमान कितीसा असणार? प्रतिनि-धीला किंवा आंग्र्यांना तो उखडून टाकण्याचें श्रेय मिळूं नये व सामर्थ्य राहूं नये एवढीच बाजीरावाची तरतूद! अशा रीतीनें हा प्रश्न उकलावयास लागलें तर आजचे देशभक्त इतिहासकार चिडतात व हें सत्य उजेडांत आणणारासच होतें कीं नव्हतें करून टाकतात. शिवाजीला इच्छा असून तसें करण्यास त्याच्या आरंभींच्या काळीं शक्ति नव्हती व सवडही नव्हती. पेशव्यांना इराण—तुराणच्या लोकमताचीच जास्त काळजी लागलेली दिसते, महाराष्ट्रांतील लोक-










मत त्यांना ऐकूं येत नव्हतें. तरीही पेशवाईचे बारसदार आजचे इतिहासकार, शिवाजीनेंही महाराष्ट्र एकीकरण केलें नाहीं मग पेशव्यांनाच दोष कां, असा टोमणा मारतांना आढळतात. त्यांच्या चलाखीमुळें मराठ्यांच्या शिवाजीस्थापित राज्याचें अधिष्ठान काय, त्याच्या राज्यपद्धतीचें लक्ष काय, यांबद्दल महाराष्ट्रांत भयंकर गैरसमज पसरलेला आहे व तो तसा पसरवीत राहूनच आजच्या महाराष्ट्राचा प्रश्न सोडविण्याचा या देशभक्त पुढाऱ्यांचा बेत आहे, तो कसा सिद्धीस जाणार?

शिवाजीचा हेतु मराठ्यांचे गोमटें करण्याचाच होता. त्यासाठीं सर्व मराठे एकत्र येऊन त्यांचें राष्ट्रीय दृढीकरण व्हावें असाच मार्ग त्यानें आंखला होता. आपल्या कार्याच्या विरुद्ध जाणारे मोरे, घोरपडे यांसारखे मराठेहि त्यानें कापून काढले. सावंत, जवारकर यांसारखे स्वतंत्र संस्थानें स्थापूं म्हणणारे आपल्या राज्यांत सामील केले. वतनदार, सरदेशमुख, सरदेसाई यांचा वळमोड करण्यासाठीं त्यांचीं वतनेंच अमानत करून सर्वांना एका राज्याखालील "विलीनीकरणास" मोकळें केलें. त्याचा मराठा शब्द आजच्या उच्च मराठ्यांपुरताच संकुचित नव्हता, हें त्यानें ब्राह्मण, मावळे, हेटकर, भंडारी, कोळी हेच काय पण मुसलमान व बाटे ख्रिस्तीही आपल्या राज्यरचनेस सहाय्य घेतले, यावरून उघड होतें. त्याचा हेतु अखिल भारतव्यापी मोगलसाम्राज्यांतर्गत स्वराज्य मिळविण्याचा नव्हता, हें त्याच्या राज्याभिषेकावरून व नवीन शिवराई होन नाणें पाडण्यावरून स्पष्ट होतें. पेशवाईत महाराष्ट्रांतील नाणीं सर्व बादशाही शिक्क्यांचीं होतीं. **राज्यांतील प्रजेवर राजसत्तेव्यतिरिक्त इतरांचें तिळमात्रहि स्वामित्व शिवाजीस मंजूर नव्हतें,** असें अमात्यांची राजनीति स्पष्ट सांगते. तेथें तो जहागिरी कशा देईल? शिवाजी इंग्लंडांतील ट्यूडर राजांची पद्धति अमलांत आणून त्या द्वारें सत्राव्या शतकांतच राष्ट्रीकरण घडवूं पहात होता. ट्यूडरांप्रमाणेंच त्याचे अष्टप्रधान व अंमलदार पगारी कामावर असेपर्यंतचे नोकर होते. वंशपरंपरा पदें व त्यांना स्वतंत्र जहागिरी तो देत नव्हता. एका प्रदेशांतहि तो एकच अधिकारी फार काळ ठेवीत नसे. शिवाजी बहुजनसमाजाच्या हितासाठींच राज्य हाकीत असे हें त्याच्या रयतेवर जलाल न करण्याच्या व तिच्या मालकीच्या भाजीच्या देठावरहि मन न ठेवण्याच्या त्याच्या हुकुमांवरून सिद्ध आहे. आयतखाऊ, वतनदार, इनामदार, मध्यस्थ, दांडगोवा, यांवर त्याची करडी नजर होती; प्रजेवर नव्हे. असें असतां बेडेकर त्यास अराष्ट्रीय राज्यस्थापक समजतात, यांत त्यांची गल्लत होत आहे. बहुजनसमाजाच्या मतांचा चौरस प्रातिनिधिक असा राजा शिवाजीहून अन्य क्वचितच आढळेल. जर बेडेकर सहेतुक निबंधलेखकांच्या बाबदूक उद्गारांचा आधार तपासून मूळ शोधितील तर त्यास त्यांची चूक कळून ते मत बदलतील यांत शंका नाहीं.

शिवाजी हिंदुधर्मरक्षक होता पण साम्राज्यवादी नव्हता. मुसलमानी राज्यांच्या संघटित शक्तींना तोंड देऊन स्वतःचें राज्य स्थापणें त्यास इष्ट असल्यामुळें त्यानें जेथें साधेल तेथें हात मारून आपण आपल्या कार्यास बळकट होण्याची खबरदारी घेतली. त्यानें सुरतेवर हल्ले केले ते महाराष्ट्राचें साम्राज्य गुजराथ्यांवर व्हावें म्हणून नव्हे, तर मोगल बादशहाचें सामर्थ्य पोखरलें जावें म्हणून केले. बाजीरावाप्रमाणें मुळांवर घाव घालून मुसलमानी राज्यें एकाएकी मोडतील अशी त्याची समजूत नसल्यामुळें त्यानें राजधान्यांपासून दूर असणाऱ्या प्रदेशांवर हात मारण्याचा क्रम ठेविला. आपलें महाराष्ट्रांतलि छोटें राज्य किती धोक्यांत आहे हें अनुभवानें ओळखून प्रसंगीं जिवंत राहण्यास उपयोगी पडावें म्हणून त्यानें जिंजीचें राज्य जिंकून तेथें आपल्या राज्याच्या रक्षणाची पिछाडी निर्माण करून ठेविली. यांतहि त्याचा हेतु इतर प्रांतांतील संपत्ति लुटून केवळ महाराष्ट्राची भर करावी असा नसून हिंदूंचें असें एक स्वतंत्र राष्ट्र मुसलमानांच्या नाकावर टिचून निर्माण करण्याचा होता. ही गोष्ट ज्यांना कळत नाहीं ते साम्यवादी शिवाजीच्या संस्कृत व हिंदी कवींच्या आश्रयदात्याचें हिंदुत्वप्रसारक कार्य समजूं शकणार नाहींत हें उघड आहे. शिवाजीच्या मराठीला आश्रय नव्हता म्हणजे त्याची तुकाराम, रामदास, रघुनाथ पंडित प्रभृति कवींना मदत नव्हती असें कोणी समजत असेल तर तें भ्रममूलक आहे. शिवाजीची भापा-








# संयुक्त महाराष्ट्र : समीक्षण—प्रा. शेजवलकर

शुद्धि सफळ झाली नाहीं हें म्हणणेंहि अज्ञानमूलक आहे. पेशवाईंत राज्यकर्त्यांनीं दिल्लीवर नजर ठेवल्यामुळें फारसी भाषा राजकारणांत जिवंत राहिली एवढेंच. पण खुद्द महाराष्ट्रांत पेशव्यांना पंतप्रधानच म्हणत असत. हें मोडी पत्रव्यवहार वाचल्यावर कळेल. शिवाजीचा हेतु तडीस जाता तर मराठी अखिल हिंदुस्थानची राजभाषा झाली असती. दक्षिणेंत तर ती झालीच होती. पेशवा हा शब्द इकडच्या इतिहासामुळें जास्त प्रचलित झाला. तत्पूर्वी मराठी राज्य शिवशाही हेंच नांव जास्त रूढ होतें. शिवाजीचा प्रयत्न मुसलमानी राज्यें नाहींशीं करून हिंदु राज्यें वाढविण्याचा होता. पेशव्यांचा हेतु अखिल भारतवर्षमान्य अशी मोंगलबादशाही कायम ठेवून ती स्वतः चालवून दाखविण्याचा होता. या मूलभूत भेदांमुळें अठराव्या शतकांत महाराष्ट्राचा प्रश्न संपूर्ण सोडविला जावयाचा राहून नंतरची अनवस्था निर्माण झाली.

बेडेकरांनीं राजकीय वा ऐतिहासिक जरूरी व सांस्कृतिक ध्येयवाद यांची गफलत आपल्या मांडणींत केली आहे, ती शास्त्रीय विवेचनास बाध आणते. योग्य व इष्ट ध्येय साध्य होईल वा न होईल, पण राजकीय, आर्थिक इत्यादि दडपणांचा बागुलबोवा दाखवून विशिष्ट ध्येयाच्या खरेपणाची कबुली मागणें न्याय्य नव्हे. बेडेकर ध्येयवादी व कार्यकर्ते दोन्हीहि असल्यामुळें, त्यांच्या प्रस्तुत विवेचनावर आजच्या गरजेची छाया पडली आहे. समाजाच्या शाश्वत मूल्यांपेक्षां दैनंदिन अडचणींची जाणीव त्यांना जास्त दिसते. प्रचलित राजकारणांस ही उपयुक्त आहे. पण ज्या भविष्यांतील ध्येयांवर प्रचलित घडामोडींचा इष्टानिष्ट परिणाम घडणार आहे त्याची वाट काय? खुद्द साम्यवाद्यांच्या भविष्यपुराणांत राज्यसंस्था सुकत जाणार असा आशावाद व सुकून जावी असा ध्येयवाद आहे. अशा वेळीं एकात्म राष्ट्रांचें व जगाचें स्वरूप काय असेल, होईल, व्हावें? संस्कृति जनसमूहांतील थोड्यांचा वारसा असतो कीं सर्वांचा? व सर्वांचा करावयाचा म्हटलें तर तें आशावादी कीं वास्तववादी? असंस्कृत रानटीपणांत कां होईना, पण जगणें हें इष्ट, कीं त्याहून भूतलावरून नष्ट होणें बरें? अशासारखे विचित्र प्रश्न आजच्या राष्ट्रवादाच्या मार्गें दडलेले आहेत. गेल्या शतकांतील नागड्या राष्ट्रवादाचे दुष्परिणाम जग अनुभवून चुकलें आहे. संयुक्त राज्यांत त्याहून जास्त शांति, सुख, संस्कृति यांचें अस्तित्व होतें असें दिसतें. निदान पूर्वसंकल्पित, नियोजित अमानुषता, निर्घृणता, अनीति हीं तर खासच कमी होतीं. आणि पुढील काळांत निर्मनुष्यता निर्माण करूं शकणारीं हत्यारें मानवांच्या हातांत येणार आहेत. महाराष्ट्रांत खरी राष्ट्रभावना किती स्फुट, विस्कळित आहे याचा बोध या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत इतक्यांतच प्रा. फाटकांना जी उबग या प्रकरणांबाबत आली आहे त्यावरून होतो. प्रेमभावना नसो, निदान स्वसंरक्षणासाठीं तरी एक होऊं या असें ते म्हणतात. ही विचारणीय समस्या नाहीं असें कोण म्हणेल?

मार्क्सवाद्यांच्या ठोकळेबाज तत्त्वज्ञानामुळें त्यांना जेथें जेथें शेतकरी व कामकरी वर्ग घुसडण्याची सवय आहे. महाराष्ट्रांत भांडवलशाही गुजरातप्रमाणें न वाढल्यामुळें येथें शेतकरिवर्गाचा आश्रय साम्यवाद्यांनीं केला आहे. जगांतील सर्व कामकरी व शेतकरी म्हणजेच बहुसंख्य उठले तर ते कोणताहि प्रश्न आपणांस हवा असा सोडवूं शकतील, हें संख्याबलानेंच निश्चित आहे. पण संस्कृति ही कोणाची निर्मिति असते, हें मानण्यावर अशी गोष्ट होणें इष्ट कीं अनिष्ट हें ठरणार आहे. इतिहास पाहतां असें दिसतें कीं संस्कृति ही लोकोत्तर पुरुषांची निर्मिति असते. बुद्धिमान्, शीलवान्, प्रतिभावान्, उद्योगी, पराक्रमी, धाडसी, शोधक अशा इसमांकडून ती निर्मिली, वाढविली व राखिलीही जाते. अनातोले फ्रान्स याचें असें मत होतें कीं कोणत्याही राष्ट्राची संस्कृति हातांच्या बोटांवर मोजण्याइतक्या थोड्या लोकांतच केंद्रित झालेली असते. हें मत वैयक्तिक व आत्यंतिक मानलें व बहुसंख्य झुंडीकडून कोणत्याहि गोष्टीचा चक्काचूर होणें शक्य असलें तरी सर्वांत उच्च गोष्टी निर्माण होत रहातील किंवा राखिल्या जातील असें कल्पवत नाहीं. पण हा मुद्दा विचारानें सामाजिक प्रश्न सोडविणाऱ्यांचा आहे, बहुसंख्यांच्या







पाशवी बळावर आजच्याप्रमाणें जगाची रचना करूं म्हणणाऱ्यांचा नाहीं. आज हिंदुस्थानांत अधिकाररूढ झालेली तथाकथित लोकशाहीहि या गोष्टीस अपवाद नाहीं. अशा स्थितींत या गोष्टींची चर्चा हा एक पाण्यावर चित्रें कोरण्याच्या खेळासारखा खेळ वाटतो. राष्ट्रांतील बुद्धिमान् वर्ग हा एकतर कोपऱ्यांत ढकलिला गेला आहे किंवा बहुसंख्य मताचा गुलाम झाला आहे. तो अधिकारावर नाहीं, तोंपर्यंत असल्या गोष्टींची चर्चा वृथा कालक्षेप मानला पाहिजे आणि आम्हाला ही परिस्थिति आतां बदलेल अशी आशाही वाटत नाहीं.

या ग्रंथाचा चांगुलपणा येवढाच कीं त्यांत सर्व परस्परविरोधी मतें अनेक पुस्तकांत धुंडून जशींच्या तशीं दिलीं आहेत. त्यामुळें या विषयाच्या अभ्यासकांची अनायासें सोय होते. मात्र मतें घेतांना साम्यवादी मतानुरोधें पंक्तिभेद राखलेला नाहीं. 'श्वानं युवानं मघवानं' चाच सारा सवगोलंकार आहे. वेडेकरांची पद्धत, मांडतांना तथाकथित विद्वान् लेखकांच्या मतांचा गोंधळ दाखवून व तीं परस्पर मारून टाकून, आपला स्टॅलिनप्रणीत राष्ट्रसिद्धान्त मराठ्यांच्या गळीं उतरविण्याची आहे. 'राजाचें इंग्लिश' व्याकरणाचे कर्ते फाउलर बंधू यांनीं ज्याप्रमाणें ग्लॅडस्टन, मोर्लेप्रभृति उत्तम लेखकांच्या चुका काढून आपलें व्याकरण संपादिलें आहे तसाच डाव वेडेकरांचा आहे. पण तो या विषयांत साध्य नाहीं. 'इतर सर्व चूक, ढिले, मग माझा सिद्धान्त कां घेत नाहीं,' असा वेडेकरांचा कटाक्ष दिसतो. स्टॅलिनचा राष्ट्रसिद्धान्त विचार करण्यास योग्य आहे. पण तो प्रतिपाद्य म्हणून, प्रतिपादित सर्वमान्य म्हणून नव्हे. शांत खरा प्रकार असा कीं, ज्यांचीं मतें उद्धृत करण्यांत आलीं आहेत, त्यांनीं तीं वेडेकरांना विवक्षित असलेल्या प्रश्नास उत्तरें म्हणून दिलेलीं नव्हतीं. सामान्य विवेचनांत, प्रसंगानुरोधें, राजकारणाच्या सोयीनुरूप, विशिष्ट हेतूनें, अशीं तीं बाहेर पडलेलीं आहेत. त्यावरून विचारांचा ढिलेपणा आमच्या धुरीणांत किती दिसतो तें पहाणें मौजेचें आहे. पण राष्ट्रकल्पनेचें शास्त्रीय विवेचन कर्तव्य तर, मृत राष्ट्रसंघाच्या झिमर्न, मादरिआग, झँगविल प्रभृति अभ्यासकांनीं त्याचें जें विवरण केलें होतें तें पाहिलें पाहिजे. पण वेडेकरांचा तो अभ्यास झालेला दिसत नाहीं. ज्याप्रमाणें मागें श्री. लालजी पेंडसे यांनी सर हेन्री मेन, बेडन पॉवेल, मॅकेंझी वॅलेस, व्हिनोग्रॅडाफ, मेटलँड, सीबॉम प्रभृति लेखकांच्या ग्रंथांचा गाढ अभ्यास करण्यापूर्वीच शिवकालीन क्रांतीचें स्वरूप, त्या काळच्या ग्रामसंस्था, वतनें, सरंजाम, इत्यादिकांच्या त्रोटक माहितीवर मांडण्याचा जातमूत प्रयत्न केला होता, तोच प्रकार वेडेकरांचा झाला आहे. तरी पण वेडेकर तत्त्वानें साम्यवादी असले तरी हाडानें, मध्यमवर्गीय सज्जन आहेत. त्यामुळें त्यांच्या लिखाणास दर्पोक्तीच्या 'व्होडका'चा वास येत नाहीं.

सलंग मायभूमि, एक लोकभाषा, आर्थिक सहजीवन व एकराष्ट्रीय सांस्कृतिक भावना यांच्या पायावर एकात्म असा ( संयुक्त ) महाराष्ट्र व अशा एकात्म राष्ट्रांचें संयुक्त भारत, अशीं ग्रंथकारांनीं प्रतिपादिलेली योजना मान्य होण्यास अडचण पडूं नये असें वाटतें.

---

# ग्रामनिष्ठ श्री. यशोधरम्मा

श्रीमती यशोधरम्मा दासप्पा या म्हैसूर संस्थानांत कस्तुरबा गांधी ट्रस्टच्या प्रतिनिधि आहेत; यशोधरम्मा आदर्श सेविका आहेत; चारित्र्यवान् आहेत; जीवन कृतार्थ करण्याचा समय आला असतांना सर्वस्वाचा त्याग करण्याची त्यांची शक्ति आहे. त्यांच्यांत धर्मबुद्धि व ग्रामीण जीवनाबद्दल अतोनात प्रेम आहे. त्यांचें शिक्षण इन्टरपर्यंत झालें आहे. मध्यम वर्गांतील अेका सुखी कुटुंबांत त्यांचा जन्म व संवर्धन झालें. तथापि त्या शहरांत राहाणें पसंत करीत नाहींत. खेड्यांत राहून स्त्रीसेविका तयार कराव्या, ग्रामीण स्त्रियांची खूप मनःपूर्वक सेवा करून त्यांचा विकास करावा ही त्यांची तळमळ आहे. म्हैसूरमधील लोक त्यांच्या सेवाकार्यावर मुग्ध आहेत. घरें, जमिनी, लांकडें, पैसे इत्यादि देणग्यांचा वर्षाव ते यशोधरम्मांवर करीत असतात. यशोधरम्मा या साऱ्या देणग्या ट्रस्टच्या नांवें करून टाकतात. यशोधरम्मांचे पति श्री. दासप्पा हेहि त्यांच्या जोडीनें खेड्यांतून सेवाकार्य करीत होते. दोघांचे एक विचार. दोघांची एक राहाणी. याप्रमाणें वर्षांमागून वर्षें गेलीं. त्या दंपतीबद्दल जनतेंत बहुमान वाढत चालला. खेड्यांतील प्रजा या लोकहितकारी दंपतीची पूजा करूं लागली.

एकाएकीं संस्थानांत राजसत्तेविरुद्ध चळवळ सुरू झाली. कर्तव्यनिष्ठ श्री. दासप्पांना या चळवळीची झळ लागली. यशोधरम्मा आपलें विहित कार्य करीत होत्या. श्री. दासप्पा तुरुंगांत गेले. कांहीं आठवड्यांनंतर दासप्पांच्या आजाराची खबर बाहेर आली. यशोधरम्मांनीं आपल्या मनांत अस्वस्थता येऊं दिली नाहीं. कामांत खंड पडूं दिला नाहीं. स्वतःची प्रकृति महिन्यांतून पंधरा दिवस बिघडलेली असते तरी त्या गोष्टीचीही पर्वा केली नाहीं.

अेका दिवशीं स्नेह्यांनीं येऊन सांगितलें, "यशोधरम्मा, तुमचे पति अतिशय आजारी पडल्यामुळें त्यांची सुटका करण्यांत आली आहे." यशोधरम्मा पतीची सेवा करण्यासाठीं निघाल्या. त्यांनीं एका खेड्यांत शोध केला. तेथें दासप्पा सांपडले नाहींत; दुसऱ्या खेड्यांत गेल्या, तेथेंही ते नव्हते. तिसऱ्या खेड्यांत प्रवेश केला. सारख्या खेडीं धुंडाळीत होत्या. पण दासप्पा सांपडेनात. लोक म्हणूं लागले, "यशोधरम्मा, तुमचे पति बंगलूर येथें रेडियोवर भाषण करीत आहेत. आणि तुम्हीं हें काय करीत आहां ?" यशोधरम्मांनीं उत्तर दिलें— "माझे पति खेड्यांचे रहिवासी आहेत. म्हणून ज्या ज्या खेड्यांतून त्यांनीं काम केलें तीं तीं धुंडाळून मी त्यांचा शोध घेत आहे." लोक हंसून म्हणाले, "पण ते खेड्यांत नाहींत. शहरांत आहेत." यशोधरम्मा म्हणाल्या, "तसें होणारच नाहीं. माझे पति शहरांत राहाणें पसंत करणार नाहींत. ते खेड्यांतच वास्तव्य करीत असले पाहिजेत." पण या खेपेस यशोधरम्मांचा कयास चुकला. दासप्पा संस्थानच्या राजधानींत बंगळूरमध्येंच होते व रेडियोवर व्याख्यान देत होते. लोकांच्या चळवळीस यश आलें. राजानें लोकशाही राज्यकारभार जाहीर केला. लोक दासप्पांना मंत्रिमंडळांत जाण्यासाठीं गळ घालूं लागले. पण दासप्पा निःस्पृह होते. शिवाय आपल्या पत्नीला तें आवडणार नाहीं, हें त्यांना माहीत होतें. त्यांनीं मंत्री बनण्यास नकार दिला. तेव्हां लोकांनीं म्हटलें, "जर








सज्जन लोक अधिकारावर येणार नाहींत, तर नालायक सत्तालोलुपांच्या हातीं अधिकार जाईल व प्रजेचें नुकसान होईल.'' जनतेच्या आग्रहास मान देऊन दासप्पांनीं संमति दिली. ते प्रधान झाले. लोकांनीं जयजयकार केला. पण दासप्पांच्या मनांत धाकधूक होती. आपली पत्नी काय म्हणेल, तें ते जाणून होते. प्रधान झाल्यावर ते पत्नीच्या दर्शनास गेले. बाहेर अंगणांत उभे राहिले व एका मित्राला आंत पाठवलें. मित्र येऊन सांगूं लागला, '' यशोधरम्मा, तुमचे पति जनतेच्या आग्रहास्तव मंत्रिमंडळांत प्रविष्ट झाले. लोकांचा त्यांच्यावर पूर्ण विश्वास आहे. तुमच्या भेटीस ते आले आहेत. बाहेर उभे आहेत.'' यशोधरम्मा म्हणाल्या, ''माझे पति मंत्रिमंडळांत गेलेच कसे? त्यांनीं आपलें ब्रीद सोडलें. मला त्यांची भेट घ्यावयाची नाहीं. हें घर त्यांचें नव्हे. त्यांना सांगा, राजानें त्यांना दिलेल्या वाड्यांत त्यांनीं जाऊन राहावें. माझ्याशीं त्यांचें कांहीं एक काम नाहीं.'' लोक म्हणूं लागले '' यशोधरम्मा तुम्हीं आपल्या पतीला सोडलेंत का?'' यशोधरम्मां म्हणाल्या, '' मी त्यांना सोडलें नाहीं. त्यांनींच मला सोडलें. आम्हीं दोघांनीं प्रथमपासून स्वतःस ग्रामसेवेस वाहून घेतलें होतें. खेड्यांत राहून जनसेवा करीत होतों. मीं माझें काम चालूच ठेवलें आहे. ते मात्र आपलें जीवन सोडून शहरी जीवनांत पोंचले. अधिकारपदावर गेले. मी कांहीं त्यांच्या पाठीमागें जाणार नाहीं. त्यांनीं येथून निघून जावें. आपल्या निवडीचा मार्ग स्वीकारावा.''

शेवटीं सर्वांच्या समजावणीला मान देऊन जेव्हां यशोधरम्मा पतीच्या भेटीस गेल्या तेव्हां एका दिवसांत परत आल्या. '' अधिकारपदावर असणें फारच वाईट. मला खराब अनुभव आले. एका दिवसांत छप्पन्न माणसें माझ्या भेटीला आलीं व आपलीं खासगी कामें पतीकडून करवून घेण्यास गळ घालूं लागलीं. लालूच, असत्य, दंभ यांना मर्यादा नाहीं. मी कधींच त्यांच्या वाड्याची पायरी फिरून चढणार नाहीं. लोक माणुसकी जाणत नाहींत. त्यांना स्वार्थच फार असतो.'' यशोधरम्मा तावडतोब खेड्यांतील आपल्या केन्द्रावर निघून गेल्या. पतीच्या प्रधानकीचें स्मरणही त्यांनीं आपल्या मनांतून काढून टाकलें.

पहिल्या महिन्याचा पगार पांचशें रुपये येतांच दासप्पा पत्नीकडे गेले. यशोधरम्मानें सारा पगार त्यांचे जवळून काढून घेतला व कस्तुरबा ट्रस्टमध्यें जमा केला. '' सरकारनें दिलेला पगार गरीबांच्या कामीं खर्च झाला तर केलेलें पाप थोडें तरी धुवून निघेल.'' त्या म्हणाल्या.

खेड्यांच्या अभिमानी यशोधरम्मा परवा दिल्ली येथें भरलेल्या कस्तुरबा ट्रस्टच्या प्रतिनिधींच्या बैठकीस हजर होत्या. त्यांची तडफ व निःस्पृहता पाहून सर्वांनीं त्यांचें कौतुक केलें. शुद्ध जीवन आणि अचल निष्ठा यांमुळें त्यांचें चारित्र्य उज्ज्वल झालें आहे. त्यांच्या संस्कारी जीवनाचा प्रकाश म्हैसूरच्या खेड्यांतील भगिनींना पथप्रदर्शक झाल्याविना राहाणार नाहीं. ग्रामीण जीवनापासून दूर राहूं इच्छिणाऱ्या अनेक सुशिक्षित शहरी महिलांसही यशोधरम्मांची कथा स्फूर्तिप्रद होईल अशी आशा आहे.

— प्रेमा कंटक

---






सारसंकलन

# सिडने वेब यांचें व्यक्तिमत्त्व

आंतरराष्ट्रीय कीर्ति मिळविलेले समाजवादी संशोधक व ग्रंथकार सिडने वेब हे १४ ऑक्टोबर १९४७ ला निधन पावले. त्यांच्या सहधर्मचारिणी बीयाट्रिस वेब ह्या चार वर्षांपूर्वीच इहलोक सोडून गेल्या. समाजवादावर व कम्युनिझमवर जन्मभर व्यासंग कायम ठेवून त्या क्षेत्रांत विश्वकोशासारखे अचाट संशोधनपर ग्रंथ लिहिण्यांत आपलें सर्व आयुष्य वेंचून कृतार्थ होणारें हें वेब-जोडपें अत्यंत असामान्य होय. सिडने वेब यांना आपल्या ग्रंथलेखनांत व जीवनकार्यांत बीयाट्रिस वेब यांचें इतकें साहाय्य झालें आहे कीं, सिडने वेब यांच्या जीवनाचा नुसता उल्लेख जरी करावयाचा झाला तरी त्यांच्या सहधर्मचारिणीचा उल्लेख करणें अपरिहार्य आहे. मिसेस मार्गारेट कोल यांनी १९४५ सालीं बीयाट्रिस वेबचें चरित्र लिहिलें त्याला बर्नार्ड शॉनीं प्रस्तावना लिहिली आहे. शॉ हे वेब दांपत्याचे जिवलग स्नेही, अत्यंत मोठे चाहते. वेब जोडप्यासंबंधीं त्यांनीं जें त्या 'प्रस्तावनेंत लिहिलें त्याचा सारांश खालीं दिला आहे.

मिसेस कोल यांनीं लिहिलेल्या चरित्राच्या द्वारा आपणांस एका असामान्य स्त्रीचें नुसतें सार्वजानिक जीवनच कळतें असें नाहीं; तर एका सुखी वैवाहिक जीवनाचा तन्मयतेनें व मनोवेधक रीतीनें लिहिलेला वृत्तांतहि वाचावयास सांपडतो. सर्वांचें वैवाहिक जीवन असेंच सुखी झालें असतें, तर इंग्लंडच नव्हें सर्व सुसंस्कृत जग, फेबियन लोक चाहतात, तसा स्वर्ग बनलें असतें.

वेब पतिपत्नींचें हें वैवाहिक जविन केवळ अपवादात्मक आणि दुर्दैवानें अपत्यहीनच नव्हे, तर सामान्य जनांच्या दृष्टीनें पाहिलें तर संन्यस्त व हर्षविरहित होतें. त्यांना राष्ट्रीय खेळ व करमणुकी सहजसाध्य व सुलभ असूनहि, त्यांची त्यांना आवड नव्हती. डर्बी येथील रेसच्या मैदानावर बीयाट्रिस आढळणें किंवा सिडने कोल्ह्याच्या शिकारींत दंग झाल्याचें पाहणें दूरापास्तच होतें. व्यायाम मात्र ते धार्मिक वृत्तीनें घेत. बीयाट्रिसबरोबर चालणें मला अशक्य होई. कित्येक वर्षे सायकलवरून रपेट करण्याची त्यांनीं नुसती संवयच ठेवली होती असें नव्हे, तर तें एक कर्तव्य आहे असें ती दोघें मानीत. सिडने अकल्पितपणें पुष्कळ वेळां घेरी येऊन पडत असे. एकदां ते असेच सायकलवरून जात असतां, कोणतीहि आगाऊ कल्पना नसतांना सिडनेला मूर्च्छा आली. नेहमींप्रमाणें बीयाट्रिसची सायकल त्याच्यापुढें गेली होती. सिडने जवळपास नाहीं असें पाहून बीयाट्रिस परत फिरली व पाहते तों सिडनेची स्वारी खुशाल एका खड्ड्यांत बेशुद्ध पडली आहे! त्याला दुखापत मात्र कांहीं झाली नव्हती. तेव्हांपासून असल्या वाहनावरून जाण्याची त्याला मनाई करण्यांत आली.

त्यांचें जीवन संन्यस्तवृत्तीचें होतें पण अबोल नव्हतें. कारण ज्यावेळीं तीं लिहीत वा वाचीत नसत, तेव्हां तीं सारखी बोलतच असत. आणि ह्या गप्पा त्यांना फार सुखाच्या वाटत. माझ्या विवाहापूर्वी मी खूप काळ त्यांच्याबरोबर राहिलेलों आहे व त्यांच्याबरोबर कामहि केलेलें आहे.









अनुक्रमणिका

बियाट्रिसला कंटाळा आला कीं, तिला विरंगुळ्याची, करमणुकीची गरज भासे. ( सिडनेला कधींच कंटाळा येत नसे. ) मग खुर्चीवरून ती उठे, आपलें पेन दूर टाकी व सिडनेच्या अंगावर जाऊन पडे, त्याच्याशीं लगट करी. पुन्हां कांहीं वेळानें ग्रंथांच्या टीपांसाठीं माहिती गोळा करण्याचें काम सुरूं करी.

मी आपलें नाट्यलेखन करीतच होतों. तें चालूं असतांनाच मला माझें एक तत्त्व दिवसेंदिवस जास्त जास्त पटूं लागलें. आणि तें म्हणजेः- मानवी बुद्धीच्या प्रगतीच्या मार्गांत असा एक टप्पा येईल कीं त्यावेळीं, वेब-पतिपत्नी, अनेक तत्त्वज्ञ व संत यांसारखे लोक बौद्धिक कामांत जो आनंद कधीं-काळीं थोडा वेळ अनुभवतात, तो आनंद परा-कोटीला पोहोंचून कायमचा असा त्यांना अनुभवायला मिळेल. आणि मग जीवनाचा असा आनंद त्यांना लाभेल कीं, जसा मी माझ्या ह्या प्रदीर्घ जीवनांत कांहीं थोड्यावेळींच सुखस्वप्नांतच उपभोगला असेल. वाटेल तेवढी दारू, भारी किंमतीचे चिरूट, नाट्यमंदिरांत बॉक्समध्यें बसण्याच्यावेळीं घालण्यासाठीं खूपसे दागिने, रोल्स गाड्या या गोष्टींपेक्षां वेब दांपत्यासारख्यांच्या जीवनक्रमास अधिक महत्त्व देणारे किती थोडे लोक आहेत याची मोजदादच करावी लागेल.

वेब-दांपत्य हें केवळ व्यवहारवादी, सांसारिक असून वाङ्मय व कला याविषयीं उदासीन होतें असें समजण्याचें कारण नाहीं. तीं दोघे इतकीं बुद्धिमान् होतीं कीं असें रहाणें त्यांना जमलेंच नसतें. पण ते दोघेही उत्तम समाजसंशोधक असल्यामुळें समाजांतलि व्यक्तींचा अलौकिक बुद्धि-मान् म्हणून नव्हे तर नागरिक म्हणून ते विचार करीत. ज्या लोकांना कोणच्याना कोणच्यातरी वर्गांत बसवितां येत नसे त्यांचा बीयाट्रिसला उबग येई; त्यांच्या बाबतींत ती भांबावून जाई. माझें वर्गीकरण तिनें जेव्हां अतिमानुष या सदरांत केलें तेव्हां तिला माझ्याशीं जमवून घेणें शक्य होऊं लागलें.

संशोधक म्हणून काम करितांना ती ज्यांची वर्गवारी करतां येत नाहीं किंवा ज्यांच्याबद्दल कांहीं आडाखे बांधता येत नाहींत त्यांची पर्वा करीत नसे. पण म्हणून, त्यांची बुद्धि अमान्य करण्यापर्यंत तिची मजल जात नसे. सिडनेची तिनें केलेली निवड तिच्या कल्पकतेची निदर्शक आहे. आपली मावशी एका हलक्या प्रतीच्या राजद्रोही लंडनवासियाशीं विवाह करणार आहे असें तिचा मुर्दाड भाचा त्यावेळीं म्हणाला होता. हे त्याचे उद्गार तिच्या नातेवाईकांच्या व तिच्या वर्गांतलि लोकांच्या मताचे दर्शक आहेत.

क्षुद्रपणाचा मागमूसहि नसलेला सिडनेसारखा उमदा माणूस माझ्या पाहण्यांत नाहीं. माझ्या मतें तर अफाट कर्तृत्व व सर्वगामी ज्ञान असूनहि इतका प्रामा-णिक व साधा असा तोच एक पुरुष आहे. आमच्या धंदेवाईक सार्वजनिक जीवनांत जेव्हां आम्हीं उगाच आव आणीत असूं किंवा जितका नाटकीपणा करतां येईल तितका करीत असूं तेव्हां सिडनेनें कधींहि कसलाहि आव आणला नाहीं, कीं कधीं नाटकीपणा केला नाहीं. बहुजनसमाजाकडून किंवा कोणाकडूनही कृपेची याचना त्यानें केली नाहीं आणि भंपकगिरी, किंवा कथाकादंबऱ्यांच्या नायकांप्रमाणें सकलगुणसंपन्न म्हणून मिरविणें म्हण-जेच असल्याचा मूर्तिमंत पुतळा बनणें, या धोक्यां-पासून तो सदैव दूर असे.

त्याच्या अंगच्या अमोल गुणातिशयामुळेंच कांहीं दोष उत्पन्न होत. एकदां आपलें म्हणणें समजण्या-जोगें व साधार मांडलें कीं मग आपण किंवा आपली शैली आकर्षक करण्यांत तो एक क्षणहि दवडीत नसे. असल्या कल्पना त्यांच्या मनांत कधीं येतच नसत. हॉऊस ऑफ कॉमन्स-मध्यें आपलें भाषण सभासदांना ऐकूं जाण्यासाठीं तो खटपटही करीत नसे. कित्येक वेळां लोकांच्या बाबतींत त्याच्या सहनशीलतेचा अंत होई. आपल्यासारखेच गुण त्यांच्या ठायीं आहेत असें तो मानीत असल्यानें, जें आपणांस सहज व उघड आहे असें वाटतें, तें इतरांना विकट कां वाटावें याचा त्यास चमत्कार वाटे. लेडी ॲस्टरनें त्याच्याविषयीं असें म्हटलें होतें कीं, " तो सर्वज्ञ








आहे याबद्दल मला शंका नाहीं. पण त्यानें मधून मधून असा विवेक बाळगावा कीं लोक कांहीं तसे नाहींत! त्याचा सल्ला जितका हितकारक असे तितका आकर्षक नसे. ''

अमर्याद श्रम घेऊन जितका जमवितां येईल तितका पुरावा गोळा केल्याशिवाय कोणतेंहि अनुमान न काढण्याच्या ह्या दांपत्याच्या संवयीमुळें माझा व त्यांचा प्रत्येक वेळीं खटका उडे. मी सर्व पुराव्याची छाननी करून नंतर अनुमान काढणारा असा निगमनवादी नाहीं. मी प्रेरणावादी आहे. एखादी घटना किंवा प्रसंग मला अर्थपूर्ण वाटला कीं माझें विचारचक्र सुरूं होतें. कारण तेवढी एकच घटना मला पुरी होते. अधिकृत ग्रंथ जमवून परिस्थितीचें संशोधन करीत मी बसत नाहीं. मानवी स्वभाव जाणण्याच्या माझ्या निसर्गदत्त देणगीमुळें मी असें झालें व तें कां झालें हें ओळखूं शकतों. कारण मला हें माहीत आहे कीं, माझें कोणतेंहि अनुमान सिद्ध करण्यासाठीं जर जरूर लागली तर वाटेल तेवढे कागदपत्र व पुरावे मिळतील. वेब दंपतीच्यापेक्षां माझी ही पद्धत सोपी आहे. तीमुळें मी त्यांच्या अगोदर त्यांच्यासारखींच अनुमानें काढलीं आहेत; व त्यांवर रणें माजविलीं आहेत. एकदां सुप्रसिद्ध इतिहासज्ञ जो ग्रीन त्याची पत्नी आमच्या भेटसि आली. तिच्या समक्ष भोजनोत्तर झालेल्या आमच्या कडक वादांमुळें तिला अशी शंका वाटूं लागली कीं, आमचे आता मैत्रीचे संबंध टिकतात कीं नाहीं! पण दुसऱ्या दिवशीं सकाळीं जेव्हां तिनें असें पाहिलें कीं, त्या चर्चेनें आमच्या संबंधांत थोडाहि बिघाड झाला नाहीं, आणि तो एक रोजचा कार्यक्रमच आहे, तेव्हां तिला हायसें वाटलें.

मार्क्सच्या भांडवलशाही समाजांतील अर्थव्यवस्थेच्या चिकित्सेनें नव्हे–तर ब्रिटिश उद्योगधंद्यांतील परिस्थितीच्या केलेल्या सूक्ष्म व प्रचंड अभ्यासानें वेब समाजवादी बनला होता. त्यामुळें मार्क्सच्या मरणानंतर जी निष्क्रियता आली ती नष्ट करण्याचें सामर्थ्य मार्क्सलाहि मागें टाकूं शकणाऱ्या वेबमध्येंच होतें.

रशियन क्रांतीमुळें त्याचें चित्त परदेशाकडे आकर्षिलें गेलें. त्याचें प्रत्यंतर त्यांच्या शेवटच्या ग्रंथांत–सोव्हियेट रशियावरील त्यांच्या ग्रंथांत–मिळतें. त्यानें सोव्हियेट संस्कृतीचा अभ्यास केला व ती नवी आणि आशादायक संस्कृति आहे यास्तव तिचा स्वीकार केला.

**जॉर्ज बर्नार्ड शॉ**

---

## जातीयवादाचें संकट

" गेलीं कित्येक वर्षे एका समाजानें चालविलेल्या द्वेष–हिंसामूलक अशा संकुचित जातीयवादाच्या प्रचाराविरुद्ध आपण सारखे झगडत आलों आहोंत. शेवटीं हा समाज हिंदुस्थानांतील कांहीं प्रांतांचें एक स्वतंत्र राज्य स्थापण्यांत यशस्वी झाला आहे खरा! हिंदी स्वातंत्र्याला संकटमय व मारक ठरलेला असा मुस्लिम जातीयवाद आतां एक स्वतंत्र राज्य म्हणून नांदत आहे. खुद्द हिंदुस्थानांत मात्र हा जातीयवाद जिवंत शक्ति म्हणून उरलेला नाहीं. कारण त्याचें बळ आतां इतरत्र केंद्रित झालें आहे. पण या जातीयवादानें हिंदुस्थानांतील इतर कांहीं लोकांचा अधःपात करून त्यांना बिघडविलें आहे. आणि हे लोक मुस्लिम जातीयवादाची कधीं नकल करूं पाहतात तर कधीं त्यावर ताणही करूं इच्छितात. "

**पं. जवाहरलाल नेहरू**, दीक्षान्त भाषण, रौप्यमहोत्सव, अलहाबाद विश्वविद्यालय, डिसेंबर १९४७










## या अंकांतील जाहिराती व जाहिरातदार

| | | |
|---|---|---|
| चित्रशाळा प्रकाशन | सु. रा. ग्रंथमाला | फडके प्रॉडक्टस् |
| श्रीधूतपापेश्वर कारखाना | बलसार रहाट | जे ॲण्ड एम्. को. |







अनुक्रमणिका

# आ म चीं न वीं प्र का श नें

## भारतीय राष्ट्रवादाचा विकास

लेखक : प्रा. न. र. फाटक

ब्रिटिश राजवटीच्या प्रारंभापासून हिंदी राजकारणांत कसकशीं स्थित्यंतरें होत गेलीं आणि त्या स्थित्यंतरांचा परिणाम होऊन आजचा राष्ट्रवाद कसा विकसित होत आला याचें सुबोध विवेचन. हिंदु-मुसलमान, जातीय दंगे, संस्थानें वगैरे प्रश्नाविषयीं सांगोपांग चर्चा करून आमच्या आजच्या स्थितीचें अचूक निदान करणारें पुस्तक

पृष्ठें १२०   मूल्य २। रु.

## जिवंत व्रतोत्सव

( सुधारून वाढविलेली द्वितीयावृत्ति )

लेखक: आचार्य काकासाहेब कालेलकर

आपल्या लोकजीवनांत असणाऱ्या सणांचें आणि उत्सवांचें स्वरूप ओळखून लोकशिक्षक आचार्य काकासाहेब कालेलकर यांनीं या पुस्तकांत जुन्या उत्सव-सणांचें पुनरुज्जीवन नव्या काळाला अनुसरून केलें आहे. त्याचप्रमाणें अद्ययावत् अशा अगदीं नवीन उत्सव-सणांचीहि भर त्यांनीं त्यांत घातली आहे. विद्यार्थी आणि शिक्षक यांना अत्यंत उपयुक्त.

पृष्ठें २५०   मूल्य ३॥ रु.

## हिंदुधर्माची मूलतत्त्वें आणि पुनर्घटना

( सुधारलेली द्वितीयावृत्ति )

लेखक: डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन्

भारताचे त्रिखंडकीर्ति पंडित डॉ. राधाकृष्णन् यांच्या ' Hindu View of Life ' या ग्रंथाचा सुबोध अनुवाद. युरोपीय श्रोतृवृंदांपुढें दिलेल्या या चार व्याख्यानांमधून डॉ. राधाकृष्णन् यांनीं हिंदुधर्माच्या तत्त्वज्ञानाचें आविष्करण सोपपत्तिक रीतीनें केलें असून त्यामधील उणीवा भरून काढण्याचा योग्य मार्ग दाखविला आहे. युरोपीय विद्वानांत हा ग्रंथ अत्यंत मान्यता पावला असून हिंदुधर्माचें यथातथ्य स्वरूप समजावून घेण्याला यासारखें दुसरें साधन नाहीं.

पृष्ठें १३०   मूल्य २॥ रु.

## संपूर्ण स्वदेशी

लेखक: महात्मा गांधी

प्रस्तुत पुस्तकांत म. गांधींच्या स्वदेशीविषयीं अनेक लेखांचें संकलन करण्यांत आलें असून खादी, ग्रामोद्योग, यंत्र-पद्धति, कारखानदारी, उत्पादनाचा प्रश्न, वर्धा-शिक्षण-योजना इत्यादि महत्त्वाच्या प्रचलित प्रश्नांचा उहापोह करण्यांत आलेला आहे. गांधीजींचा स्वदेशीविषयक दृष्टिकोन समजून घेण्यास अत्यंत उपयुक्त पुस्तक.

पृष्ठें १५०   मूल्य २। रु.

# सु ल भ रा ष्ट्री य ग्रं थ मा ला पुणें २.






Regd No. B. 5177






